# अण्णासाहेब किर्लोस्कर यांचें चरित्र.




शंकर बापूजी मुजूमदार

“ लंदनरहस्य ” अथवा रेनाल्डच्या मिस्तरीज आफ लंदन या इंग्रजी कादंबरीचें भाषांतर; मुद्रणदर्पण अथवा छापखान्याच्या माहितीचें पुस्तक; भाऊराव कोल्हटकर यांचें चरित्र; नाटक कसें पहावें; व ‘ मराठी रंगभूमीची किल्ली ’ इत्यादि पुस्तकांचा कर्ता यानें लिहिलें.

तें

पुणें येथें रावजी श्रीधर गोंधळेकर यांचे “जगद्धितेच्छु” छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

सन १९०४

किंमत २ रुपये.

बलवत्कवि कवितामधु । मघुपांसम रसिक रसिक जे प्याले ।
वदतील माधुरी ती । ससितपयाचे न देति शत प्याले ।

देवल.

अण्णासाहेबांच्या पश्चात्

जिनें,

त्यांचा अभिमान धरला; त्यांशीं कृतज्ञता बाळगली; त्यांची स्मृति जागृत ठेवली;

उदात्त विचारांचीं व कल्पनांची नाटकें रंगभूमीवर आणण्याची नवी दिशा दाखविली;

विद्वान् व रसिकांचें संतोषोपार्जन केलें

व

लोकसेवा करण्याचें व्रत मनोभावानें चालविलें

त्या

# किर्लोस्कर संगीत मंडळीस

## तिच्या उत्पादकाचें हें चरित्र कर्तव्यबद्ध होऊन अर्पण करीत आहें.

शं. बा. मु.

# प्रस्तावना.

"What a singular destiny has been that of this remarkable man! To be regarded in his own age as a classic and in ours as a companion! To receive from his contemporaries that full homage which men of genius have in general received from posterity! To be more intimately known to posterity than other men are known to their contemporaries."

**मेकॉलेचे डा० जान्सन** संबंधानें हे उद्गार प्रस्तुत चरित्रनायकास अक्षरशः लागू पडत आहेत. **अण्णासाहेब** उदयास येऊन बरोबर दोन तपें झालीं आहेत. एवढ्या काळांत त्यांच्या इतका लोकप्रिय व प्रसिद्ध नाटककार व पुरुष कोणी निपजला असेल असें वाटत नाहीं. या पुरुषानें स्वतः काढलेल्या महाराष्ट्र संगीत कलेचे आज मित्तीस अनेक अनुयायी आहेत. एवढ्यावरून या पुरुषाची योग्यता व त्याच्या चरित्राची अवश्यकता कळून येणार आहे. ज्या पुरुषानें आपल्या हयातींत विशेष कांहीं केलें असून त्याचा परिणाम त्याच्या वेळेच्या व त्याच्यानंतरच्या समाजस्थितीवर, लोकमतावर लोकांच्या विचारावर होतो तो पुरुष चरित्रनायक होण्यास पात्र असतो. मग तो एकादा योद्धा असो, मुत्सद्दी असो, कवि असो, नट असो, अगर नाटककार असो. जो देश अशा सुप्रसिद्ध पुरुषांनीं भूषित आहे, त्या देशाचें ग्रंथभांडारही त्यांच्या चरित्रांनीं भूषित आहे. आमचाही देश एके काळीं अशा पुरुषांनीं भूषित होता; परंतु त्यांच्या चारित्रांनीं महाराष्ट्र ग्रंथभांडार सुशोभित करण्याचा मात्र फारसा कोणीं प्रयत्न केला नाहीं.

प्रस्तुत चरित्रनायकानें नाट्यसृष्टींत मोठी क्रांति घडवून आणली आहे. पूर्वीची पौराणिक नाटकपद्धति नामशेष झाली आहे व त्यानें स्वतः स्थापन केलेली संस्था अव्याहत चालली आहे. या संगीताचा एकंदर समाजस्थितीवरही मोठा परिणाम घडला आहे. संगीतामुळें कवींना व ग्रंथकारांना स्फूर्तीला जागा झाली आहे. आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना मनोरंजनाला एक नवी सृष्टि झाली आहे व पूर्वीच्या बिकट शास्त्रीय गायनपद्धतींत फरक पडून तिला मोहक स्वरूप प्राप्त झालें

आहे. एवढा मोठा फेरफार **अण्णासाहेबांच्या** हयातीच्या शेवटच्या पांच वर्षांत झाला आहे. दुसऱ्या एखाद्या गोष्टीनें इतक्या थोड्या अवधींत असा लोकांचे मनावर परिणाम झाल्याचें दुसरें उदाहरण आढळून येत नाहीं.

अशा पुरुषाचें चरित्र होण्याची योग्य वेळ आजपर्यंत आली नव्हती. परंतु तीन वर्षांपूर्वीं संगीत कलेंतील एका अद्वितीय व सुप्रसिद्ध नटाचें चरित्र प्रसिद्ध होतांच, संगीत नाट्यकलेच्या या आद्यप्रवर्तकाच्या चरित्राची लोकांस उणीव भासूं लागली. व ही उणीव एका पिढीनंतर स्पष्ट दिसूं लागली, यावरून या पुरुषाचें महत्त्व लक्षांत येण्यासारखें आहे. **किर्लोस्कर मंडळीशीं** प्रस्तुत लेखकाचा काय संबंध आहे याच्याबद्दल उल्लेख **भाऊरावाचे** चरित्राचे प्रस्तावनेंत आहे. तो संबंध जुळून येण्यास प्रस्तुत चरित्रनायकच कारण आहेत. मध्यंतरीं कांहीं वर्षें हा संबंध द्विधा होऊन उभयतांचा आयुष्यक्रम अगदीं भिन्न झाला होता. त्यामुळें चरित्रलेखनाची भावी कामगिरी यावरच पडेल अशी कल्पनाही नव्हती. परंतु पुन्हां योगायोगानें **किर्लोस्कर मंडळी** व प्रस्तुत लेखक यांचे हितसंबंध एकवटून त्यांतच पूर्वोक्त प्रसिद्ध नटाचे व प्रस्तुत चरित्रनायकाचे चरित्रलेखनाचे दोन प्रसंग आले. पहिला प्रसंग उद्वेगजनक होता. कारण पहिल्याचें चरित्र त्याच्या निधनानंतर लागलींच प्रसिद्ध करावयाचें होतें. दुसरें चरित्र आज बरोबर एकोणीस वर्षांनीं प्रसिद्ध होत आहे. तेव्हां त्या वेळच्या उद्वेगजनक मनोवृत्ति अर्थातच आज मित्तीस लयास जाऊन त्यांच्या जागीं चरित्रनायकाविषयीं आदरबुद्धि व पूज्यभाव याच भावना कायम राहिल्या आहेत. त्यामुळें उत्साहवृत्तीनें हें चरित्र लिहिलें गेलें आहे. शिवाय प्रस्तुत लेखकाचा या संस्थेशीं पूर्वापार असलेला संबंध लक्षांत घेतला असतां हें पवित्र कर्तव्य बजावण्याचा त्याला योग्य हक्क आहे व तें सिद्धीस जाण्याची संधि त्यास मिळाल्याबद्दल त्याच्या मनाचें समाधान होणें स्वाभाविक आहे हें वाचकांस मान्य होईल अशी आशा आहे.

प्रस्तुत चरित्रांत विषयांतर पुष्कळ आहे असा आक्षेप निघण्याचा संभव आहे; परंतु थोर व प्रसिद्ध पुरुषांचीं चरित्रें व्यक्तिविषयक नसून ऐतिहासिक असतात. त्यांच्या चरित्रांबरोबर त्यांच्या वेळच्या धर्मसंबंधी, राजकीय, सामाजिक इत्यादि लोकस्थितीचाही इतिहास दिल्याशिवाय चरित्राची पूर्तता होत नाहीं, हा विचार मनांत आणला ह्मणजे व-

रील आक्षेपास जागा राहणार नाहीं. प्रस्तुत चरित्रांत स्वतःच्या कल्पनेचीं व अनुमानाचीं विधानें केलेलीं आहेत असा आक्षेप येऊं नये ह्मणून वेळोवेळीं वर्तमानपत्रें, पुस्तकें व खाजगी पत्रें यांतील उतारे गोंवले आहेत. तसेंच सदरहू उताऱ्यांवरून हें चरित्र अभिमानानें, कलुषित मनानें व अतिशयोक्तीनें लिहिलेलें आहे याही आरोपास जागा राहणार नाहीं, अशीही प्रस्तुत लेखकास आशा आहे.

या पुस्तकास ज्या मित्रमंडळीकडून निरनिराळ्या प्रकारचें साहाय्य झालेलें आहे, त्याबद्दल पुस्तककर्ता त्यांचा फार आभारी आहे. ज्या सद्गृहस्थांनीं साहाय्य केलें तें हें:

**रा.सा. बाबासाहेब गर्दे, रा.रा. शंभुराव किर्लोस्कर** व **भाऊराव फडके ड्राइंग मास्तर बेळगांव** हायस्कूल यांनीं **अण्णासाहेबांची** लहानपणची व **बेळगांवची** हकीकत पुरविली. **रा.रा. हरि नारायण गोखले, दामोदर सावळाराम यंदे,** व **विनायक बाळकृष्ण परांजपे** यांनीं अनुक्रमें ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश व नेटिव्ह ओपिनियन यांच्या जुन्या फायली उपयोग करण्यास दिल्या; **डा. लक्ष्मणराव माने** फरासखाना कामदार **बडोदें, रा.रा. नारायण नरसिंह फडणीस** काव्यरत्नावलीकर्ते **जळगांव, शंकर विष्णु कुळकर्णी बी. ए.** सुमति नाटकाचे कर्ते व **विठ्ठल सीताराम गुर्जर बी. ए.** ला बसणारे एक विद्यार्थी या सर्वांनीं आपल्या जवळील व आपल्या मार्फत पुस्तकांचा संग्रह व अनेक प्रकारची माहिती मिळवून दिल्या कारणानें त्यांचा प्रस्तुत पुस्तकाला कसा उपयोग झाला हें वाचतांना समजून येईलच.

प्रस्तुत पुस्तकांत पुष्कळच अशुद्धें इंग्रजी व मराठी मजकुरांत राहिलीं आहेत; व हे दोष प्रायः आमच्या इकडच्या सर्वच पुस्तकांतून आढळून येतात. कोणत्याही पुस्तकाला शुद्धिपत्राचें शेंपूट लागल्याशिवाय तें प्रसिद्ध झालेलें पाहण्यांत बहुतकरून येत नाहीं. याचीं कारणें, पुस्तक लवकर छापवून घेण्याची ग्रंथकाराची घाई, छापखान्यांतील शुद्धाशुद्ध पाहणाराचा अडाणीपणा व पुस्तक शुद्ध व निर्दोष छापविण्याकडे ग्रंथकार व छापखानेवाले या दोघांचेंही दुर्लक्ष हीं मुख्यतः आहेत. प्रस्तुत पुस्तकांतील दोषांची दुरुस्ती शुद्धिपत्राची पुरवणी देऊन करण्यापेक्षां वाचकांच्या क्षमादृष्टीवरच हवाला सोंपवावा असें प्रस्तुतस्थ-

ळीं योग्य वाटलें. शिवाय हल्लीं मराठी शुद्धलेखनपद्धतींत बरीच ढवळाढवळ करण्याचा वाद माजून राहिला आहे. अद्याप कोणतीच पद्धति निश्चित झालेली दिसत नाहीं. अशा संधीस शुद्धाशुद्धसंबंधानें कोणतेही दोष खपण्यासारखे आहेत हा विचार मनांत येऊन, पुस्तकांतील मराठी अशुद्धांकडे दुर्लक्ष करावेंसें वाटलें. इंग्रजी अशुद्धांसंबंधानेंही असाच विचार मनांत आणला. हल्लींच्या आमच्या मराठी शुद्धलेखनाच्या वादांत कित्येक परकीय जर इकडचे शब्द तिकडे, व तिकडचे शब्द इकडे अशी फिरवाफिरव करण्यास प्रवृत्त होतात तर इंग्रजी ही ज्याची भाषा नाहीं अशाकडून एखाद्या इंग्रजी शब्दांत एखादें अक्षर चुकून पडलें तर मोठासा प्रमाद होईल असें नाहीं. वस्तुतः या पुस्तकांत बरींच अशुद्धें राहिलीं आहेत, व त्यांबद्दल वाचक क्षमा करोत.

हें पुस्तक छापविण्याच्या कामांत जितकी त्वरा करवेल तितकी करून, सध्यांच्या प्लेगच्या धामधुमींत सुद्धां हें लवकर छापवून दिल्याबद्दल रा. रा. **केशवरावजी गोंधळेकर** याच छापखान्याचे व्यवस्थापक व **किर्लोस्कर** मंडळींतील **राजाराम नारायण कडू** यानें या पुस्तकाची हस्तलिखीत प्रत लिहून काढली याबद्दल त्यांचेंही आभार आहेत.

**अण्णासाहेब** हे ऐतिहासिक पुरुष होण्याला जितकें त्यांचें कवित्व व नाट्यकला कारण झाली आहे, तितकेंच त्यांच्या पश्चात् **रा. रा. मोरोबा वाघूलीकर, रामचंद्र विठ्ठल किजवडेकर, बाळकोबा नाटेकर** व **कै० भाऊराव कोल्हटकर,** इत्यादि **किर्लोस्कर** मंडळीचे चालक व पात्रें यांचीही त्यांच्याविषयीं पूज्यबुद्धि व त्यांचे गुण हीं कारण झालीं आहेत. एखाद्या घराण्याचा लौकिक राखण्याची जबाबदारी तो मिळविणाऱ्यापेक्षां राखणारावर विशेष असते. याप्रमाणें **अण्णासाहेबांनीं** मिळवून ठेवलेला लौकिक याच मंडळींनीं जतन करून ठेवला आहे. व प्रस्तुत चरित्र प्रसिद्ध होण्याचें श्रेय यांना विशेष आहे.

शेवटीं ज्या परमेश्वराच्या इच्छामात्रेंकरून हें चरित्र प्रसिद्ध झालें. त्याचेंच शेवटीं चिंतन करून प्रस्तावना संपवितों.

**मुंबई, डिसेंबर**
१९०४.

**शं. बा. मुजूमदार.**

# अनुक्रमणिका.

---

## चित्रांची अनुक्रमणिका.

# किर्लोस्कर घराण्याची वंशावळ.

कृष्णराव. विनायकराव. रामचंद्र.

जन्म–शके १७६५. मृत्यु शके १८०७. २ ३ ४ १ २ ३ १ २ ३

बळवंत उर्फ अण्णा. १ गणेशपंत. धोंडोपंत. श्रीपाद्पंत. गंगाधर. शंभूराव. गोपाळ. सखारामपंत उर्फ बळवंतराव. गणपतराव. विष्णूपंत.

पांडुरंगपंत. रंगोपंत. रामचंद्रपंत. रामचंद्रपंत. डा. वासुदेवपंत. लक्ष्मणपंत. डा. गंगाधरपंत.

काशिनाथ. गोपाळपंत. कृष्णाजीपंत.

नारोपंत दत्तक. हरिपंत. नारोपंत दत्तक गेले. बाबजीपंत. वासुदेवपंत.

पांडुरंगपंत. रंगोपंत. जनार्दनपंत. गोविंदपंत वगैरे ९ मुलगे. रामजीपंत.

बाळाजीपंत. हरिपंत. नारोपंत. गोविंदपंत.

गोपाळभट. येसाजीपंत. गणेशभट. बाबदेवभट. महादेवभटकाका [ समंद झाले. ]

कृष्णंभट.

केशवभट.

गणेशभट.

कृष्णंभट.

गणेश कृष्णंभट.

कोकणांत या घराण्याचे पुष्कळ भाऊबंद आहेत; ही वंशावळ इकडच्या प्रांतांतील घराण्याची आहे.

# अण्णासाहेब किर्लोस्कर यांचें चरित्र.

I therefore begin soul of the age !
The applause, delight, the wonder of the stage.
My shakespeare, rise, I will lodge thee by
Chaucer, or spencer, or bid Beument lie
A little farther to make thee room
Thou art a monument without a tomb

Ben Jonson.

कांहीं विशेष सद्गुणें वीण
उगाच कीर्ति नोहे जाण.

दासबोध.

## उपोद्घात.

आलीकडील पन्नास साठ वर्षांतील हिंदुस्थानांतील निरनिराळ्या चळवळींचा इतिहास जर कधीं काळीं प्रसिद्ध होणार असेल तर त्यांत मुख्यत्वेंकरून ज्या ज्या चळवळींचा किंवा प्रसिद्ध पुरुषांचा इतिहास येईल त्यांतच प्रस्तुत चरित्रनायकाचा व त्यानें काढलेल्या संगीत नाट्यकलेचा इतिहास आल्यावांचून राहणार नाहीं.

ज्या कालांत लोकमान्य कवि उदयास येतात त्यांची योग्यता त्या काळांतील शूर पुरुष, मुत्सद्दी, विद्वान् व साधु पुरुष यांच्या तोडीचीच असते. या प्रत्येकानें आपापल्या परीनें लोकांवर थोडे फार उपकार केलेले असतात. आपलें नांव मागें राहणें ही गोष्ट सर्वांनाच साधत नाहीं. त्याकरितां देह झिजवावा लागतो व बुद्धिसर्वस्व कसोटीस लावावें लागतें:

चणे खावे लोखंडाचे तेव्हां ब्रह्मपदीं नाचे

या साधुक्तीप्रमाणें किंवा **गोल्डस्मिथच्याः**

The good man suffers but to gain,
And every virtue springs from pain:
As aromatic plants bestow
No spicy fragrance while they grow:
But crushed or trodden to the ground,
Diffuse their balmy sweets around.

या सिद्धांतवचनाप्रमाणें मग कीर्तीचा परिमळ सुटत जातो. नाहीं-तर एकाच वेळेला थोडे का प्राणी जन्मास येतात? परंतु त्यांपैकीं एखा-दाच आपल्या कुळाचा उद्धार करतो, व जन्मदात्या व भूमातेच्या ऋ-णांतून मुक्त होतो. त्याचेंच नांव मग चिरकाळ राहतें; एवढेंच नाहीं, तर तें एक प्रकारें पुण्यकारक, आनंदकारक व बोधप्रद होत असतें. स्वर्गा-तून **भागीरथी** आणण्याचे **भगीरथाचे** प्रयत्न फक्त त्याच्या पितरांचा उद्धार करण्यापुरतेच होते; परंतु ते आज जगाच्या उद्धारास कारण झाले आहेत. **श्रीराम** व **कृष्ण** यांनीं आपले जन्मदिवसही पुण्यकारक करून ठेवले आहेत. या विभूती भरतखंडवासी जनांच्या हृदयमंदिरांत युगेंच्या युगें उभ्या आहेत. **अकबर, शिवाजी, बाजीराव** यांच्या-सारख्या प्रतापशाली पुरुषांचीं राज्यें लयास गेलीं, परंतु त्यांची कीर्ति अद्यापि लोक गात आहेत. **कालीदास, भवभूति** यांच्यासारखे कवि; **ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम** यांच्यासारखे साधुपुरुष यांच्या हा-डामांसाचे देह आज नाहींसे झाले आहेत; तरी त्यांचीं नांवें परचक्र, रा-ज्यक्रांत्या, रोगांच्या सांथी इत्यादि तुफानांतून कित्येक शतकेंच्या श-तकें ओलांडून कायम राहिलीं आहेत. व त्यांची वाणी प्रासादिक हो-ऊन बसली आहे. * सुधारलेल्या राष्ट्रांत अशा प्रसिद्ध पुरुषांचे राज-

* मोठ्या पुरुषासंबंधानें एका पुस्तकांत म्हटलें आहे कीं:

The great men are the heroes who have freed the bodies of men; they are the philosophers and thinkers, who have given liberty to the soul; they are the poets who have transfigured the common and filled the lives of many millions with love and song. They are the artists who have covered the bare walls of weary life

(टीप पुढें चालू.)

रस्त्यावर लोकांच्या आठवणीकरितां घोटीव दगडांचे किंवा धातूचे मोठेमोठे पुतळे उभे करण्याची चाल आहे, तशी आपल्याकडे नाहीं—इतकेंच नाहीं तर यांपैकीं कोणाचें जन्मवृत्त माहित नाहीं तर कोणाचा कालनिर्णयही होत नाहीं; परंतु त्यांचीः

सूरतसे कीरत बडी बिन पंख उडजाय
सूरत तो जाती रही कीरत कबहु न जाय

अशा प्रकारची योग्यता होऊन बसली आहे. "मोठे कवि किंवा महान् तत्वज्ञ हे कोणत्याही देशांत जन्मले तरी ते सर्व जगाचे उपकारकर्ते या नात्यानें आपलेचसे वाटत असतात, ही गोष्ट सर्वमान्य आहे"* अशाच्या पायरीला पोंचणारे आमच्या महाराष्ट्रांतील एक अर्वाचीन सुप्रसिद्ध कवि, नट व नाटककार **बळवंत पांडुरंग** ऊर्फ **अण्णा साहेब किर्लोस्कर** हे प्रस्तुत ग्रंथांतले चरित्रनायक आहेत.

परंतु त्यांच्या चरित्रास आरंभ करण्यापूर्वी प्रथम महाराष्ट्रांत नाट्यकलेचा उपक्रम कसा झाला याचा इतिहास अवश्य आहे.

---

( टीप मागील पृष्ठावरून )

with triumphs of genius. They are the heroes who have slain the monsters of ignorance and fear, who have outlived the Gorgon and driven the cruel gods from their thrones. They are the inventors, the discoverers, the great mechanics, the kings of the useful who have civilzed this world.

Oration on Voltair.

[ थोर पुरुष हे मानवजातीला स्वातंत्र्य देणारे योद्धे आहेत; आत्म्याची उन्नति करणारे तत्त्ववेत्ते व पंडित आहेत; वस्तुमात्राचें रूपांतर करणारे व लक्षावधि लोकांच्या अंतःकरणाला गीत व प्रीति यांच्या योगानें उत्साह देणारे कवि आहेत; आयुष्यरूप खडतर इमारतीच्या ओसाड भिंतीवर बुद्धीच्या पराक्रमाचीं चित्रें काढणारे चितारी आहेत; अज्ञान आणि भीति यांचा संहार करणारे व दुष्टांना त्यांच्या सिंहासनावरून हाकून लावणारे वीर आहेत; कल्पक आहेत, शोधक आहेत, मोठें यांत्रिक आहेत; सारांश या जगाची सुधारणा करण्याच्या कामांत जे उपयोगीं पडले आहेत त्यांचे राजे आहेत. ]

*केसरी ता. १५ डिसें. १९०३ हर्बर्ट स्पेन्सर वरील निबंध

## संगीत नाटकापूर्वींचे महाराष्ट्रीय नाटककार.

आमच्यांत महाराष्ट्र भाषेच्या द्वारें नाटकप्रयोग करून दाखविण्याचा प्रघात पडण्यापूर्वीं व संस्कृत नाटकाचा काल नाहींसा झाल्यानंतर सुमारें तीनशें वर्षें नाटकप्रयोगाची करमणूक आमच्यांत अगदींच बंद पडली होती. एवढ्या मोठ्या काळांत महाराष्ट्र भाषेंत अनेक चांगले कवि उत्पन्न झाले असतां त्यांत एकही महाराष्ट्र नाटककर्ता उत्पन्न झाला नाहीं. हीं मधलीं तीनशें वर्षें मोठ्या धामधुमीचीं व अस्वस्थतेचीं गेल्याकारणानें, देशांत शांतता असते अशा वेळीं उपभोग घेण्याच्या नाटकासारख्या करमणुकीकडे लक्ष देण्यास संधि सांपडली नाहीं असें कित्येक वेळां प्रतिपादन करण्यांत येतें. परंतु विचार करून पाहतां हें प्रतिपादन बरोबर दिसत नाहीं. कारण ज्या धामधुमींत **तुकाराम, रामदास** इत्यादि साधुसंत उदयास येऊन त्यांनीं आपल्या काव्यामृताच्या द्वारें भक्तिमार्गाचा प्रसार केला, ज्या धामधुमीच्या काळांतच **मुक्तेश्वर, मोरोपंत, वामन** इत्यादि कवि उत्पन्न होऊन त्यांनीं आपल्या काव्यचमत्कृतीनें **रामायण भारता**सारखीं महाकाव्यें लोकांस सुलभ करून दिलीं, ज्या ऐन धामधुमीच्या काळांत सुद्धां आमची संसारपद्धति, रीत-रिवाज, धर्मश्रद्धा, वेदाभ्यास, शास्त्राभ्यास व कलाकौशल्य हीं कायम राहिलीं, त्या काळांतच आमच्या लोकांनीं ऐश्वर्याच्या, सुखोपभोगाच्या, पराक्रमाच्या व बुद्धिकौशल्याच्या अशा कांहीं एकेक संस्मरणीय गोष्टी करून ठेवल्या आहेत कीं, त्या मानानें हल्लींच्या ऐन शांततेच्या वेळीं त्यांपैकीं एकही कर्तृत्व आमच्यांत असलेलें पाहण्यांत येत नाहीं. पूर्वींच्या आमच्या लोकांच्या कर्तबगारीचें प्रत्यंतर पाहणें असेल तर एकाद्या राजधानीच्या परंतु प्रस्तुत गतवैभव असलेल्या शहरांतून सहज फिरून यावें, म्हणजे तेथील राजमहाल, उद्यानें, देवालयें, मंदिरें इत्यादिकांची अपूर्व रचना, शोभा व त्यांकरितां लागलेल्या संपत्तीचें प्रमाण इत्यादि पाहून पूर्वींचे लोक कशा प्रकारचें ऐश्वर्यसुख भोगीत होते याची कल्पना सहज मनांत येते; व या कल्पनेवरून तो

धामधुमीचा काळ होता तरी त्यावेळीं लोकांची कल्पनाशक्ति जागृत व तीव्र होती हें उघड दिसून येतें.* तेव्हां त्या काळीं एकस्या नाट्य-कलेचाच लोप झाला याला दुसरींच कांहीं कारणें असलीं पाहिजेत. त्यांपैकीं असें एक असावें कीं, प्राचीन काळीं संस्कृत नाटकाचे जे प्रयोग होत असत ते हल्लींच्या पद्धतीप्रमाणें नेहमीं होत नसून फक्त यात्रा किंवा उत्सवप्रसंगानेंच होत असल्याचें बहुतेक नाटकांतील प्रस्तावनेवरून दिसून येत आहे. तेव्हां एखाद्या कवीच्या नाटकाचा प्रयोग कधीं होत असेल तर तो वर्षांतून क्वचित् प्रसंगींच होत असला पाहिजे.

---

*वरील विधानास प्रोफेसर गोपाळ गणेश आगरकर एम. ए. यांच्या लेखानें दुजोरा येत आहे. ते म्हणतात: " मुसलमान लोकांनीं आपल्या कसबानें किंवा विद्येनें आमच्या कारागिरींत किंवा विद्येंत प्रचंड क्रांति करून त्यांचा मागमूस नाहींसा करावा असा त्यांचा अधिकारही नव्हता. मुसलमान लोक आम्हांहून कडवे, विशेष शूर, विशेष मिजाशी व विशेष अभिमानी आहेत हें क्षणभर कबूल करितां येईल. पण इंग्रज लोकांप्रमाणें ज्ञानांत व कलाकौशल्यांत, राजकारणांत किंवा कल्पकतेंत आम्हांहून ते श्रेष्ठ होते असें म्हणण्यास बिलकूल आधार नाहीं. त्यांनीं पांच सहाशें वर्षें आम्हांवर बादशाही चालविली हें कबूल आहे, पण इंग्रजांनीं आपल्या शंभर वर्षांच्या अमलानें आमच्या अंतर्बाह्य स्थितींत जें जमीनअस्मानचें अंतर पाडलें आहे तें मुसलमानांच्या सहाशें वर्षांच्या एकछत्री अमलानें पाडतां आलें नाहीं हें निर्विवाद आहे. आणि असेंच होणें स्वाभाविक होतें. वर निर्दिष्ट केलेल्या गुणांत आम्हांहून मुसलमान लोक खरोखरीच श्रेष्ठ असते तर त्यांच्या सहाशें वर्षांच्या अमलांत आमच्या घरच्या सुधारणेचा मागमूसही न राहता. "

रा. सा. नारायण भवानराव पावगी यांच्या " भारतीय साम्राज्य " पुस्तकाच्या अकराव्या भागांत धामधुमीच्या काळासंबंधानें असेच उद्गार आहेत. ते म्हणतात:

" म्लेंच्छाच्या दीन दीन शब्दांत व कोलाहलांत जी सहज स्फूर्ति इतस्तत: चमकत होती व जो महाराष्ट्र काव्यौघ जणूं काय आकाशांतल्या मेघाप्रमाणेंच सर्वत्र एकासारखा वर्षाव करीत होता, तोच सांप्रतकाळीं धामधूम नसून सुद्धां साफ आटून अगदीं कोरडा पडला आहे. आणि सबंध एकोणिसाव्या शतकांतल्या आंग्ल देशांतल्या शांततेंत तर आमच्या महाराष्ट्र देशांत ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, मोरोपंत इत्यादिकांच्या तोडीचा एक सुद्धां कवि निपजला नाहीं. इतकेंच नाहीं तर नुसतें कवि हें नांव शोभण्यासारखें देखील एकही रत्न उदयास आलें नाहीं, याचें कारण काय ? "

आपल्या प्राचीन कवींपैकीं, बहुतेकांनीं एकेकच नाटक रचलेलें दिसत आहे, याचें कारण तरी हेंच असावें. **कालिदास** व **भवभूति** यांचींच काय तीं सर्वांत अधिक ह्मणजे तीन तीन नाटकें आहेत. त्या काळीं नाटकाचा धंदा ह्मणून केला जात नसावा. तर केवळ विद्वान् व लोकमान्य अशांच्या मनोरंजनाची एक कला ह्मणून तिचा उपयोग लोक करीत असावेत. तेव्हां पूर्वीपासूनच सर्व लोकांत नाट्यकलेचा प्रसार विशेष नसल्यामुळें देशांच्या स्थित्यंतराबरोबर, ज्या प्रसंगाकरितां ह्मणून नाटकप्रयोग होत असत ते प्रसंगही नाहींसे झाले असावेत. व त्यामुळें नाट्यकला बंद पडली असावी. महाराष्ट्र भाषेचा आमच्यांत प्रसार झाल्यानंतर देखील सुमोर दोन शतकांनीं कांहीं संस्कृत नाटकें झालीं आहेत. **जगन्नाथ** पंडिताचें **रतिमन्मथ** नाटक हें **अकबरा**च्या कारकीर्दींतलें आहे. यावरून नाटकप्रयोग हे फक्त संस्कृतांत करून दाखवावयाचे अशी त्यावेळीं समजूत असली पाहिजे. ह्मणून त्यांचा प्रसार महाराष्ट्र भाषेंत कोणीं केला नसावा. व याच अनुमानाला एका गोष्टीनें बळकटी येत आहे. ती अशी कीं, आमच्यांतील संस्कृत भाषा लोपली, नाटचरचना नाहींशी झाली व कला बंद पडली तरी मोठ्या धामधुमींतून व परचक्राच्या वावटळींतून मुद्रणकलेचा प्रसार हिंदुस्थानांत होईपर्यंत आपल्या पूर्वजांनीं वेद, शास्त्रें व पुराणें यांचें जसें फार काळजीपूर्वक जतन केलें तसेंच नाटकग्रंथाचेंही केलें आहे. यावरूनच नाटकाची योग्यता ते फार मोठी व पवित्र समजत असले पाहिजेत हें उघड आहे.

मयूरकाव्य संशोधक सुप्रसिद्ध रा. रा. **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.** यांचें. आमच्यांत मध्यंतरीं महाराष्ट्रीय नाटककार कां निपजले नाहींत या संबंधानें असें मत आहे. ते म्हणतात:

" देशाची संपन्नता ही नाट्यकलेच्या उत्कर्षास कारणीभूत होते. **कालीदासानें** आपलीं नाटकें राजमंडळापुढें व **भवभूतीनें** यात्रोत्सवप्रसंगीं बहुजन समाजापुढें रचून प्रयोग करून दाखविलीं. त्यांच्या काळीं भरतखंडांत सुखस्थिति होती ह्मणूनच त्यांनीं नाटकें रचलीं. त्यांचीं जीं नाटकें आज उपलब्ध आहेत यांशिवाय आणखीही त्यांनीं रचिलीं असतील, पण तीं कालाच्या तडाख्यांत नष्ट झालीं. **शेक्स्पीयर**चीं प-

सतीस नाटकें जिवंत आहेत, कारण एक तर त्याला अडीचशें वर्षें होत आलीं, दुसरें त्याच्या वेळेपासून इंग्लंडची भरभराटीच होत चालली व तिसरें छापखाना वगैरे विद्याप्रसाराचीं साधनें त्याच्या वेळेपासूनच अस्तित्वांत आलीं. **कालीदासा**ला दोन हजारांवर वर्षें होऊन गेलीं, **भवभूती**ला तेराशें वर्षें झालीं. इतक्या काळांत त्याची आणखी कांहीं नाटकें बुडून गेलीं असावींत असा माझा तर्क आहे. नाटकांची रचना व्हायला, त्यांची प्रसिद्धि व्हायला अनुकूल काल असावा लागतो. राष्ट्र केवळ युद्धमग्न असेल किंवा केवळ विलासमग्न असेल तर चांगलीं नाटकें निपजायचीं नाहींत. **इलीझाबेथ** राणीचा, **विक्रमादित्या**चा काल **शेक्सपीयर**च्या व **कालिदासा**च्या नाटकाला अनुकूल असाच होता. नाटचकला किंबहुना सर्व ललितकला राष्ट्राच्या भरभराटींत किंवा भरभराटीच्या नंतरच्या विषयासक्त अशा पतनशील कालांत उदयास येतात. पण राष्ट्र उदयोन्मुख असतांना किंवा पूर्णपणें पतित झालेल्या स्थितींत त्यांचा उदय होत नाहीं असा अनेक देशांच्या इतिहासावरून एक सिद्धांत निघतो. त्याचप्रमाणें राष्ट्रांत कित्येक वर्षेपर्यंत किंबहुना शतकेंपर्यंत विशिष्ट विचारांची प्रचंड लाट येत असते, तिच्या अनुरोधानें सर्व ग्रंथकर्ते चालतात. हे दोन सिद्धांत नीट लक्षांत ठेवले ह्मणजे प्राचीन मराठी कवींनीं नाटकें कां केलीं नाहींत या प्रश्नाचा चोख उलगडा होतो.

" **पृथ्वीराजा**च्या पतनानंतर यवनी अंमल झाला. हा नाट्यकलेस अर्थात् प्रतिरोधक होता. **मृच्छकटिका**पासून **कालीदास भवभूती**-पुढें **जयदेवा**च्या नाटकापर्यंत उदय, वाढ, व ऱ्हास, स्पष्टच दिसतात. यानंतर भरतखंडांत तीन चार शतकें चांगले ग्रंथकर्ते झाले नाहींत; मग ते नाट्यकर्तेच कोठून होणार ? महाराष्ट्रांत मात्र निराळाच मार्ग लोकविचारास ज्ञानेश्वरीपासून लागला. **गोपीचंद** व त्याची माता. **जयंतपाळ** व **मुकुंदराज** यांच्या कथेवरून स्पष्ट दिसतें कीं, दक्षिणेंतले राजेही तेव्हां परमार्थपर होते. अकराव्या शतकापूर्वीचे मानभावी लोकांचे ग्रंथ प्राचीन मराठींत लिहिलेले आहेत; ते व तेलगू, कानडी वगैरे दक्षिण महाराष्ट्रांतले साधूसंतांचे ग्रंथ व चरित्रें पाहिलीं असतां **ज्ञानेश्वरां**पूर्वींही दक्षिण हिंदुस्थानांत **श्रीशंकराचार्यां**चा अद्वैत तत्त्वमार्ग व भागवत-ध-

र्माचा भक्तिमार्ग यांचा मिलाफ होऊन अद्वैतपर भागवत-धर्माचा फैलाव जारीनें होत होता असें दिसतें. दहाव्या शतकापासून भागवत-धर्माची लाट साऱ्या भरतखंडभर पसरत होती. याचाच परिणाम **ज्ञानेश्वर, कबीर, चैतन्य,** हे तीन सूर्य व इतर अनेक दिव्य तारकें यांचा प्रकाश भरतखंडाच्या साऱ्या भागांवर पडला होता. अर्थात् विषयविरक्ति सर्वत्र होऊन परमार्थाचा उदय झाला, भक्तिमार्गाचा प्रकाश पसरत चालला. “ काव्यालापांश्च वर्जयेत् ” हें सूत्र वेदांती यांनीं फैलावलें; “ रंडागीतानि काव्यानि ” म्हणून शास्त्री मंडळांनीं त्याचा धिक्कार केला. याप्रमाणें भक्तिमार्गी साधूसंत, तत्त्वज्ञानी वेदांती, न्याय व्याकरण मीमांसादि “ घटपटांच्या ” खटपटींत कालक्षेप करणारें शास्त्रीमंडळ इत्यादि सारा विद्वत्समूह काव्यनाटकापासून पराङ्मुख झाल्यावर मग त्याकडे सर्व राष्ट्रांचें पूर्ण दुर्लक्ष झालें व भक्तिमार्गाचा प्रसार ज्या पांचशें वर्षांत झाला त्याच पांचशें वर्षांत काव्यनाटकाचा ऱ्हास झाला हें साहजिक आहे. **ज्ञानेश्वरांनीं** म्हटल्याप्रमाणें ‘ नटनाचाचा ’ रंग ईश्वरकीर्तनांत भरूं लागला. विषयाचा द्वेष करणारे ईश्वरपरायण साधू काव्यनाटकासारख्या विषयवासना उत्तेजित करणाऱ्या ललितकलांविषयीं अनुत्सुक होते हें साहजिकच आहे. यामुळें **ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, एकनाथ, रामदास** व इतर शें दोनशें साधूकवींच्या ग्रंथांत काव्यनाटकांचा वास सुद्धां येत नाहीं. शिवकालीन कवि हे साहित्य व छंदस् या दोन विषयांचा कांहीं अभ्यास करूं लागले. यामुळें मराठी भाषेंत अनेक गणवृत्तें, आख्यानें वगैरे होऊं लागलीं. संस्कृत नाटकांचा ज्यास वारा लागला होता असे मराठी कवि पांच दिसतात. **मुक्तेश्वर, विठ्ठल, रघुनाथ पंडित, वामन,** व **मोरोपंत.** यांपैकीं **विठ्ठल** व **मोरोपंत** हे छंदशास्त्रांत निष्णात होते. **मुक्तेश्वर** मोठा रसिक व सृष्टिसौंदर्याचा भोक्ता होता खरा, पण **रामायण भारतादि** ग्रंथांत त्याची बुद्धि रमल्यामुळें तिला काव्यनाटकादि गौण वाटूं लागले. महा काव्यरचना करण्याचें सामर्थ्य व नाट्यग्रंथरचनासामर्थ्य हीं सहसा एकत्र असत नाहींत. (Poetie jenius and dramatic jenius Generally do not dwell together) **मुक्तेश्वर, मोरोपंतांनीं** महा काव्यें मराठींत आणलीं, पण नाटकें आणलीं नाहींत याचें बीज वरील तत्त्वांत आहे. पस्तीस नाटकें

रचणारा **शेक्सपीयर** व " प्याराडाइज् लॉस्ट " हें महाकाव्य रचणारा **मिल्टन** या दोन विभूति भिन्न आहेत. एकाचें कार्य दुसऱ्यास साधावयाचें नाहीं. याप्रमाणें **ज्ञानेश्वरा**पासून **रामदासा**पर्यंतचे सर्व कवि वेदांती व भक्तिमार्गी होते ह्मणूनः व **वामन, मुक्तेश्वर, मोरोपंत** हे काव्यनाटकाचा रसानुभव घेणारे पण Epic ग्रंथांत बहुशः रमणारे ह्मणून सहाशें वर्षांत मराठींत नाटककार कोणी झाला नाहीं. सर्व मराठी कवींत मोरोपंताइतका नाटकप्रिय कवि दुसरा नाहीं हें मात्र खरें. त्यांच्या हातचे बहुतेक नाटकग्रंथ व त्यांच्या छाया पंढरीस आहेत.

धातूंत जसें हाटक, नाटक वर सर्व सुप्रबंधांत ।
तें अरसिकांत संप्रति निष्फळसे मुकुर जेंवि अंधांत ॥ १ ॥
रस न समजति, म्हणविति रसिक, म्हणुनि चित्त बहुत हळहळतें ।
जें तन्निंदक भाषण होतें कर्णांत तप्त हळहळ तें ॥ २ ॥
थोरांहीं स्तविलें कवि, तन्निंदा तिळहि सोसवत नाहीं ।
मज सुरस ग्रंथांहीं, वृत्तिपरा जेवि सोस वतनाहीं ॥ ३ ॥

[ राम रीति. ]

काव्य नाटकांचा व्यासंग मोरोपंतांनीं फार ठेवला होता व ते जात्या मोठे रसिक होते म्हणून "सर्व प्रबंधांत नाटक श्रेष्ठ आहे, पण सध्यांच्या अरसिक पंडितांना रसास्वाद घेतां येत नाहीं व ते व्यर्थ त्याला नांवें ठेवतात. मोठमोठाल्या रसिकांनीं **कालिदासा**दिकांच्या नाटकांची स्तुति केली आहे. म्हणून त्यांचीं निंदा केलेली कानानें ऐकवत नाहीं. मला तरी अशा सुरस ग्रंथाचा फार सोस आहे, कसा म्हणाल तर महाराष्ट्रांतल्या वतनदार लोकांना जसा आपल्या वतनांचा असतो असा. " हा मोरोपंताचा अभिप्राय त्यांनीं वरील तीन आर्यांत प्रगट केला आहे. त्यावरून नाटकाविषयीं त्यांचें किती अनुकूल मत होतें हें समजतें. **मोरोपंत** जरी इतके रसिक होते तरी लोकव्यवहाराला मिथ्या समजणाऱ्या वेदांताचे अनुयायी असल्यामुळें, ईश्वर व भगवद्भक्त यांशिवाय इतर कोणाही मानवाची स्तुति करावयाची नाहीं असा त्यांचा बाणा असल्यामुळें, ( Epic ) महाकाव्यांत रमणारी त्यांची बुद्धि असल्यामुळें व शिवाय भगवद्भक्तींत काळ घालविणारा सच्छील ब्राह्मण असल्यामुळें त्यांच्याही हातून नाटकरचना झाली नाहीं. तात्पर्य बहुते-

क मराठी कवि अद्वैती व भगवद्भक्त असल्यामुळें त्यांनीं नाटकांकडे दुर्लक्ष केलें. मराठी राज्याचीं दीडशें वर्षें युद्धादिकांच्या धामधुमींत गेल्यामुळें ललितकला वृद्धि पावल्या नाहींत. **सवाईमाधवरावांच्या** राज्यारोहणापुढचा काळ मात्र नाट्यकलेला अनुकूल होता. कोणी नाट्काची केवढीही तरफदारी केली तरी नाटकादिकला विषयसुख वाढविणाऱ्या आहेत खास. त्यांत व्यवहाराचें चित्र असतें व त्रैगुण्यात्मक भिन्नभिन्न प्रकृति यांत दिसतात हें खरें आहे तरी मनोरंजन हाच त्याचा मुख्य हेतु व परिणाम होतो. यामुळें सर्व साधु या कलेला शिवले नाहींत. **पेशवाईच्या** उत्तरार्धांत जेव्हा रंग, नाच, तमाशे सुरू झाले तेव्हां नाटकें सुरू व्हावयास पाहिजे होतीं, पण पूर्वपरंपरा नाटकाला अनुकूल नसल्यामुळें मराठींत नाटकें करण्याचें कोणी धाडस केलें नाहीं. “ नटाचें तोंड पहाणें अशास्त्र ” असल्यामुळें **रामजोशासारख्याच्या** कीर्तनाला जायलाही **मोरोपंतासारखे** कुलीन सद्गृहस्थ तेव्हां नाखूष असत. तेव्हां नाटकाविषयीं प्रथमपासून महाराष्ट्रांतले बरेच लोक तिरस्कार करणारे आहेत. इंग्रजी अमलानंतर **शेक्सपियर** वगैरेचीं नाटकें जेव्हां लोक वाचूं लागले व नाटकग्रंथाची युरोपांत किती चहा आहे हें समजूं लागले तेव्हां महाराष्ट्रांत अनुकूल ग्रह झाला. **परशुरामपंततात्यासारख्यांनीं** संस्कृत नाटकाचीं मराठी भाषांतरें केलीं. **विष्णुपंत भावे** यांनीं जुन्या ललितपद्धतीचा स्वीकार करून “ अललल ” चीं नाटकें सुरू केलीं तरी महाराष्ट्र लोकांस आपल्या नाटकांनीं गुंग करून बऱ्याच लोकांस नाटकाविषयीं प्रेम वाटविण्यास लाविलें अण्णांनीं. तेच मराठींतले पहिले नाटककार होत*.”

---

*वरील विधान सर्वथैव बरोबर आहे असें म्हणतां येत नाहीं. माजी शाळापत्रकांत “ कविता ” या विषयावर एक विस्तृत व शोधपूर्वक लेख प्रसिद्ध झाला होता. त्यांत असें विधान काढलेलें आहे कीं, काव्यें, नाटकें, इतिहास इत्यादिकांना जी स्फूर्ति येते ती देशांत जी एखादी नुकतीच खळबळ उडून गेलेली असते तिच्यापासूनच येते. व हा सिद्धांत उदाहरणपूर्वक त्या लेखांत लेखकांनीं सिद्ध केला आहे. तो भाग असा—

“ अलीकडे इतिहासकारांनीं असा एक सिद्धांत काढला आहे कीं, ज्या काळीं मोठ्या लढाया, राज्यक्रांति वगैरे लौकिकमहत्त्वाच्या गोष्टी घडून येऊन राष्ट्रचें

सारांश महाराष्ट्र नाट्यकलेचा प्रसार बंद होण्यास काय कारणें असावींत, याबद्दल वर सांगितलेल्या कारणाशिवाय दुसरें बलवत्तर कारण सांपडत नाहीं. व इतिहासदृष्ट्या दुसरें कांहीं सबळ प्रत्यंतर सां-

---

( टीप मागील पृष्ठांवरून ).

राष्ट्र जसें काय अगदीं खवळून जातें. त्याच संधीस ज्याप्रमाणें समुद्रमंथनकाळीं चंद्रलक्ष्म्यादि रत्नांचा प्रादुर्भाव झाला, तद्वतच वक्तृत्व, कविता, इतिहास इत्यादिकांचा अशा काळीं उदय होतो. या महा सिद्धांताचा प्रत्यय आजपर्यंत अनेक वेळां घडून आला आहे. प्राचीनकाळीं अप्रसिद्ध असा जो ग्रीक व ट्रोजन यांचा संग्राम झाला. त्याच्याच पुढें कांहीं काळानें होमर याची कविताशक्ति प्रगट झाली. व हीच गोष्ट आपल्या रामायण, भारत या दोन्ही ग्रंथांस अगदीं लागू पडते. पुढें ग्रीक व पारसी लोकांचें मोठें दारुण युद्ध माजलें. तें असें कीं, तें अगदीं विझवण्यास सुमारें दोनशें वर्षें लागलीं. त्याच वेळेस ग्रीक भाषेंत पहिल्यानें इतिहासाची प्रवृत्ति हिराडोटस यानें केली. व अथेन्स येथें अनेक नाटककार होऊन रंगभूमीवर नाटकांचा समारंभ होऊं लागला. त्यानंतर अथेन्स व स्पार्टा या संस्थांची लढाई चालू झाली. या वेळेस थसीदैतीस यानें आपला अत्युत्कृष्ट इतिहास लिहिला. आणि इतिहासच काय, पण एकंदर सर्व विद्या व सर्व कला या अति विख्यातकाळीं कळसास जाऊन पोंचल्या. पुढें फिलीप राजानें सर्व ग्रीस देश पादाक्रांत करण्याचा बेत मांडला, त्या वेळेस अथेन्स शहरांत बारा मोठे मोठे वक्ते झाले व त्या सर्वांत दिमास्थेनीस हा अग्रगण्य झाला. या महावक्त्यांचीं नांवें जगविख्यात आहेत. व यांच्या सरासरी बरोबरीस येणारे असे त्याच्या वेळेपासून आतांपर्यंत एक दोनच वक्ते निपजले. ही गोष्ट एकट्या ग्रीस देशाचीच झाली. आतां रोमन लोकांच्या इतिहासांत पाहिलें तरी असेंच आढळतें कीं, त्यांच्या कवितेचा जन्म कार्थेज शहराशीं ज्या काळीं भयंकर युद्ध चाललें होतें त्याच काळांत झाला; आणि प्रजासत्ताक राज्य अगदीं मोडकळीस आल्याच्या वेळीं जो मोठा दंगा इतली देशांत उसळला होता, याच वेळेस विख्यात वक्ता सिसरो, व्हर्जिल, होरेस वगैरे महा कवि व कित्येक इतिहासकारही उदयास आले. इंग्लंडच्या इतिहासांतही असेच प्रत्यय आढळतात. महान ग्रंथकारांचीं अशीं वचनें आहेत कीं, शेक्सपियर जो इतका लोकोत्तर कवि झाला तो त्याच्या आधीं ज्या रोझेसच्या म्हणजे राजकीय घराण्यांतील भाऊबंदांच्या भयंकर लढाया इंग्लंडांत झाल्या, त्यांच्याचमुळें झाला. हें म्हणणें तरी समजणें फार कठीण आहे असें नाहीं. वर सांगितलेल्या लढाया शेक्सपीयर याच्या जन्मभूमीजवळ जवळच बहुतेक झाल्या असून त्या होऊन पुरतीं शंभर वर्षेंही झालीं नव्हतीं. शिवाय भाऊबंदकीच्या दाव्यास पेटून दोन्हीही पक्षांनीं अशीं घोर कृत्यें केलीं हो-

पडल्याशिवाय नुसतीं अनुमानें देण्यांत विशेष अर्थ नाहीं. आमच्याकडे निदान तीनशें वर्षें तरी नाट्यकला लोपली होती खरी. मात्र

---

( टीप मागील पृष्ठावरून ).

तीं कीं, त्यांची आठवण या कवीच्या वेळेस तर अगदींच बुजाली नसेल. तेव्हां जें स्थळ पहावें, जी गोष्ट ऐकावी त्या सर्वांवरून झालेल्या भयंकर गोष्टी जशा काय डोळ्यांपुढें उभ्या रहाव्या असें अशा वेळेस असतें. मग ज्या अर्थी कवि अत्यंत सहृदय असतात त्या अर्थी पाहिलेले पदार्थ व ऐकलेल्या गोष्टी त्यांच्या मनावर अगदीं पूर्णपणें ठसलेल्या राहतात. त्यांतूनही शेक्सपीयर कवीची कल्पनाशक्ति अत्यंत विशाल असल्यामुळें, मागें झालेल्या सर्व गोष्टी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्याप्रमाणें त्याच्या मनास भासत असतील. यावरून पाहतां हें स्पष्ट आहे कीं, मनुष्याची बुद्धि जात्या कितीही प्रखर असली तरी समयविशेषीं तिला अधिक तीव्रता येते. मिल्टनही एका मोठ्या राज्यक्रांतीच्या समयींच होता; व त्या वेळेच्या वाईट स्थितीस अनुलक्षून लिहिलेले त्याच्या कवितेंत लेखही आहेत. वुईल्यम पिट ऊर्फ च्याथ्याम या नांवाचा एक मोठा वक्ता इंग्लंडांत होऊन गेला. त्याच्याच वेळेस अमेरिकेंतील इंग्रजी संस्थानांनीं युद्ध करून आपलें स्वातंत्र्य संपादन केलें. आणि याच प्रसंगानें त्याच्या वक्तृत्वशक्तीस पुष्कळ उत्तेजन आलें. हीं जीं इतकीं निरनिराळ्या देशांतलीं उदाहरणें सांगितलीं यांवरून आरंभीं सांगितलेल्या सिद्धांताची सत्यता अगदीं स्पष्ट होते. पण इतक्यापेक्षां जबरदस्त प्रमाण पाहिजे असल्यास तें हें होय कीं, उलटपक्षीं पाहिलें असतांही वरील सिद्धांताच्या उलटच प्रत्यय येतो. ग्रीस देशाचें स्वातंत्र्य नष्ट होऊन आज दोन हजारांवर वर्षें होऊन गेलीं, पण इतक्या काळांत एक तरी सफोक्लीज, दिमास्थेनीस किंवा हिरादतस जन्मावयाचा होता. रोम येथें बादशाई झाल्यावर बहुतेक सगळी झोटिंग पाच्छाईच माजली होती; पण मध्यें मध्यें जेव्हां कोणी प्रतापशील बादशहा झाले त्या त्या वेळीं माल लिव्ही, प्लुतार्क वगैरे कोणी नामांकित ग्रंथकार झाले. बाकी शेवटपर्यंत शून्याकारच. फार काय, पण आपल्या देशांतही वक्ते, इतिहासकार नसण्याचेंही तेंच कारण: व सध्यां त्या न्यूनता पूर्ण करण्याविषयीं जे प्रयत्न चालले आहेत ते कळकावर कळक घासून वणवा उत्पन्न करून पाहण्यासारखे किंवा कृत्रिम योजनांनीं भूकंपाचा चमत्कार घडवून आणण्यासारखे प्राय: होत. हे प्रयत्न सर्वथा निष्फळ होतील असें आमचें म्हणणें नाहीं; पण त्यापासून जी सिद्धि होणार ती झाल्यास फारच थोडी होईल यांत अगदीं संदेह नाहीं. ”

[ सदर लेख विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा आहे असें म्हणतात. शाळापत्रकांतून १८७२ सालच्या ज्ञानप्रकाश पत्रांत बऱ्याच अंकांत हा विषय प्रसिद्ध झाला आहे. ]



विष्णु अमृत ऊर्फ विष्णुदास भावे
आद्य महाराष्ट्रीय नाटककार.

चित्रशाळा प्रेस, पुणें.

काशीकडे, बंगाल्यांत व कर्नाटकाकडे रास, पारिजातक वगैरे कृष्णलीलेसारखे साधारण प्रकार होत असत. परंतु ते गाण्यानाचण्यांत होत असून नाटकपद्धतीप्रमाणें नसत. महाराष्ट्र भाषेंत नाटकाचा प्रकार असा प्रथम **सांगलीचे विष्णु अमृत** ऊर्फ **विष्णुदास भावे** यांनींच सुरू केला व हेच महाराष्ट्र नाट्यकलेचे आद्य कवि होत.*

महाराष्ट्र नाटकपद्धति सुरू होण्यापूर्वी ज्यामध्यें स्त्रीपुरुषांचा सारख्या नात्यानें समावेश होईल असे करमणुकीचे प्रकार जितके सुधारलेल्या राष्ट्रांत आहेत तितके आपल्यांत नव्हते. Ball ( बाल ), ( Masquerade Ball ) ह्मणजे निरनिराळे वेष घेऊन एके ठिकाणीं जमणें, टेनिस, नौकाविहार, वनभोजन, जत्रा, ( Fair ) Skating ह्मणजे बर्फावरून घरळत चालणें, शर्यती इत्यादि इंग्रजी लोकांचे करमणुकीचे खेळ आहेत. यांना इंग्रजींत Popular entertainments म्हणतात. यांत स्त्रीपुरुषांना मिसळतां येतें. ते लोक वर्षांतून कांहीं तरी दिवस मुद्दाम यांपैकीं कोणत्या तरी एका करमणुकींत घालवितात. †

---

* यांचा जन्म सन १८१९ व मृत्यु ता. ९ आ. १९०१ मध्यें सांगलीस झाला. यांनीं लांकडी चित्राचेही खेळ केले होते. त्यांत द्रौपदी स्वयंवराचीं चित्रें सुबक असून मनुष्याप्रमाणें त्यांच्याकडून कृति करवीत असत. त्यांनीं नाटकाची कला काढली असून ऐन उमेदींतच सोडली, यावरून त्यांना ती पुढें चालवितां आली नाहीं, किंवा तिचा त्यांस कंटाळा आला हें समजत नाहीं. यांनीं धंदा सोडल्यावर तीन चार मंडळ्या बरींच वर्षें चांगल्या भरभराटीस आल्या होत्या.

† इंग्लंडसारख्या सुधारलेल्या देशांतील लोकांची नाटकाची करमणूक ह्मणजे दिनचर्येंतील अवश्यक गोष्टींपैकीं एक आहे. चार सुशिक्षित मंडळी जमली कीं, नाटक पात्राविषयीं व नाटकग्रंथाविषयीं तेथें चर्चा चालू असते व ती फार मार्मिकपणाची असते. नवीन नाटक रंगभूमीवर यावयाचें असेल तो दिवस तर एखाद्या सणासारखा ते लोक समजतात. पुढील उताऱ्यावरून या गोष्टीची सत्यता कळून येईल:

" Whatever may be the condition or prospects of the drama in England there can be no doubt as to its claim to be considered a popular institution or that for an increasingly large number of persons the stage supplies

अशा प्रकारच्या आमच्यांतल्या सामाजिक करमणुकी ह्मणजे उत्सव, यात्रा व कथापुराणें या पूर्वींपासून असत; परंतु यांना एक प्रकारचें धार्मिक स्वरूप आहे. निव्वळ मनोरंजनाचा प्रकार ह्मणजे नाटकच होय; व तें प्रचारांत आणण्याचें प्रथम श्रेय **विष्णुदास भावे**

---

( टीप मागील पृष्ठावरून ).

the chief if not the only culture they know. The theatre has become in London not merely an occasional amusement but a regular pursuit. Among classes socially quite distinct and different the chief idea of an evening's amusement is the play. One finds it at the East End where the same persons repair nightly to witness over and over again the same performance. The same fact meets one at the West End where the theatre is not only a place in which to sit still and laugh or wonder according as the spirit of comedy or tragic awe is in the ascendent, but a loung where cigarrettes may be smloked friends may be met and chatted with and the news of the evening obtained....There is further a large percentage of young men sufficiently well-to-do, who, if they have their offices in the day and their chambers and clubs in the night are not overburdened with social engagements and may perhaps prefer the independence of the playhouse to the hospitable constraints of a decorous dinner table. With these the theatre is not the least important of business of their lives. There is not a new piece that is produced which they miss. They are seldom absent on first nights. They know the critics by sight. They belong probably to some one or other of the minor literary or dramatic clubs. They skim the newspapers of the morning and evening, serious study is not to their taste, and the theatre is."

England its people, polity and pursuits.

यांनीं घेतलें आहे. **भावे** हे **सांगली** संस्थानांत नोकर असून मोठे कल्पक असत. त्या वेळच्या साधारण लोकस्थितीला अनुसरून त्यांनीं नाटकाला फारच बाळबोध वळण दिलें होतें. पुढें जसा जसा अनुभव वाढत चालला व सुधारलेले नाटकाचे प्रकार दृष्टीस पडूं लागले तसा **भावे** यांच्या पद्धतींतला उणेपणा दिसू लागला ही गोष्ट निराळी; परंतु नाटकाचा नुसता आमच्याकडे आरंभच होता तेव्हां चांगल्या सामुग्रीच्या अभावीं त्यांनीं ही पद्धत सुरू करतांना जी कल्पकता योजली ती अगदीं प्रशंसनीय होती यांत शंका नाहीं. सुमारें १८४२ मध्यें एक कर्नाटकी खेळ **सांगलीस** आला होता तो पाहून तेथील संस्थानिक **श्रीमंत अप्पासाहेब** यांचे मनांत अशीं करमणूक आपल्याकडेही असावी असें आलें व त्यांनीं **भावे** यांस अशा पद्धतीवर नाटक रचण्यास सांगितलें. या संबंधानें **भावे** यांनीं आपल्या एका गणपती स्मरणाच्या पद्यांत माहिती दिली आहे ती येणें प्रमाणें:—

करनाटकी नाटक करावयास्तव इच्छा भासे सभाजना गजानना ॥ ध्रु० ॥
सकलारंभीं तुझें स्तवन करितां जातीं विघ्नें पळून येई येई गुणज्ञा ॥ १ ॥
कैसें होईल सभारंजन शंका चित्तीं पाहाहातून द्या सुमती या हो अज्ञा ॥२॥
चिंतामणि अप्पा साहेब यांनीं हा हेतु जाणुनि सांगली स्थानीं विष्णुदासाप्रति केली आज्ञा ॥ ३ ॥

हा काल ह्मणजे अगदीं अव्वल इंग्रजीचा होता. स्वराज्य गेल्याचें औदासिन्य खालसातींतल्या मुलखांत अद्याप कायम होतें व इंग्रजी शिक्षणाचे दैदीप्यमान प्रकार माहीत नव्हते. या वेळेची एका उच्च वर्णांतली विद्यासंपन्नता दशग्रंथी ब्राह्मणांत किंवा पुराण सांगणाऱ्या शास्त्री वर्गांत समजली जात असे. बाकी कारकुनीच्या पलीकडे कोणाचें ज्ञान नसे. ही एका वर्गांतली स्थिति झाली. दुसऱ्या वर्गानें नुक्तें शस्त्र खालीं ठेवून पुनः नांगर हातीं धरला होता. सारांश "रानटी" स्थितीचा अस्त आणि "सुधारणे" चा उदय यांच्या संधिप्रकाशांत नाटककलेची कल्पना आमच्यांत उद्भवली आहे. त्यामुळें **भावे** यांच्या उद्योगाला जी मंडळी त्या वेळीं मिळाली ती हल्लींच्या स्थितीच्या अगाध ज्ञानाच्या तुलनेनें अशिक्षित म्हणतां येईल. परंतु त्या वेळचें शिक्षण आणि विद्या यांची कल्पना मनांत आणली ह्मणजे त्या मंड-

ळीला अशिक्षित ह्मणतां यावयाचें नाहीं. त्या वेळेला जी मंडळी मिळाली त्यापेक्षां निराळी मिळणें शक्य नव्हतें. शिवाय नाटक ही कल्पना त्यावेळीं अगदीं नवी होती; त्या कलेची योग्यता व तिचा पूर्व इतिहास, त्यावेळीं **सांगली** सारख्या अगदीं एकीकडच्या भागांत समजणें शक्य नव्हतें, त्यामुळें **भावे** यांना लोकांची अनुकूलता असणें संभवनीय नव्हतें; परंतु राजाश्रयाचा नेट होता ह्मणून त्यांच्या उद्योगाला यश आलें.

**भावे** यांनीं पौराणिक कथाभाग नाटकरूपानें दाखविण्याचा प्रघात पाडला. **रामायण, भारत व भागवत** यांतील सुमारें पन्नास सुरस आख्यानांवर त्यांनीं कविता केल्या आहेत. यांच्या कवितेंत विशेष असा आहे कीं, कविता अगदीं प्राकृत, परंतु चाली फारच रसाळ असून प्रसंगाला अनुरूप असत. एक चाल बहुतकरून दुसऱ्या आख्यानांत आढळत नाहीं. कांहीं स्थळीं यांची कविता छंद शास्त्रांतील गणमात्रांच्याच कोष्टकांनीं मोजली तर अशुद्ध आढळून येईल; परंतु हरिश्चंद्र, रासक्रीडा, कात्यायनीव्रत इत्यादि नाटकांतली कविता फारच हृद्यद्रावक, मनोरम व रसाळ आहे. यांच्या नाटकांतलीं कांहीं पद्यें कथाभागाची माहिती देण्याकरितां आहेत, कांहीं पात्रांना भाषणें सुचविण्याकरितां आहेत व कांहीं पात्रांना स्वतः ह्मणतां येण्यासारखीं आहेत. त्यांपैकीं प्रत्येकांतलें एकेक पद्य पुढें दिलें आहे:

**गणपतीचें नमनाचें पद्य.**

राग यमन ताल धुमाळी.

श्रीगजवदना दे मति दीना करावया नूतन कवना ॥ धृ० ॥ अष्टदश पुराणें सुरस हीं गाऊं करूं कैचें जन रंजना ॥ १ ॥ सुरस कथानकें वेचक घेऊन करूं इच्छित नाटकें नाना ॥ २ ॥ ईशचरित काय पामर वर्णिल जेथें थकली अहिरसना ॥३॥ नाहीं ज्ञान हा दास विष्णु तव लीन पदीं करि सज्ञाना ॥४॥

पात्रानें स्वतः म्हणण्याचें पद. **रामाला** वनवासाला न पाठविण्याविषयीं **दशरथराजा कैकयीची** विनवणी करीत आहे तो प्रसंग:

**खमाज ताल एका.**

एक कैकयी राघव वनीं पाठवूं नको गे ॥ धृ० ॥ सुकुमार बाल लहान ॥ वनीं क्षुधा लागल्या तहान कोण देईल अन्नपान सांग तरी सखे गे ॥ १ ॥

न साहे सीत उष्ण ॥ कोमल तनु वय लहान मजसी प्रिय प्राणाहून आवडता प्रिये गे ॥ २ ॥ पुत्र विरहें जाईल प्राण ॥ आहे शाप मजलागून काय दुष्ट हेतु धरून सांगसी असें गे ॥ ३ ॥

कथाभागाची माहिती होण्याकरितां सूत्रधारानें म्हणावयाचें द्रौपदीवस्त्रहरणांतलें पदः

**राग यमन ताल धुमाळी.**

काय झालें पुढतीं महाभारतीं सभापर्व अंतीं कपटद्यूत पणिं जिंकिल्यावरी पांडवांशीं ॥ १ ॥ भीष्म द्रोण कर्णसहित कौरव राजे असंख्यात पांडवांतें सभेंत अति अन्यायें जिंकिति पणीं त्यासह संपत्तिसी ॥ पापखाणी ॥ २ ॥ स्वघातक मतिहीन खळ कुटील सदा अभिमानीं मग्न अनर्थकारक काय बोलत तेव्हां विदुरासी ॥ अज्ञानी ॥ ३ ॥

पौराणिक नाटकें १८४३ पासून १८९५।९६ पर्यंत प्रचलित होतीं. परंतु त्यांची विशेष भरभराट ह्मणजे १८६० पासून सुमारें १८८०।८१ पर्यंत होती. एवढ्यांत सुमारें पंचवीस तीस नाटकमंडळ्या झाल्या असतील; परंतु बहुतेक **भावे** यांच्याच कविता उपयोगांत आणीत असत. एक **इचलकरंजीकर** नाटकमंडळी **इचलकरंजीचेच** कोणी **बाबाजी दातार** यांच्या कविता ह्मणत असे. या कविता चांगल्या असत. पुढील शेजारतीचें पद्य त्यांचें आहे:

लक्ष्मी प्रभुसी म्हणे आदरें विभो व्यंकटाधीश दयाब्धे सुरगण मुगुटमणे ॥ सुरेश्वर ॥ रजनी बहु झाली आतां ही शेषमंचकावरि पुष्पांची शय्या ही रचिली ॥ पहा ही ॥ रंगीत पुष्पांनीं काढिला नवरंगी गालिच्या सभोंवतीं वर बुट मुलतानी तऱ्हेचे ॥ हंड्या बहु रंगी लाविल्या वर भरगची छत वाळ्याचें पडदे हो कालिंदी ॥ तऱ्हेचे ॥ मज हुडकित फिरतां विपिनीं आहा सीते श्रम बहु झाले तुजसी असें म्हणतां ॥ वनांतीं ॥ पालय निजदासं विपन्नं पाडुरंगकं रचितं भो श्री उद्धरि सायासं ॥ दयाघन ॥

**पुण्यास नाना सोनी** ह्मणून एक गृहस्थ होते. त्यांनीं **विष्णुदास भावे** यांच्या ईर्षेवर स्वतंत्र मंडळी काढून आपल्याच कवितेवर नाटकें बसविलीं होतीं.* त्यांनीं बभ्रुवाहन, विराटपर्व, अंगदशिष्टाई, सुलोचना

---

*याही गृहस्थाचें चरित्र बरेंच विचित्र (chequered) आहे. हें प्रस्तुत चरित्रनायकाच्या कथेशीं बरेंच जुळतें. नाना प्रथमतः सांगलीहून आपल्या वयाच्या ते-

(टीप पुढें चालू.)

इत्यादि कथाभागांवर कविता केल्या आहेत. परंतु आतां त्या म्हणण्याचा प्रसंग नसल्यामुळें फारशा उपलब्ध नाहींत. त्यांची कविता विष्णुपंतापेक्षां रसभरित, जोरदार व शब्दरचना गोड असे. पुढील पद्यें त्यांचीं आहेतः

**गणपतिस्तवनाचें पद.**

गजानना दे दर्शन सत्वर श्रमि मी आहें तुझा किंकर ॥ तोडी बंधन हे सूत्रधारा हर दुःखपसारा ॥ धृ० ॥ नाम तुझें मीं घेऊनि देवा आरंभिली ही नाटक सेवा ॥ नाटकबाला करि प्रतिपाला शंभो कुमरा ॥ १ ॥ तव नामामृतरस श्रवणानें तोडी जगाचीं भवबंधनें ॥ सुमुखादि नामें तुज बारा हे जगदोद्धारा ॥२॥ राम तज्जुज हा नारायण तो निशिदिनीं तवपदीं भजनीं रमतो ॥ वारीं निरसी हे मम घोरा शंभो कुमरा ॥ ३ ॥

रावणानें सीतेला, रामचंद्र युद्धांत पडला आहे, आतां तूं मला वश हो असें सांगून, रामलक्ष्मणाचीं मायावी शिरें आणून त्यानें तिच्यापुढें ठेवलीं त्या प्रसंगावरचें पदः

---

( टीप मागील पृष्ठावरून )

वीस चोविसाव्या वर्षीं १८५४ सालीं पुण्यास आले. कांहीं महिने बुधवारवाड्यांत त्यावेळीं एक नंबरची शाळा होती तिचे हेडमास्तर केशवराव भवाळकर यांच्या हाताखालीं शिक्षक होते. १८५५ सालीं विष्णुदासाचें नाटक पुण्यास यांच्या पाहण्यांत येऊन सहा महिन्यांच्या आंतच ईर्षेनें त्यानीं स्वतंत्र मंडळी जमवून नाटकही करून दाखविलें. तें त्या वेळीं कृष्णशास्त्री चिपळूणकर, सोन्याबापू मांडे इत्यादि मंडळींस फार पसंत पडलें व त्यांच्याच उत्तेजनावरून त्यांनीं मंडळी अहमदनगर, येवलें, नाशीक वगैरेकडे फिरवून फार चांगला लौकिक संपादन केला. सुमारें तीन वर्षें त्यांनीं हा धंदा करून १८५९ मध्यें तो सोडला व नाशकास येऊन ते राहिले. ते बुद्धिबळें खेळण्यांत फार प्रवीण असत. म्हणून पुढें त्यांस धुळ्यास कारसाहेब म्हणून कलेक्टर होते त्यांनीं आपल्या पदरीं नोकरी दिली. सन १८६३।६४ सालीं ते नागपुरास आले व नार्मल स्कुलांत मास्तर झाले. शिवाय साहेबलोकांस शिकविण्याची पंडितगिरी करीत होते. १८६५ सालीं वकिलीच्या परीक्षेंत पास झाले. वकिलीचा धंदा सुमारें १८८६ पर्यंत करून पुष्कळ पैसा व लौकिक कमविला. पुढें वकिली सोडून सुखानें कालक्षेप करीत असतांना १८९२ आगस्टमध्यें यांस देवाज्ञा झाली. त्यांनीं गुरुचरित्रावर हजारबाराशें आर्या केल्या होत्या; परंतु त्या सांप्रत उपलब्ध नाहींत. नागपुराजवळ सिताबर्डीवर यांचा एक वाडा असून एक मुलगा व तीन मुली ही त्यांस संतति आहे.

वदत दानवपाल सति रति देऊनि मम तोषवि मति ॥ नाण पति तव सति चित्ति रघु दळसह ताडिलासे ॥ १ ॥ त्यावरि वरि मसि अवले रघुदेव रणिं रमले ॥ सबलत्वाजें धैर्य धरलें रणि गेलें आजि अवघें ॥२॥ पळूं जातां रघू किन्नर असूर ॥ जाऊनी ते प्रखर गिळीलेंसे ॥ हें जरि मनि सत्य नाणसी ॥ पाव वेगें प्रत्ययाशीं ॥ तों विद्युत्‌जिव्ह शिरें घेऊनि पातलासे ॥ ३ ॥

**रावणास** वश व्हावें म्हणून त्याची स्त्री **मंदोदरी सीतेला** बोध करीत आहे तो वेदांतपर संवादः—

**पद.**

अनेक परी रंगांत रंग न मावे ॥ जल निर्मिति परिसुनि त्यागी कुत्सित मति ॥ अनेकपरिचीं कुल्हार जन तै मृत पात्रा घडविती परिसुनि त्यागी कुत्सित मति ॥ सती दशमुख तो एक वीर ॥ बहु पत्रें एक तरुवर ॥ बहु जलचर एकचि निर ॥ अनेक ॥

यावर **सीता** उत्तर देते ती ओंवीः—

ध्येय, ध्याता ध्यान ॥ ज्ञेय ज्ञाता ज्ञान ॥ नुरे भजक भज्य भजन ॥ सांग रावण तेथें कैसा ॥

याप्रमाणें **नाना सोनी** यांच्या कवितेंत थोडी बहुत कल्पकता दिसून येते. **अण्णा** इनामदार ह्मणून एक गृहस्थ असत. यांनींच नाटकांत स्त्रिया घेण्याची कल्पना काढून ती अमलांत आणली. ही स्त्रीनाटक मंडळी पुष्कळ वर्षें अस्तित्वांत होती. हेही कविता बरी करीत असत. यांनीं **अक्रूरागमनावर** पदें रचलीं आहेत त्यांपैकीं एक पुढें दिलें आहे:

**अक्रूर कृष्णाला** मथुरेस घेऊन जात असतां **गोपी** ह्मणतातः

अक्रुरा करा रथ उभा जरा निश्चिति ॥ मथुरेशीं तुह्मी हा नेऊं नका श्रीपति ॥ ध्रु० ॥ अरे क्रूर घातक्या तुज विनवावें किती ॥ चाल ॥ धांवत धांवत गोपी आल्या शोकें त्या अवला ॥ आह्मां त्यागुनि कैसा जाशी श्रीहरि मथुरेला ॥ आम्ही दीन अनाथ दिसतों तुजविण हरि ॥ नको टाकूं आह्मांला या तापा संहरीं ॥ विरहदुःख आमचें सत्वर हरी ॥ तूं जाशी म्हणुनि जिव घाबरला ॥ आह्मां त्यागुनि ॥ आमुचा प्राणविसावा जातो मथुरापुरीं ॥ त्याविणें विरह हा चेतला आमुचे उरीं ॥ तन्नाश कराया राहे तूं श्रीहरि॥ तुजविण आह्मां चैन पडेना पडती धरणीला ॥ आह्मां त्यागुनि ॥

**तासगांवकर** नाटक मंडळींत **अनंत बुवा** ऊर्फ **नाना बुवा बुधकर** हे एक बऱ्यांपैकीं कवि असत. **कंसानें वसुदेवदेवकीस** बं-

दिवासांत टाकलें असतांना देवकीस जीं मुलें होत तीं कंस एकामागून एक मारून टाकीत असे. त्या प्रसंगानें देवकी ह्मणतेः

देवकी कंसासी बोले विनय वचना ॥ पूर्वी पाहिलासे कुमर ॥ काय पहासी वारंवार ॥ तुझ्या मनिं कीं साचार ॥ दुष्टबुद्धि गमते मना ॥ १ ॥ तुवां दिधली ही भिक्षा ॥ आतां नलगे यासी शिक्षा ॥ हेचि माझि से अपेक्षा ॥ बोल माझे आणि मना ॥२॥ बाळहत्त्येच्या दोषासी ॥ निज शिरीं कां तूं घेशी ॥ याचि दोषें आयुष्यासी ॥ विघ्नें भंगितातीं नाना ॥ ३ ॥ तुझा शत्रूसे आठवा ॥ नेम हा तुजसी ठावा ॥ येवढा हा मातें द्यावा ॥ क्रिडे तोषवाया मना ॥ ४ ॥ परि तो नायके खळ ॥ ओढोनिया घेइ बाळ ॥ द्वारि होति चंडशीळ ॥ आपटोनी चाले सदना ॥ ५ ॥ पाहुनि देवकि रुदे ॥ वसुदेव तितें वदे ॥ दुःख आतां मना न दे ॥ अनंतासी आणि ध्याना ॥ ६ ॥

याशिवाय रावजी शहरकर, बळवंतराव शहरकर, रावजी बर्वे, इत्यादिकांच्या कविता पुणेंकर नाटक मंडळी ह्मणत असत. सखाराम बोवा चांबळीकर सरनाईक यांनीं सुरथसुधन्वा, नरनारायण चरित्र वगैरे आख्यानावर कविता केल्या होत्या; त्या सांगलीकर नाटक मंडळी ह्मणत असे. कोल्हापूरकर नाटक मंडळी, गोविंददास कवीच्या कांहीं कविता ह्मणत असे. या कवीचें बाणासूर आख्यान प्रसिद्ध आहे: इचलकरंजीचे बाबाजी दातार व कोल्हापुरचे हे गोविंद कवि यांचीं पद्यें बहुतेक लावणीच्या चालीवर असत. यांच्या कवितेचे दोन मासले पुढें दिले आहेतः

धन्य उषा ही बाणकन्यका अति लावण्याची खाणी ॥ स्वरुप रुपाचा ठसा पाहुनि जन हे तिजला वाखाणी ॥ उमावरें अति आनंदानें चिंतित बसली अहर्निशीं ॥ पूर्ण मनोरथ होईल केव्हां कधीं येईल द्वादशी ॥ एक घडी मज युगसम लोटे सखये सदनीं राहू कशी ॥ शीव गौरी जशी खेळत होती पतिसह खेळेन काय तशी ॥ १ ॥

पद दुसरेंः

सांगे सुंदरी सखये मंदिरीं वरिलेंस कवणाला ॥ कांगे जाहलीस निष्ठुर आतां ॥ हुडकित उठलिस परि न ये हाता ॥ वरिलेंस कवणाला ॥ १ ॥ उषा म्हणे आजि चारी प्रहर गे ॥ जवळी होता प्राणेश्वर गे ॥ रूप तयाचें अति मनोहर गे ॥ मोहोनिया गेला ॥ २ ॥ बाळा बोलूनि मूर्च्छित पडली ॥ गोविंदाच्या पदिं अनुसरली ॥ दासीनें त्या सावध केली ॥ शिंपुनि उदकाला ॥ ३ ॥

पौराणिक नाटकाच्या पन्नास वर्षांत याप्रमाणें निरनिराळे कवि झाले आहेत. या प्रत्येकाच्या कवितेंत विशेष हा आहे कीं, प्रत्येकानें आपापल्या पदांच्या चाली निराळ्या घातल्या आहेत. व प्रत्येकाच्या कवितेंत जरी कांहीं दोष आहेत तरी साधेपणा, सहजपणा व रसाळपणा हे गुण त्यांत आढळून येतात. संगीत नाटकापासून जे कवि झाले आहेत त्यांपैकीं एक दोघांच्याच ठिकाणीं हे गुण असलेले दिसतात. बाकीच्या सर्वांनीं दुसऱ्याच्या नव्या चाली व पद्धत उसनवार घेऊन आपलें कवित्व चालविलेलें आढळून येतें.

या सर्व कवींत **भावे** हेच विशेष प्रसिद्ध होते व यांच्याच कवितेवर सर्व नाटकें चालत होतीं. जुन्या नाटकमंडळीची सर्व भिस्त सूत्रधारावर असावयाची. नाटकाला संविधानकचातुर्य लागतें याची कल्पना त्या वेळीं नव्हती. अशा वेळीं नाटकांत रसोत्पत्तीला सूत्रधाराकडून या कवितांची पुष्कळ मदत होत असे. हरिश्चंद्र आख्यान, बभ्रुवाहन आख्यान, गोफ टिपऱ्यांचा रास, कात्यायनी व्रत, इंद्रजित वध किंवा सुलोचना आख्यान, दक्षप्रजापति यज्ञ, पारिजातक, कचदेवयानी, लहुकुश आख्यान, ( उत्तर रामचरित्र ) द्रौपदीवस्त्रहरण, प्रमिलास्वयंवर, किरातार्जुन युद्ध, चक्रव्यूह, नृसिंह अवतार अथवा प्र्ल्हादचरित्र, वामन अवतार, ध्रुवचरित्र, सुरथसुधन्वा आख्यान, अंगदशिष्टाई, रावणवध व भरतभेट, शकुंतला, मदालसा इत्यादि कथानकें त्या वेळीं लोकांच्या फार आवडीचीं असत. व हे खेळ करून दाखविणारे लोक जरी अशिक्षित असत, तरीं त्यांनीं जीं कथानकें निवडलीं तीं फार मार्मिकपणानें, लोकांच्या चित्तांचें चांगल्या रीतीनें रंजन करतील अशींच निवडलीं होतीं* सारांश **विष्णुदास भावे** यांनीं उत्पन्न केलेल्या ना-

---

* संस्कृत कवींनीं जीं कल्पित नाटकें रचलीं त्यांशिवाय पौराणिक रचलीं आहेत त्यांत वरच्यापैकीं बरींच नाटकें आहेत. Wilson's Hindu Theatre नांवाचा एक ग्रंथ आहे त्यांत एकंदर संस्कृत नाटकांची यादी दिली आहे ती येणेंप्रमाणें:

( टीप पुढें चालू ).

ट्यकलेचा याप्रमाणें पाया प्रथम महाराष्ट्रांत कायम होऊन ती कला सार्वजनिक करमणूक झाली. या पायावर पुढें कशा कशा इमारती झा-

---

( टीप मागील पृष्ठावरून ).

१ मृच्छकटिक.
२ शकुंतला.
३ विक्रमोर्वशीय.
४ मालविकाग्निमित्र.
५ उत्तररामचरित्र.
६ मालतीमाधव.
७ वेणीसंहार.
८ मुद्राराक्षस.
९ उदात्तराघव.
१० हनुमानन्नाटक.
११ रत्नावली.
१२ विद्धशालभंजिका.
१३ बालरामायण.
१४ प्रचंडपांडव.
१५ कर्पूरमंजरी.
१६ जामदग्न्यजय.
१७ समुद्रमंथन.
१८ त्रिपूरदाह.
१९ धनंजयविजय.
२० अनर्घ्यराघव.
२१ शारदातीलक.
२२ ययातिचरित्र.
२३ ययातिविजय.
२४ ययातिशर्मिष्ठा.
२५ दूतांगद.
२६ मृगांकलेखा.
२७ विदग्धमाधव.
२८ अभिराममणि.
२९ मधुरानिरुद्ध.
३० कंसवध.
३१ प्रद्युम्नविजय.
३२ श्रीदामचरित्र.
३३ धूर्तवर्तक.
३४ धूर्तसमागम.
३५ हास्यार्णव.
३६ कौतुकसर्वस्व.
३७ प्रबोधचंद्रोदय.
३८ रामाभ्युदय.
३९ कुंदमाला.
४० सौंगधिकाहरण.
४१ कुसुमशेखरविजय.
४२ रैवतकमदनिका.
४३ नर्मवति.
४४ विलासवति.
४५ शृंगारतिलक.
४६ देवी-महादेव.
४७ यादवोदय.
४८ वालीवध.
४९ अनेकमूर्त.
५० मयकपालिका.
५१ क्रीडारसानल.
५२ कनकावतिमाधव.
५३ बिंदुमति.
५४ केलीरैवत.
५५ कामदत्ता.
५६ संकल्पसूर्योदय.
५७ सुदर्शनविजय.
५८ वसंतिकापरिणय.
५९ चित्रयज्ञ.

( टीप पुढें चालू ).

ल्या याचा इतिहास क्रमाक्रमानें येईलच. परंतु प्रथम ज्यानें स्वतांच्या कल्पनेनें पौराणिक नाट्यकला प्रचारांत आणली त्याचें इतिहासदृष्ट्या महत्त्व निःसंशय अधिक आहे.

सन १८९६ सालच्या ज्ञानप्रकाश पत्रांतून पौराणिक नाटकांसंबंधानें पुढील उतारे घेतले आहेत त्यावरून लोकांची अभिरुचि त्या वेळीं कशी होती हें कळून येतें.

( १ ) " या ( सांगलीकर ) मंडळीस शोकरस व वीररस उत्तम साधला आहे. भाषाही शुद्ध, प्रौढ, मारू आणि यथातथ्य आहे. तात्पर्य हेंच सांगणें कीं, या नाटकवाल्यांनीं हलकटपणा ज्यांत बहुत होतो असे जे तमाशे, लळीतें यावरची रुचि बहुतेक उडविली व त्यांचे तमाशेही कमी करून टाकले. "

( २ ) " गेल्या आठराव्या तारखेच्या दीपिकेंत आमच्या पत्रांतील सांगलीकर नाटककार यांच्याविषयींची खबर घेऊन खालीं असें जोडलें आहे कीं, सदहू नाटककारांनीं उपयुक्त नाटकें केलीं नसतील तर रामायणांतील केलेल्या नाटकापासून आमच्या लोकांस फायदा होईल असें वाटत नाहीं. आतां यांत लिहितांना आमच्या दीपिकाकारानें लिहावयाचें होतें कीं, नवीन नाटकें त्यांनीं केल्यास अधिक उपयोगी; परंतु प्राचीन महाभारत, रामायणादि वंद्य व मनोरंजक ग्रंथ त्यांतील विषय लोकांच्या हितावह नाहींत असें दाखविणें हें बरोबर त्या पत्रकर्त्यानें केलें नाहीं असें आह्मांस वाटतें. जर विचार करून पाहिलें तर रामायण महाभारत ग्रंथांतील ज्या गोष्टी आहेत त्या अशा चित्तवेधक आहेत कीं, सुज्ञ व भाषाभिज्ञ लोक त्या ग्रंथांविषयीं माना डोलविल्यांवाचून राहतच नाहींत. जर अशा ग्रंथाच्या आधारें झालेल्या नाटकापासून लोकांस फायदा कांहींच होत नाहीं असें दीपिकाकारांचें मत असेल, आणि सोकाजी, काजी, रत्नी, मोगऱ्या या पात्रांवर दीपिकाकारांनीं आपलें बुद्धिचातुर्य खर्च करून रचलेलीं नाटकें जर मनोरंजक व लोकोपयोगीं असें त्यांस व ज्या लोकांस वाटत असेल

---

( टीप मागील पृष्ठावरून. )

यांशिवाय जानकीपरिणय, पार्वतीपरिणय, प्रसन्नराघव वगैरे नाटकें आहेत. तीं हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर उपलब्ध झालीं आहेत असें वाटतें.

त्यांस आमचा मित्र "प्रभाकर" यानें नोंदलेलें सोकाजी, पुतळाजी हेंच विशेषण देतों. ही दीपिकावाल्यासही मोठी शरम आहे कीं, सांगलीकर यांनीं रामायण, महाभारताच्या आधारें रचलेलीं सुरस व मनोरंजक नाटकें तीं निरुपयोगी व दीपिकेंतलीं व चंद्रिकेंतलीं पचपचीत व घाणेरीं जीं अत्यंत उपयोगी होत."

त्या वेळेच्या व प्रस्तुतच्या भाषापद्धतींत किती फरक पडला हेंही वरील उताऱ्यांवरून समजून येईल.

---

## नाटकधंद्याविषयीं लोकांच्या समजुती.

नाटकाचा धंदा फारसा प्रतिष्ठित मानिला जात नाहीं याला अनेक कारणें आहेत. एक तर हा धंदा करणारांनीं आपली वागणूक लोकरीतीच्या अगदीं विरुद्ध ठेवली होती. त्यांचे पोषाख, त्यांचा व्यवसाय, त्यांचे विचार, रीतिभाति वगैरे सर्व कांहीं व्यवहार सोडून असे. नाटकवाला पांचशें मंडळींतून ओळखून काढतां यावा अशाच तऱ्हेची त्यांची चाल रीत असल्या कारणानें त्या धंद्यांतल्या लोकांविषयीं इतर लोकांच्या मनांत स्वाभाविकच खंती उत्पन्न होत असे. त्या लोकांचीं नाटकें आवडत असत; परंतु नाटकमंडळीशीं विशेष सलोखा, संघट्टन किंवा तिच्याविषयीं आदर पहिल्यापासूनच लोकांच्या मनांत वसत नसे. शास्त्रदृष्टीनें तर नाटक पाहणेंही त्याज्य समजलें जात असे. कोठें कोठें नटांचें तोंड पाहणारांवर ग्रामण्यें झाल्याच्याही गोष्टी ऐकिवांत येत असत.* हा धंदा वाईट असें समजण्याला दुसरें एक कारण झालें कीं,

---

* हा दुराग्रहाचा प्रकार आपल्याकडेच होता असें नाहीं. तर जेथें हल्लीं नाट्यकला ऊर्जित दशेला आली आहे म्हणून म्हणतात, तेथेंही हाच प्रकार होता. तेथें नाटक पहाण्यास जाणारांना सुद्धां बहिष्कार घालीत असत व नाटकमंडळीस "हलकट" व "हुच" समजलें जात असे. आलीकडे कोठें नटांची मानमान्यता तिकडे होऊं लागली आहे. हें पुढील उताऱ्यावरून समजेल:

".....Notwithstanding all this however, it cannot be denied that the English stage has made great advance

(टीप पुढें चालू.)

या धंद्याला चांगलें स्वरूप आणण्याचे प्रयत्न कोणींच केले नाहींत. एकदां या धंद्यांत मनुष्य गेला कीं सर्वप्रकारें त्याच्या जन्माचें मातेरें

( टीप मागील पृष्ठावरून ).

during the last few decades, and this is not only in respect its art but also and more particularly in respect of those cannected with it. It is not so very long since the doors of the "respectable" houses were shut against those who even went to the "play house;" and now they are open widly open, almost every where, to the players themselves. Actors formerly were trealed as "rogues and vagabonds". and now they share with the curates the privilages of being the especial darlings of society.' London Life.

सन १८७० च्या डिसेंबरच्या विविधज्ञानविस्तारांत "नाटक" विषयावर एक निबंध प्रसिद्ध झाला होता. त्यांत आपल्या नाटकपद्धतींवर बरेंच विवेचन केलें आहे. त्यांतील कांहीं भाग पुढें दिला आहे.

"सांप्रतकालीं आपल्या देशांत नाटकें करण्याचा धंदा अगदीं नीच प्रकारचा मानण्यास आणि तीं पाहण्यास जाणारांनाही लोकदृष्ट्या बरेंच नीचत्व येण्यास त्या नाटकांची अव्यवस्था आणि चावटगिरी या दोन गोष्टी कारण झाल्या असाव्यात असें वाटतें. तरी आलीकडे चावटगिरी पुष्कळच कमी झाली आहे म्हणण्यास अडचण नाहीं, हें तरी सुचिन्हच समजावयाचें. या नाटककारांना, इंग्रजी वगैरे भाषेंतील नाटकें फार उत्कृष्ट होत असतात तशीं तुमचीं होतील तर फार चांगलें, असें जर कोणीं सांगितलें तर बहुधा हें उत्तर असतें कीं, "इंग्रजी भाषेलाच ते प्रकार शोभतात; पण आपल्या भाषेमध्यें आपल्या देशाच्या रीतीप्रमाणें नाटकें केलीं तरच तीं बरीं दिसतात; इंग्रजी प्रकार येथें शोभणार नाहींत." याप्रमाणें स्वदेशांतील नाटकविद्येच्या नांवाखालीं आपलें कृत्य जमवून नेण्यास ते पाहतात; परंतु त्यांस आपल्या देशामध्यें तरी प्राचीन नाटकांची पद्धत कशी होती याची माहिती कोठें आहे? वास्तविक पाहतां प्राचीन कवि आणि सांप्रतचे इंग्लिश कवि यांच्या नाटकरचनेमध्यें कांहीं थोड्या गोष्टींविषयीं जरी मतभेद असला, तरी सर्व गोष्टी एकत्र करून, त्यांची परस्पर तुलना करून पाहतां या दोन्ही तऱ्हांमध्यें फारसा भेद नाहीं ही गोष्ट त्यांना ठाऊक नसते. सारांश नाटक म्हणजे तें असावें कसें, त्यांत काय काय गोष्टी निरर्थक व सदोष आहेत यांजकडे यांचें मुळींच लक्ष नसतें."

होत असे. लहानपणाच्या अज्ञानपणाचें प्रायश्चित्त कित्येक होतकरू व बुद्धिमान मुलांना आजन्म भोगणें भाग पडलें आहे. जीं मुलें नाटकांत गेलीं नसतीं तर कदाचित् चांगल्या मार्गानें पुढें आलीं असतीं त्यांचे जन्म वाया जाऊन अगदीं हलक्या स्थितींत त्यांना दिवस काढावे लागले आहेत. अशीं किती तरी उदाहरणें आजपर्यंत घडून आलीं आहेत. आणि अशी स्थिति केवळ, धंदा चालविण्यांत जो एक असभ्यपणा, व व्यवहारशून्यपणा असे, त्यामुळें आली होती. व याचा परिणाम नाटक म्हणजे—गारुडी, तमासगीर यांसारख्या हलक्या प्रतीचा पोटभरू लोकांचा धंदा ही समजूत कायम होऊन बसली.

---

## संगीतापूर्वीचे गद्य नाटककार.

सुमारें १८६० पर्यंत नुसतीं पौराणिक नाटकें प्रचारांत असत. सत्तावन सालच्या बंडाची धामधूम नुकतीच होऊन गेली होती. युनिव्हर्सिटीची स्थापना याच धामधूमीच्या सालांत झाली; व वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणाला उत्तेजन मिळालें. त्यामुळें लोकांच्या विचारांत हळूहळू येथूनच फरक पडूं लागला ह्मटलें तरी हरकत नाहीं व त्यांत नाटकासंबंधाच्याही कल्पना बदलूं लागल्या; व येथून पौराणिक नाटकाबरोबर ऐतिहासिक भाग नाटकरूपानें दाखववावयाचा प्रघात सुरू झाला. याचें श्रेय बऱ्याच अंशानें **विनायक जनार्दन कीर्तने बी. ए.** यांचेकडे आहे. त्यांनीं १८६१ सालीं थोरले **माधवराव पेशवे** यांचें चरित्र नाटकरूपानें छापून प्रसिद्ध केलें. या पुस्तकाचे प्रस्तावनाकार **बाळाजी बापूजी साने बी. ए.** हे लिहितात कीं, "मराठी भाषेंत नाटकें लिहिण्याचा हा आरंभच असून या लहानशा नाटकांत नाटककारानें हास्य व करुणा हे रस चांगले उतरून पुस्तक चांगलें मनोरंजक केलें आहे. हें पाहून नवीन ग्रंथकार नाटकसंग्रहानें आपली भाषा ऊर्जितदशेस आणण्यास उद्युक्त होतील अशी आह्मास पूर्ण आशा आहे." १८६२ सालीं याच नाटकाचे प्रयोग इचलकरंजीकर मंडळी-

कडून होऊन फारच लोकप्रिय झाले आहेत.* १८६० पासून १८७० पर्यंतच्या दहा वर्षांत नाटकविषयासंबंधांत बरेंच स्थित्यंतर घडून आलें. विद्याखात्याच्या आश्रयानें जुन्या संस्कृत नाटकांचीं बरींच भाषांतरें **परशुरामपंततात्या गडबोले** व **कृष्णशास्त्री राजवाडे** वगैरेकडून करविण्यांत आलीं. त्यामुळें चांगलीं चांगलीं संस्कृत नाटकें निव्वळ महाराष्ट्र भाषा जाणणारांस सहज उपलब्ध झालीं.§

प्रथम पौराणिक नाटकें दाखवून "वेळ राहिल्यास फार्स" ची नवी कल्पना नाटकपद्धतींत १८५५ पासून **मुंबईस एक सभ्य अमरचंदवाडी हिंदू नाटक मंडळी** असे, तिनें प्रचारांत आणली. ही मंडळी दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीतल्या गोष्टी रंगभूमीवर दाखवीत असे. नंतर **पुणेंकर** मंडळीही ऐतिहासिक नाटकें करूं लागली. तसेंच मुंबईच्या सन्मार्गदर्शक मंडळीनें सद्यःस्थितीवर कांहीं हास्यकारक व मनोरंजक चुटके करून दाखविण्याचा प्रघात पाडला, त्यामुळें नाटकप्रयोगाला हें एक नवीन वळण मिळालें.

सन १८६९ सालीं **पुण्यास** पौराणिक नाटकांची मोठी चळवळ उडाली होती. त्या चळवळीमुळें पौराणिक नाटकांतील नटांच्या अंगची कर्तबगारी व त्या नाटकांचे लोकरंजनाचे गुण चांगले निदर्शनास आले. **धोंडोपंत सांगलीकर** व दुसरे **श्रीपादपंत लेले सांगलीकर** यांचीं नाटकें **पुण्यास** चाललीं होतीं. या दोघांच्याही संग्रहीं चांगले नाणावलेले

---

* रा. ब. रानडे यांचा मराठी ग्रंथसंग्रहावर १८९८ त टाईम्स आफ् इंडियाच्या जूनच्या २८ व्या अंकांत जो निबंध प्रसिद्ध झाला आहे त्यांत, त्यांनीं आपल्यांत स्वतंत्र कल्पनेचे जे नाटककार झाले, त्यांत सदर कीर्तनें यांस पहिला मान दिला आहे.

§ परशुरामतात्या यांनीं मराठी भाषेची बरीच सेवा केली आहे. हे कविता फार चांगली करीत असत. मोरोपंताच्या आर्या लावण्याच्या कामांत यांचा हातखंडा असे. यांनीं संस्कृत नाटकांचीं भाषांतरें करून लोकांस जशी त्यांची माहिती करून दिली, त्याप्रमाणेंच मराठी कवींचे चांगले चांगले वेंचे घेऊन "नवनीत" या ग्रंथानें लोकांस मराठी कवितेची गोडी लावून दिली. यांचे नवनीत दोन भाग, विष्णुसहस्रनामावर आर्या, बालबोधामृत, वृत्तदर्पण, कादंबरीसार वगैरे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यांचा जन्म शके १७२१ व मृत्यु १७९६ त झाला.

नट असत. एका मंडळीनें प्रथम जो खेळ करून दाखवावयाचा तोच दुसऱ्यानें करून दाखवावयाचा; व दुसऱ्या मंडळीनें जो प्रयोग दाखवावयाचा तोच पहिल्यानें दाखवावयाचा असा यांचा सामना ठरला होता. या सामन्याच्या निवाड्याकरितां **कृष्णशास्त्री चिपळूणकरा**सारखी पुण्यांतील पुढारी व विद्वान् मंडळी पंच असत. किरातार्जुनयुद्ध, शकुंतला, कर्णपर्व इत्यादि खेळ त्या वेळीं एकमेकांकडून मोठ्या स्पर्धेनें व ईर्षेनें करण्यांत आले होते. व ही ईर्षा व स्पर्धा नुसती नाटकमंडळींतच माजून राहिली होती असें नाहीं; तर **पुणें**शहरांतही माजून त्यांत **छत्रे** व **सोलस्कर** असे दोन तट उपस्थित झाले होते. दोनीही नाटकमंडळ्या परठिकाणच्याच, परंतु पक्षाभिमानामुळें गांवांत हे दोन तट झाले. असो पौराणिक नाटकांच्या इतिहासांत प्रसिद्ध अशा दोन नाटकमंडळ्या, व त्यांतील बहुतेक नट आपआपल्या गुणांत वाखाणलेले, गुणाची खरी कसोटी पाहणारी त्या वेळची पुण्याची मार्मिक मंडळी, इतक्या गोष्टी एके वेळीं जमून आल्याकारणानें हा सामन्याचा प्रसंग फार महत्वाचा घडून आला होता.

ह्या चळवळीच्या बरोबरच दुसरी चळवळ ह्मणजे पुनर्विवाहाची. १८७१ सालच्या सुमारास या चळवळीचें दिग्दर्शन नाटकरूपानें होऊं लागलें. प्रथम सामाजिक अशीं नाटकें प्रसिद्ध झालीं तीं **मनोरमा** व **स्वैरसकेशा** हीं होत. इंग्रजी शिक्षणाचा पूर्ण संस्कार झालेल्या लोकांच्या डोक्यांत त्यावेळीं पुनर्विवाह, बालविवाह, परदेशगमन, केशवपन इत्यादि इत्यादि जे विषय घोळत होते त्यांचें सामान्यत्वें निरूपण या नाटकांत ठिकठिकाणीं आहे. या दोन्ही पुस्तकांवर त्यावेळीं कांहीं आक्षेप आलेले आहेत.* ते बरोबर असोत किंवा नसोत, परंतु सद्यः स्थितीचेंही चित्र नाटकांतून दाखवावयाचें ही कल्पना त्यावेळेपासून लोकांच्या मनांत उद्भवूं लागली हें विशेष होय.

१८७० सालीं झांशीच्या राणीच्या चरित्रावर एक साधारणसें नाटक झालें, त्याचे प्रयोग पूर्वीं होत असत. नंतर सन १८७२ सालीं **नीळदर्पण** नांवाचें राजकीय विषयावर असें नाटक प्रसिद्ध झालें.

---

* रा. ब. काशिनाथ बाळकृष्ण मराठे बी. ए. एल्. एल. बी. यांनीं ज्ञानप्रसारक सभेपुढें " नावल व नाटकें " या विषयावर वाचलेला निबंध १८७२.

**बंगाल्या**कडे निळीची लागवड करणारावर जे जुलमाचे प्रकार होत असत त्यांचें चित्र या नाटकांत वठविलें होतें. हें नाटक मूळ बंगाली भाषेंत १८६१ सालीं कोणी **लांग**साहेब यांनीं प्रसिद्ध केलें. त्याचें इंग्रजींत व इंग्रजीचें मराठींत भाषांतर झालें. या साहेबावर नाटक रचल्याबद्दल खटला होऊन त्यांस सजा भोगावी लागली. दंड झाला होता तो लोकांनीं भरला व त्यांस एक मानपत्र दिलें.

या नाटकाचे प्रयोग झाले नाहींत, तरी त्याच्या नुसत्या पुस्तकानेंच बरीच चळवळ उडाली होती असें दिसतें. सन १८७१ सालापासून पुण्यांत **डेक्कन** कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं संस्कृत नाटकें मे महिन्याच्या विश्रांतींत रंगभूमीवर दाखविण्याची सुरवात केली. हें वर्ष नाट्यकलेच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचें होय. **पुणें** शहरांत विद्वान् लोकांनीं नाटकविषयांत तनमन घालण्यास डेक्कन कॉलेजापासून सुरवात केली. हें शहर कांहीं वर्षें मे महिन्यांत विद्वान् लोकांचें मनोरंजनस्थान होतें. अनेक ठिकाणचे विद्वान् लोक येथें येऊन आपला काळ एक महिनाभर अनेक प्रकारच्या करमणुकींत, विद्याविषयकचर्चेंत, मित्रांच्या भेटीच्या आनंदांत व ऋतुपरत्वें प्राप्त होणाऱ्या निर्दोष हवापाण्याच्या उपभोगसौख्यांत घालवीत असत. त्यांतच ही संस्कृत नाटकाची टूम निघाली. प्राचीनकाळीं **कालीदास, भवभूति,** यांचीं नाटकें विद्वान् लोकांपुढें होत असत. तो समाज कशाप्रकारचा असेल याची कल्पना करावयाची असेल तर ती **पुण्यांत** ज्या विद्वत्समाजापुढें संस्कृत नाटकें होत असत त्यावरून होण्यासारखी होती. प्रथम वेणीसंहार नाटकाचा प्रयोग कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं केला. त्याचा उपोद्घात ( Prologue ) व उपसंहार ( Epilogue ) प्रख्यात **विष्णुशास्त्री चिपळूणकर** व **कृष्णाजी परशुराम गाडगीळ** या दोघांनीं विद्यार्थी असतांना संस्कृत व इंग्रजीमध्यें स्वतः केला होता. तो अनुक्रमें पुढें दिला आहे,

“ अहो नु खलु भोः । यदत्राद्य सन्निपतितोऽयमयत्नसुलभो नानादिगंतवासी महाजनसमाजः कौतूहली च यदस्मन्नाट्यदर्शने इत्येतदतीव तोषावहं नः । अपि च पारिषदान् विज्ञापयामः। भो भो यत्किंचिदत्र प्रयोक्तुमुद्यता वयं तद्भवत्सु गुणनिकषग्रावसु सत्सु कां हन्त सिद्धिं लभतामिति बलवता खलु साध्वसेनोपपी-

ज्यते नश्चेतः । याथार्थ्येनाहि यन्नाटकानामभिनयनं तत्तु विविधगुणसाहित्याधीनम् । तत्रादौ तावत्कविहृद्गताभिनिवेशोऽपेक्ष्यते । असौ त्वस्मादृशां महापंडितैरपि प्रायोदुर्विग्राहे संस्कृतविद्यागहने जातप्रवेशमात्रकदुर्विदग्धानाम् कथं नु घटताम् । क्व नाम रसवैदग्ध्यधुरीणाः कृतयः कालिदासभवभूतिप्रभृतीनाम् कवीशानाम् क्वच कथारसिकतोपहतानामलब्धवैदग्ध्यविलासमुग्धानामस्मादृशां धीकार्पण्यम् । प्रायः कवय एव सहृदयास्तथाविधानां महाशयानां कवीन्द्राणां चेतोवगाहने प्रभवंति । तत्रास्माकं पुनः शफरस्येवाल्पस्य महांबुराशिगाहने कीदृक् पांडित्यम् । अन्यच्च न चास्माकं तादृक् पाटवमपि वाचो येन श्रवणमनोमनोज्ञेन मनोगतानपि भावान् प्रकाशयेम । तदेषा सामग्री यया सामाजिकाः सभाजयितव्या अस्माभिः । अनैपुण्यं च नो नाटकानामभिनयने । तथापि युवजनसुलभेन प्रागल्भ्येनौत्सुक्येन च किमपि प्रेर्यमाणानां न एष आरंभः । शक्तिप्रमाणेन च सामाजिकान् पर्युपासितुं प्रयतामहे । तत्क्रियतामत्र वस्तुनि भवद्भिरादरः इत्यलं बहु जल्पितेन । तद्भो भारताः किमद्याप्युदास्यते ।

## Epilogue.

Cease warriors. Sirs, a word before you go,
Awhile your patience on our say bestow.
Last year beheld the budding of our plan,
But fortune oft unequal deals with man.
Though fast it vanished, eager will survived,
This night through storms the bark its part arrived.
I' st then that, we copied old Bombay ?
We answer no ; though others may gainsay.
This noble land of gloom barbaric shorn,
Laughs in the blush of renovated morn.
When western day light streaks upon this clime,
Our novel efforts too with progress chime,
Though some may laugh us out, and set at naught,
Because they saw no feats, no duels faught.

No freakish monkey, no delerious yell,
No lanka's tyrant fierese with fury fell.
No absured songs, no din, no wild attire,
No meaningless uproar, no senseless ire.
Let them what can they, indeseretion's tools,
In turn we laugh them down and deem them fools.
Illiterate players have usurped the stage,
With scences obscene depraved this rising age.
Our's is, what multifarious tratis of life,
The bard depicts in this Puranic strife.
A moral too we show how biting gall,
Embitters the atrocious monarch's fall.
How patient merits ov'r his ruin rise,
How glorious laurels virtue last espies.
Resumed we what adorned king Bhoja's Court,
The fane of Kalidas and wits' resorts.
We showed what Bhatt Narayan's page,
A worthy claimant to possess the stage.
So his fond memory with august fear,
Our efforts, we devote a tribute dear.
To have midst you our joy o'er leaps its line,
This worthy scion of the worthy devine.

( pointing towards Mr. S. Tagore S. S. )

This play was got up in a month and no more,
For college work for us is much in store.
We have' tis true in congruous pieces patched,
And good *personae* with unequal matched.
For this we humbly, sirs your pardon sue,
We feel our errors and grave failings too.
Our Doctor e'en now treads his German land,
His failing health removed him from this strand.
To his successor our best thanks we owe,

( to S. P. Pandit Esqrs )

To other friends do we the same sense show.
To boast of full success we have a cause,
Since oft this theatre roared with applause.
Our friends may thus annuals treats renew,
Mean while, we bid you sirs a fond adieu.

कालेजच्या विद्यार्थ्यांनीं, आणखी मृच्छकटिक, मुद्राराक्षस, उत्तररामचरित्र, मालतीमाधव इत्यादि नाटकांचे प्रयोग रंगभूमीवर दाखविले. त्यांत बऱ्याच विद्यार्थ्यांत नाट्यनिपुणता असल्याचें निदर्शनास आलें होतें. पुढें परिक्षांच्या क्रमांत पुष्कळ फेरबदल झाल्या कारणानें विद्यार्थ्यांस विश्रांति कमी मिळून, आलीकडे हे प्रयोग मुळींच बंद झाले. कालेजच्या विद्यार्थ्यांनीं नाटकें करण्याची सुरुवात केल्यापासून एवढा फायदा झाला कीं, नाट्यकलेचें महत्त्व लोकांस हळूहळू समजूं लागलें. १८७१ सालीं नाट्यकलेच्या भावी प्रगतीचें बीजारोपण झालें ह्मटलें तरी चालेल. याप्रमाणें १८४२ पासून १८७२ पर्यंत नाट्यकलेचें एक स्थित्यंतर होण्याला पुरीं पुरीं तीस वर्षे लागलीं.

जयपाळ नांवाचें दुसरें एक नाटक **कीर्तने** यांनीं १८६९ मध्यें केलें. याचें मूळ कथानक हिब्रू भाषेंत आहे; परंतु **कीर्तने** यांनीं यतद्देशीय रिवाजास तें बरोबर जमवून देण्याचा बराच प्रयत्न केला आहे. याचेही प्रयोग फारच लोकप्रिय झाले होते.

यानंतर इतिहास दृष्ट्या जें महत्वाचें नाटक झालें तें **मल्हारराव महाराज गायकवाड** यांच्यावरील विषप्रयोगाच्या आरोपाच्या प्रकरणाचें होय. याचे कर्ते **नारायण बापूजी कानिटकर** वकील होत. याच सुमारास पुण्यांतील ड्राईंग मास्तर **बजाबा नेने** यांनीं एक "सैरंध्री" नांवाचें गद्यपद्यात्मक स्वतंत्र नाटक लिहिलें. यांच्या मनांतून गायक पात्रें मिळवून त्याचे प्रयोग करावयाचे होते. परंतु पात्राच्या अभावीं तो विचार तसाच राहिला व त्यामुळें तें नाटकही तसेंच मागें पडलें. येथपर्यंत जीं नाटकें झालीं आहेत तीं जयपाळ खेरीज करून अगदीं स्वतंत्र, त्यांत उसन्या किंवा अन्य भाषेंतील कल्पना न घेतां नाटकप्रसंगाला अनुसरून अशीं झालीं आहेत. येथून पुढें **शेक्सपीयर**च्या नाटकांची महाराष्ट्र भाषेंत प्रयोग रूपानें ओळख झाली.

**बजाबा रामचंद्र प्रधान** व रा. ब. **विष्णू मोरेश्वर महाजनी** एम. ए. यांनीं अनुक्रमें " कामेडी ऑफ् एरर्स " व " सिंबिलाइन " या नाटकांचीं रूपांतरें " भ्रांतिकृत—चमत्कार " व " तारा नाटक " या नांवांनीं केलीं. दोन्हीं नाटकांत इकडील देशरिवाजाला भिन्न असे जे प्रकार होते ते फिरवून होतां होईल तो त्यांना भारतीय व मराठी स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. आजपर्यंत आमच्या नाटकप्रयोगांत विचार, कल्पना व रीतरिवाज यांत निव्वळ एतद्देशीय स्वरूप होतें, परंतु **शेक्सपीयर**चीं वरील नाटकें प्रसिद्धीस आल्यापासून देशी व विदेशी प्रकार आमच्या नाटकांत व प्रयोगांत दिसूं लागले. इंग्रजी शिक्षणानें जसे आमच्यांतले आचारविचार पालटूं लागले, तसेंच इंग्रजी नाटकाच्या परिचयानें इकडच्याही नाटकांचें स्वरूप बदलूं लागलें. इंग्रजींत ज्याला Courting ( कोर्टिंग ) ह्मणजे प्रीतीची याचना करणें ह्मणतात तो प्रकार, किंवा प्रीतिपात्रांच्या (lovers) संवादांतले प्रकार इकडच्या रिवाजाला अगदीं असांप्रदायीक होते; परंतु त्यांची ओळख वरील नाटकें रंगभूमीवर आल्यापासून झाली ह्मटलें तरी हरकत नाहीं. *

सुमारें १८७८ पर्यंत हीं सर्व नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत. या सालांत नाटककादंबऱ्यांकरितां स्वतंत्र असें " नाट्यकथार्णव " नांवाचें मासिकपुस्तक प्रसिद्ध होऊं लागलें. नुकतेच परलोकवासी झालेले **शंकर मोरो रानडे** बी. ए. हे याचे कर्ते होते. यांनीं इंग्रजींतलि सुरस कादंबऱ्यांना इकडील देशरिवाजाचें वळण देऊन त्या मनोरंजक करण्याची जशी चांगली दिशा काढली, त्याप्रमाणेंच इंग्रजी व संस्कृत नाटकें रूपांतर व भाषांतर करून निव्वळ मराठी भाषा जाणणारांस आवडतील अशीं केलीं आहेत. यांचीं दौलतराव, अतिपीडचरित, वीरोत्तंस, रतिमन्मथ, चंडकौशिक इत्यादि नाटकें प्रसिद्ध आहेत. यांशिवाय सार्वजनिक चळवळीच्या विषयांवर कांहीं विनोदपर प्रहसनें रचलीं आहेत. पैकीं " डाक्तर वैद्य प्रहसन " हें मराठी भाषेंतलें स्वतंत्र

---

* या दोन नाटकांशिवाय शेक्स्पीयरच्या नाटकाचीं आणखी भाषांतरें या पूर्वींच झालीं होतीं; परंतु प्रयोगदृष्ट्या त्यांचें तितकें महत्त्व त्यावेळीं नव्हतें. त्यांपैकीं दोन नाटकें अथेल्लो व हॅमलेट रूपांतरानें पुढें उदयास आलीं.

असें प्रहसन होय. **रानडे** मोठे कल्पक व कोटीबाज असत. बीन सनदी वैद्यांवर कायद्याची एक गदा येऊं पहात होती, त्या विषयाला धरून त्यांत वैद्य व डाक्तर या दोघांचीही थट्टा उडविली आहे. यांनीं आणखीही नाटकें पुढें नाटकें रचिलीं आहेत. परंतु संगीत नाटकापूर्वीच्या इतिहासापुरता ज्यांचा संबंध आहे अशांचाच निर्देश येथें केला आहे. तसेंच आणखी गद्यनाटककारही बरेच झाले आहेत; परंतु नाट्यकलेच्या संबंधांत फेरफार करण्याला ते विशेषसे कारण नसल्यामुळें त्यांचा येथें उल्लेख केला नाहीं.

सारांश सुमारें चाळीस वर्षांत नाटककलेमध्यें दोन प्रकारचीं स्थित्यंतरें घडून आलीं. एक पौराणिक नाटकें व दुसरें गद्य नाटकें. एवढ्या काळांत विद्या, शिक्षण, लोकरीति, आचारविचार यांच्यांत झपाट्यानें तफावत पडत चालली होती. परंतु नाटकमंडळीच्या अंतर्बाह्य स्थितींत थोड्याशा गोष्टीशिवाय कांहींच फरक झाला नाहीं ह्मटलें तरी चालेल. जो फरक झाला असेल तो अगदीं आरंभीं नाटकगृहें, पडदे वगैरे कांहीं सोयी नव्हत्या त्या कोठें कोठें पाहण्यांत येऊं लागल्या हाच कायतो. खुद्द नाटकमंडळ्यांनीं लौकिकदृष्टीनें स्वतःच्या वर्तनांत व कलेंत जो फेरफार करावयास पाहिजे होता तो कांहींच केला नव्हता. त्यामुळें या कलेंत दुसरा नवा प्रकार निघाल्याबरोबर पूर्वींचे दोन्हीही प्रकार थंडे पडत चालले; इतकेंच नाहीं तर तीस चाळीस वर्षें चांगल्या तऱ्हेनें चाललेल्या जुन्या नाटकमंडळ्यांचें संगीत कला निघाल्याबरोबर सुमारें आठ दहा वर्षांत क्रमाक्रमानें अजिबात अस्तित्व नाहींसें झालें.

---

## संगीतापूर्वींच्या नाटकमंडळ्या.

हल्लीं ज्याप्रमाणें संगीत नाटकमंडळ्या अनेक आहेत, त्याप्रमाणें पूर्वीं पौराणिक नाटकें करणाऱ्या मंडळ्या बऱ्याच असत. त्यांत ज्या पद्धतशीर व व्यवस्थेशीर असत, त्याच तीस चाळीस वर्षें टिकल्या होत्या व ज्यांत अगदींच कांहीं राम व व्यवस्था नसे त्यांची आयुर्मर्यादाही अल्प असे. जुन्या मंडळ्यांत बरींच वर्षें नांवलौकिक मिळवून चालल्या अशा तीनच मंडळ्या होत्या. **धोंडोपंत सांगलीकर, राघोपंत इचल-**

**करंजीकर, नरहरबुवा** व **कोल्हापूरकर.** यांशिवाय आळतेकर, पुणेंकर वगैरे चांगल्या मंडळ्या निघाल्या असून अगदीं अल्पायुषी होत्या. यांत मुख्यतः **इचलकरंजीकर** व अंशतः **कोल्हापूरकर** यांनीं गद्य नाटकाची अभिरुचि लोकांस प्रथम लावून दिली. **कोल्हापूरकर** यांनीं संगीत निघाल्याबरोबर आपल्याकडेही तें सुरू केलें होतें. परंतु मंडळी कायम राखण्याचे प्रयत्न कोणीच न केल्यामुळें मालकाच्या मागोमाग त्यांच्या मंडळ्याही लयास गेल्या.

आमच्यांत स्वार्थदृष्टीपलीकडे कोणतेंही काम करण्याची प्रवृत्ति नसल्यामुळें कोणतीही संस्था ऊर्जित अवेस्थला पोंचत नाहीं. कदाचित् कांहीं काल पोंचलीच तर जोंपर्यंत तिचे पुरस्कर्ते हिमतीनें काम करतात किंवा कायम असतात तोंपर्यंतच पोंचते. परंतु एकाच्या मागें दुसरा काम करणारा मनुष्य तयार करून ठेवण्याचे प्रयत्न होत नाहींत ह्मणून ह्मणा, किंवा चालकाच्या अंगीं निराळ्या प्रकारची महत्त्वाकांक्षा असते ह्मणून ह्मणा, किंवा संस्थेचा अभिमान नसल्यामुळें ह्मणा, संस्थेची भरभराट व ऱ्हास यांचा अनुक्रम मागोमागच असतो. नाटक धंदा ह्मणजे पोट भरण्याचा या कल्पनेचेंच बहुतेक प्राबल्य आजपर्यंत दिसून आलें आहे. व त्यामुळें कलाही त्याच स्वरूपाची राहिली आहे.*

---

* फ्रान्समध्यें या धंद्याला नाटकमंडळीनें इतका मोठेपणा आणला आहे कीं, नाटकमंडळी म्हणजे समाजाचा एक घटक बनली आहे. कोणच्याही चार प्रतिष्ठित मंडळींत एखाद्या नटाची गणना असावयाचीच, अशा प्रकारची तिकडे त्याची मान्यता आहे. वर्तमानपत्रांची त्यांच्या विरुद्ध ब्र काढण्याची छाती नाहीं. इतका नाटकमंडळींनीं आपला वचक बसविला आहे. सारांश नाटकाचें व धंद्याचें महत्त्व ते लोक बरेंच समजूं लागले आहेत; व त्यामुळें इंग्लंडला सुद्धां या कामांत त्यांनीं मागें टाकलें आहे असें तिकडील पुस्तकें सांगतात. ( Living Parish. ) याला दुसरें प्रत्यंतरः—

"Yes, there is no doubt that the English are a highly moral nation but in matters theatrical they have yet much to learn."

London Life.

( Seen with German eyes )

पौराणिक नाटक मंडळींनीं एक मात्र गोष्ट चांगली केली.ती ही कीं, आपल्या पुराणें इतिहासांची खरी खरी माहिती आबालवृद्धांस नाटकाच्या द्वारें करून दिलीं. अलीकडे नाटकगृहें, पडदे, देखावे इत्यादि पुष्कळच नव्या नव्या गोष्टी लोकांना रंजविणाऱ्या झाल्या आहेत. पंचवीस वर्षांपूर्वीं त्या कांहींच नसत, तथापि त्या वेळच्या नटांनीं नुसत्या कथाभागावर समयोचित भाषणांनीं लोकरंजन चांगलें केलें आहे. समयसूचकता, प्रसंगावधान, वक्तृत्व, धीटपणा, इत्यादि चांगले नट निपजण्याला जे बुद्धीचे अंकूर लागतात ते त्या वेळच्या पात्रांत पूर्ण दिसून येत असत. शिक्षणाचा अगदीं अभाव असतांना, त्या वेळेच्या पात्रांनीं लोकांची चित्तवृत्ति आपल्या कह्यांत ठेवण्याची कामगिरी जितकी उत्तम रीतीनें बजावली आहे तितकी अलीकडे पुष्कळ गोष्टींचें साहाय्य असतांना, फारच थोड्या पात्रांकडून बजावली जाते. पुढें अशा प्रकारच्या चांगल्या पात्राची वाण पडूं लागल्या कारणानें, पौराणिक नाटकाच्या ऱ्हासाला तीही एक कारण झाली.

संगीत नाटक निघण्यापूर्वीं अगदीं थोडे दिवस **आर्योद्धारक** नांवाची एक गद्यनाटककार मंडळी पुण्यास निघून चांगली प्रसिद्धीस आली. ही मंडळी धंदेवाली नसून कांहीं नोकर व हल्लींचें ‘ सायन्स ’ पण पूर्वीं ज्याला “ इंजिनियरिंग कालेज ” म्हणत असत त्यांतली होती. वेणीसंहार, अथेल्लो, अतिपीड चारित व तारा इत्यादि नाटकांचे प्रयोग त्या मंडळीनें दोन वर्षांत सवडीसवडीनें केले. प्रसिद्ध रा. रा. **गोविंद बल्लाळ देवल** व **शंकरराव पाटकर** यांचीं नाट्यनिपुणत्वांत प्रसिद्धि याच मंडळीच्या द्वारें झाली. याप्रमाणें सन १८८० पर्यंत नाट्यकलेंत स्थित्यंतरें घडत आलीं आहेत. त्यांच्यांत पुढें एकदम ज्यानें क्रांति करून सोडली त्या चारित्रनायकाच्या चरित्रास येथून सुरुवात झाली.

---

## किर्लोस्करांचें घराणें.

**किर्लोस्कर** हें उपनांव **किर्लोसी** या गांवावरून पडलें. हा गांव **रत्नागिरी** जिल्ह्यांत आहे. **किर्लोस्करांचें** घराणें पांच पिढ्या खानदानीचें, मनाच्या थोरपणाबद्दल व हुशारीबद्दल स्वभावतःच प्रसिद्ध अ-



गुर्लीसूर येथील अण्णासाहेबांच्या वाड्याचा नकाशा.

सल्याचें आढळून येतें. आजमित्तीसही प्रत्यक्ष या व या घराण्यापासून उत्पन्न झालेल्या दुसऱ्या घराण्यांत, बुद्धिमत्ता, हुशारी व विद्वत्ता हीं विशेष दिसून येतात. प्रसिद्ध **गणेश रामचंद्र किर्लोस्कर एम. ए. एलेल. बी.** हायकोर्ट वकील; त्यांचे वडील बंधु **सोलापूरचे** वकील **सखाराम रामचंद्र** ऊर्फ **बापूसाहेब किर्लोस्कर** व त्यांचे कनिष्ठ बंधु कांहीं दिवस जमखिंडी संस्थानांत डाक्तर असलेले **रा. विष्णु रामचंद्र किर्लोस्कर एल. एम.** ॲन्ड **एस; सोलापूर** येथें असलेले डाक्तर **वासुदेव काशिनाथ किर्लोस्कर एल. एम.** ॲन्ड **एस. शिवाजी मेटलवर्क्स** कंपनीचे एजंट; दक्षिण **हैद्राबाद** येथील डाक्तर **गंगाधर कृष्ण किर्लोस्कर एल. एम,** ॲन्ड **एस.** इत्यादि ठिकठिकाणची मंडळी **किर्लोस्करांच्या** घराण्याची प्रसिद्धि दाखवितात. **पुण्यांतील** प्रसिद्ध डाक्तर **गणेश कृष्ण गर्दे एल. एम.** ॲन्ड **एस.** व प्रसिद्ध वेदांती व हल्लीं **कारवारचे** डे. इन्स्पेक्टर **बाबासाहेब गर्दे** यांचें किर्लोस्कर हे मातुल घराणें होय. कवितादेवींचा **बाबासाहे-**बांवरही पूर्ण वरदहस्त आहे हें ज्यांनीं त्यांची " गीतामृत शतपदी " व " पंचदशी " वाचली असेल त्यांस माहीत आहे. गीतेसारखा वेदान्तीय ग्रंथ यांनीं आपल्या सुरस कवित्वानें अति बालबोध व मोहक करून ठेवला आहे. दुसरें, कवितादेवीचे खरे वरद पुत्र **मोरोपंत** कवि यांच्या घराण्याशीं **किर्लोस्करांचा** शरीरसंबंध जडला होता. **मोरोपंताची** आई **लक्ष्मीबाई** ही **किर्लोस्कर** यांच्या घराण्यांतील होती असें ह्मणतात. परंतु **अण्णांची** दुसरी आत्या **काशीबाई** मात्र पंतांची प्रत्यक्ष नातसून होती. यांचे पति **काशिनाथपंत** हे मोठे धर्मशास्त्रज्ञ व फारच बुद्धिमान असून, दक्षिण **हैदराबाद** येथें **शिवराज बहादर विद्यावंत** म्हणून एक मोठें सरदार घराणें आहे, तेथून त्यांनीं शंभर रुपये वर्षासन मिळविलें होतें. यांच्याबरोबर **काशीबाई** याही **मोरोपंतांच्या** आर्या लावीत असत असें म्हणतात. याप्रमाणें **किर्लोस्कर** घराण्यांतलें बुद्धिमत्व या पिढीपर्यंत दोन घराण्यांत प्रसिद्ध आहे.

**किर्लोस्करांची** मूळची वृत्ति भिक्षुकीची होती. परंतु **अण्णांच्या** पूर्वीं चार पिढ्या हें घराणें गृहस्थी बाण्यानें प्रसिद्धीस आलें. सुमारें शंभर वर्षांपूर्वीं **अण्णांचे** निपणजे **किर्लोसी** गांव सोडून **गुर्लासुरास**

राहण्यास आले. **गुर्लसूर** हा बेळगांव जिल्ह्यांत **मलप्रभा** नदीचे कांठीं **धारवाडा**पासून सुमारें बारा कोसांवर आहे. खानदेशाकडे जसे भिल्ल लोक फार तशी कर्नाटकांत बेरडांची वस्ती असे. हाही गांव पूर्वी बेरडांचाच होता. परंतु **चिदंबर दीक्षित** नांवाचे एक सिद्ध पुरुष होते त्यांनीं या गांवीं येऊन वस्ती केल्यापासून येथें यांचा सहवास घडावा ह्मणून **बापू गोखले, रास्ते** वगैरे पेशव्यांचे सरदार व **देसाई** व **देशपांडे** वगैरे दक्षिणेंतील सरदार व त्यांच्या आश्रयानें राहिलेली वैदिक, शास्त्री, विद्वान् वगैरेंनीं तेथें आपापले वाडे व घरें बांधून वस्ती केली होती. तेव्हांपासून या गांवांतलें बेरडांचें ठाणें नाहींसें झालें. **दीक्षितां**चें वास्तव्य या क्षेत्रीं सुमारें बारा वर्षें होतें; परंतु तेवढ्या काळांत या ठिकाणाचें पूर्व स्वरूप अगदीं बदलून मोठे वाडे, देवळें, विद्वान्, शास्त्री व कारागीर यांच्या वस्तीमुळें हा लहानसा गांव शोभिवंत असें क्षेत्र बनलें. पुढें हा गांव **बापू गोखले** यांनीं **चिदंबर दीक्षितां**स इनाम दिला तो अद्याप त्यांच्या वंशजाकडे चालत आहे.*

**अण्णां**चे पणजे **रंगोपंत** हे **धारवाड** प्रांतीं सर सुभेदार असून यांच्यावर **चिदंबर दीक्षितां**ची फार कृपा असे. हे निपुत्रिक असत ह्मणून यांनीं **दीक्षितां**च्या आज्ञेनें भाऊबंदाच्या घराण्यांतील एक मुलगा दत्तक घेऊन त्याचें नांव **नारायणराव नाना** असें ठेविलें. हे चिरंजीव प्रौढ झाल्यावर **काशीयात्रे**स जाण्याचा रंगोपंतांनीं निश्चय केला. त्या वेळेची यात्रा अति दुर्घट असे. ह्मणून ज्याच्या कुटुंबांत काशीयात्रा घडलेली आहे तें कुटुंब महा पुण्यवान् समजलें जात असे. मनुष्य जातांना, आपलें पुनः परत येणें होणार नाहीं अशा व्यवस्थेनें, मागील मायापाशांत फारसें मन न ठेवतां. आप्त, इष्टमित्र यांचा बहुतकरून शेवटचाच निरोप घेऊन जात असे. आतांपेक्षां त्या वेळच्या काशीयात्रेंत पारमार्थिक हेतु अधिक असे. हें त्या क्षेत्रांत कित्येक संस्थानिकांचे व धार्मिकांचे, थोर थोर वाडे, अन्नछत्रें, घाट, देवालयें व-

---

* चिदंबर दीक्षितांचा जन्म शके १६८० म्हणजे सन १७५८ व अंतकाळ १७३७ म्हणजे सन १८१५ मुरगोड मुक्कामीं झाला. यांचें वास्तव्य गुर्लसुरास १८०२ पासून १८१४ पर्यंत होतें. यांनीं गुर्लसुरास एक मोठा यज्ञ केला होता. त्यावेळीं पेशवे व इतर सर्व सरदार जमल होते म्हणून सांगतात.

गैरे बांधलेले आहेत यावरून उघड होत आहे. **रंगोपंत** हे आपल्या बरोबर भरपूर संपत्ति घेऊन निघाले होते. काशीस गेल्यावर त्यांनीं आपली यात्रा यथासांग केली. तेथें एक वाडा बांधून **जडे** उपनांवाच्या कुटुंबास दान केला. हल्लीं त्या वाड्यांत त्यांचे वंशज रहात आहेत. सुमारें सहा महिने तेथें दानधर्म व क्षेत्रविधि करण्यांत घालविले. तों इकडे त्यांचे चिरंजीव **नारायणराव नाना** यांस पुत्रप्राप्ति झाल्याचें आनंदकारक वर्तमान त्यांस पोंचलें. हे पुत्र म्हणजे आमच्या चरित्र नायकाचे वडील **पांडूरंग**पंत **तात्या** होत, पुत्रप्राप्तीची वार्ता ऐकताच

यदि रामा यदिच रमा यदि तनयो विनयधीगुणोपेतः ॥
तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमाधिक्यम् !

याप्रमाणें **रंगोपंतास** आपण सौख्यसागरांत पोहत आहों असें वाटायला लागलें. परंतु या आनंदाबरोबर आणखी अधिक आनंदाची वाट न पाहतां आपली संसारयात्रा आतां पुरी झाली असें त्यांच्या मनानें घेतलें व आजपर्यंत फारच थोड्यांनीं अनुसरला असेल असा सदानंदाचा मोक्षप्राप्तीचा मार्ग त्यांनीं काढला. आपल्या हिंदु लोकांत सहगमन व जलसमाधि घेणें हे अति दुर्घट परंतु मोक्षप्राप्तीचे खरे मार्ग आहेत असें पूर्वीं समजलें जात असे. त्यांपैकीं दुसरा ह्मणजे जिवंतपणीं भागीरथींत समाधि घेणें हा मार्ग **रंगोपंतां**नीं अनुसरण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें जेष्ट किंवा आषाढ महिना असेल, अष्टमीसह नवमी असा योग आला असतां सर्व आप्त इष्ट बरोबर घेऊन पत्नीसह नावेंतून **भागीरथींत** प्रवेश केला. व मध्यभागीं नाव आल्यावर पूर्व तिथींत ह्मणजे अष्टमींत पत्नीचा देह विसर्जन करून, उपरांत नवमी लागल्याबरोबर आपण स्वतः जलसमाधि घेतली ! केवढें हें लोकोत्तर धैर्य व धर्मनिष्ठा ! प्रस्तुतच्या धर्मश्रद्धेशीं व धर्मकल्पनेशीं यांची तुलना केली तर वरील गोष्ट केवळ कल्पित कादंबरीप्रमाणें वाटणार आहे. असो, याप्रमाणें **किर्लोस्करां**च्या घराण्यांतील एका पुरुषानें पुण्यसंचय करून कुलाचें नांव वाढविलें.

इकडे कालावधीनें **नाना**साहेबांस दोन पुत्र झाले. पहिले **पांडुरंगराव तात्या** व दुसरे **रंगोपंत दादा**. पहिल्या **रंगोपंता**पासून हें घराणें गर्भ श्रीमंत, सत्यशील व मुत्सद्दीपणांत महशूर असे. मामलती चालविणें, दक्षिणेंतील देसाई वगैरे सरदार लोकांचें देणेंघेणें प-

हाणें, प्रसंगविशेषीं जामीन होणें या घडामोडी **अण्णांच्या** आजापासून वडलापर्यंत चालत आल्या होत्या. **किर्लोस्करांच्या** पूर्व श्रीमंतीची कल्पना, **गुर्लासूर** येथील त्यांच्या वाड्यांत, घोड्यांच्या पागा, मेणे व पालख्या वगैरे जीर्ण दशेंत अद्याप पडलेल्या आहेत त्यावरून करतां येते. **चिदंबर दीक्षितांच्या** पश्चात् जी शास्त्री पुराणिक वगैरे विद्वान् मंडळी **गुर्लासुरास** राहिली होती त्यांच्या सहवासानें **अण्णांचे** वडील **तात्या** व चुलते **दादा** यांना संस्कृत काव्यनाटकें चांगलीं अवगत असत. त्यांत **तात्या** फार मार्मिक असत. त्यांना **शाकुंतल** नाटकांतील अगदीं बारीक स्थलें सुद्धां चांगलीं समजलीं होतीं. **दादा** जरा वेदांतप्रिय असत. **तात्यांचा** स्वभाव जरा भोळसर ह्मणा किंवा फाजील उदार ह्मणा असा असे. त्यामुळें वर सांगितलेल्या घडामोडींत बऱ्याच जामीनक्या यांच्या अंगावर आल्या होत्या. व त्यामुळें शेवटीं हें घराणें ब्रह्मस्वाच्या पेंचांत आलें होतें.

---

## जन्मवृत्त व बाळपण.

इंग्लिश चरित्रकारांना आपल्या चरित्रनायकांचा कुलवृत्तांत देतांना त्याचें जनन थोर कुलांत आहे हें दाखविण्याकरितां फार आयास करावे लागतात. मग कोठला तरी मोठेपणा उसनवार घेऊन चरित्रनायकाच्या कुळाशीं ते जोडून देतात. हा प्रकार इंग्रजी कादंबऱ्या वाचणारांच्या नेहमीं आढळण्यांत येत असेल* त्यांची अशी समजूत असलेली दिसते कीं, लोकांत प्रसिद्धी-

---

* भाऊराव कोल्हटकर यांचें चरित्र पान १० पहा.

रेनाल्डच्या 'मेरिप्राईस' नांवाच्या कादंबरींत या संबंधानें कांहीं गमतीदार गोष्टी सांगितल्या आहेत. त्या सारांशानें पुढें दिल्या आहेत:

I must next observe that the sudden accession of wealth developed to my knowledge some new phases in the world's folly, especially with regard to the fawning sycophancy and wretched servility which in many quarters are shown towards those on whom riches are showered. For instance, paragraphs appeared in the newspapers to the effect that "this young lady, though always occupying a respectable position in society, was comparatively in different circumstances before she

(टीप पुढें चालू).

स येण्याला मोठ्या कुळाचीच अवश्यकता लागते, किंवा प्रसिद्धीस येण्याला हलक्या कळांतील लोकांना अधिकार नाहीं. परंतु दोन्हीही कल्पना भ्रामक आहेत. प्रत्येक मनुष्याचें जन्मतःच मोठ्या कुळांत जन्मास येणें शक्य नसतें. एखादा गरीब स्थितींत जन्मास येऊनही स्वतःच्या गुणांनीं मोठेपणास चढतो व आपल्या पुढच्या पिढीला मोठ्या कुळांतले ह्मणून मिरविण्याला आयती संधि देतो. अशा मोठ्या कुळांत उपजले सर्वच पुरुष नामधारक होतात असें नाहीं. तर एक बरा तर एक वाईट अ-

---

( टीप मागील पृष्ठावरून. )

received this inheritance. It was by her mother's side we belive " continued the journalist " that she was thus related to the Clavering family, her father was a large builder and Contractor well known and much respected in Ashford where he resided for a number of years. " Thus was I represented to be the cousin of the late Sir Aubrey Clavering, and thus was my poor father a humble journey man carpenter converted in a large builder and contractor. Another journalist scribe laboured hard to create for me a splendid linaege "Miss Prise Clavering" he said " belongs to an ancient and time honoured family. We belive that her ancestry can be distinctly traced back to the celebrated Rupert de Pries, a Norman baron who accompanied Willam the First in the invasion of this country. The name of pries became currupted into that of Price, but the lineal line can be followed with unbroken accuracy down to the young lady who has now superadded the name of Clavering to her own " ........ Many paragraphs of the same kind went round of the newspapers; and I belive that a more bitter satire though perfectly unintentional on the part of the writers could not possibly be penned upon the ridiculons pride of family and lineage which prevails amongst the higher orders in this country, than those wretched maukish drivellings to which I have alluded. " ( टीप पुढें चालू ).

साच प्रकार बहुतेक पाहण्यांत येतो, किंवा दहापांच चांगले झाले तर एखादा अगदीं कुलांगार निपजतो. **शिवाजी**च्या मागूनच **संभाजी** झाले; व ज्या कुळांत पहिले **बाजीराव** झाले त्याच कुळांत शेवटचेही झाले. दोघांच्याही कीर्ति दिगंत आहेत: एकानें मिळविली व दुसऱ्यानें घालविली इतकाच फरक. त्याच **पेशवे** कुळाला भूषण आणण्याला कारण **रमा**बाई झाल्या; व त्यांचीच सासू **आनंदी**बाई इनें त्या कुळालाच काय पण एकंदर स्त्री जातीला खालीं पाहायला लावलें. सुनेच्या कीर्तीचा डंका प्रत्यक्ष कानांवर आदळत असतां सहा महिने झाले नाहींत तोंच **कैकयी**लाही मागें सारून प्रत्यक्ष पुतण्याचा बळी घेण्याला जिनें

---

( टीप मागील पृष्ठावरून ).

वरील कादंबरीकाराला तिकडच्या संभावीत लोकांत मान नाहीं. त्यामुळें त्याचे वरील उद्गार तुच्छ वाटण्याचा संभव आहे. म्हणून त्याचें म्हणणें फारसें जमेस न धरतां इंग्लिश लोकांचा आवडता ग्रंथकार मेकाले याच्या ग्रंथांतील थोडासा मासला पाहिला म्हणजे कुळाचा मोठेपणा दाखविण्याला कांहीं ग्रंथकार कसे हापापले असतात हें दिसून येईल:

"Warren Hastings sprang from an ancient and illustrious race. It has been affirmed that his pedigree can be traced back to the great Danish sea kings, whose sails were long the terror of both coasts of the British channel, and who after many fierece and doubtfwl struggles, yielded at last to the valour and genius of Alfred. But the undoubted splendour of the line of Hastings needs no illustration from fable. One branch of that line wore, in the fourteenth century, the coronet of Pembroke. From another branch sprang the renowned chamberlain, the faithful adherent of the white Rose, whose fate has furnished so striking a theme both to poets and historians. His family received from the Tudor the earldom of Huntingdon, which after long dispossession was regained in our time by a series of events scarcely paralleled in romance."

Warren Hastings.

मागें पाहिलें नाहीं! तेव्हां मोठ्या कुळांत जन्मल्याचें महत्व येथें कोठें राहिलें? मोठ्या कुळांत जन्मास येणें हें एक भूषणास्पद आहे खरें; परंतु स्वतःच्या गुणांनीं मोठेपणा पावणें त्यापेक्षांही भूषणावह आहे. **भर्तृहरीनें** ह्मटलें आहे कीं:

परिवर्तिनि संसारे मृतः को वा न जायते
स जातो येन जातेन याति वंशः समुन्नतिम्।
(नीति शतक.)

[ चक्राप्रमाणें फिरणाऱ्या संसारांत मेला असतां कोण जन्मास येत नाहीं? परंतु ज्यांच्या उपजण्यामुळें वंश मोठेपणास पावतो तोच जन्मास आला.]

प्रस्तुत चरित्रनायकाचा जन्म दोन्ही दृष्टींनीं भूषणास्पद आहे. एक मोठ्या कुळांत जन्म ह्मणून व दुसरी, स्वतःच्या कृतीनें कुळाला त्यानें भूषण आणलें ह्मणून. तें पुढील चरित्रावरून समजेलच.

शके १७६५ शोभकृन्नामसंवत्सरे, चैत्र शुद्ध प्रतिपदा शुक्रवार—सन १८४३ मार्च ३१ तारखेस **गुर्लासूर** येथें, **पांडुरंगराव तात्यांचें** पहिलें कुटुंब, **कोल्हापूर** इलाख्यांतील **अजऱ्याचे फळणीकर** यांची कन्या इच्या पोटीं झाला. यांचें नांव **बळवंत** ऊर्फ **अण्णा** होतें; परंतु **अण्णासाहेब** या नांवानेंच ते प्रसिद्ध होते. तिसऱ्या चौथ्या वर्षाच्या सुमारासच यांची मातोश्री वारली. दहा अकरा वर्षांपर्यंतचें बालपण, इतर मुलांचें लहानपणीं ज्या प्रकारच्या खेळण्या बागडण्यांत जातें त्या प्रकारचेंच विटीदांडू, खोखो, मोठे पतंग करून उडविणें यांत गेलें; त्यांत कांहीं विशेष नाहीं. परंतु हनुमान्जयंती आली ह्मणजे घरीं दिवाणखान्यांत आरास करून व चार बाळगोपाळ जमवून नाटकें करावयाची हौस ही मात्र त्यांच्या भावी कृतीचीं, **लार्ड क्लाईवच्या** निबंधांतील: "Some lineaments of the charactor of the man were early discerned in the child." या **मेकालेच्या** वाक्याप्रमाणें पूर्व चिन्हेंच दाखवूं लागलीं. व हा एक त्यांच्या चरित्राचा प्रथम चरण झाला.

---

## विद्याभ्यास.

**अण्णांचें** बारा वर्षांपर्यंतचें शिक्षण मराठी व कानडी लिहिणें वाचणें हें घरींच **विठोबा भुसकुटे** नांवाच्या शिक्षकाच्या हाताखालीं झालें. नंतर सन १८५४ च्या सुमारास यांचे चुलते **रंगोपंत** हे **कोल्हापुरास** कांहीं कामानिमित्त गेले, तेव्हां त्यांनीं **अण्णा**स बरोबर नेलें. तेथें **मुंबईचे** प्रसिद्ध हायकोर्ट वकील **गणेश रामचंद्र किर्लोस्कर** यांचे वडील **रामचंद्र अण्णा किर्लोस्कर** यांचे येथें राहून **अण्णांचें** इंग्रजी दोन यत्तेपर्यंत शिक्षण झालें. या सुमारास **पन्हाळगडचे** मामलेदार **बाबासाहेब कोनकर** यांची कन्या **द्वारकाबाई** इच्याबरोबर त्यांचा **पन्हाळगडास** विवाह झाला. या वेळेला त्यांचें वय सुमारें चौदा वर्षांचें होतें.

लग्न झाल्यावर **अण्णा गुर्लहोसुरास** परत आले व पुढें सुमारें चार वर्षें **धारवाडास** अभ्यासाकरितां राहिले. तेथें असतांना त्यांनीं मुलकी-ची परीक्षा दिली. या पलीकडे त्यांचें विशेष शिक्षण येथें झालेलें दि-सत नाहीं. कविता करण्याचा नाद मात्र त्यांना चौदा वर्षांपासूनच ला-गला. या वर्षीं त्यांनीं किरातार्जुन आख्यानावर एका हरदासास कविता करून दिल्या आहेत. नवनीतांतील रघुनाथ पंडिताचें नलोपाख्यान त्यांस फार आवडत असे. वडिलांच्या संगतीनें काव्यांपैकीं रघुवंश व नाटकांपैकीं शाकुंतल हें **अण्णां**ला फार चांगलें समजलें होतें. पुढें, **धारवाडास** ज्यांचे नजरेखालीं अभ्यासास होते ते **मोरो गोपाळ** दप्त-रदार यांची बदली **पुण्यास** झाली त्यामुळें त्यांचेंही प्रस्थान तेथू-न उचललें.

---

## शंकरजयंतीचा उत्सव.

**अण्णांच्या** लहान वयांतच **गुर्लहोसुरास** त्यांच्या योगानें एक मह-त्त्वाची गोष्ट घडून आली. ती आपले **जगद्गुरु श्री शंकराचार्य** यां-चा जन्मोत्सव ही होय. हा उत्सव पूर्वीं **बावा गर्दे** यांचे वडील **दादा** हे स्वतांच्या घरीं तांत्रिक करीत असत. हे मोठे शैव, कर्मनिष्ठ व वेदांती असत. यांच्याजवळ **अण्णांनीं** हा उत्सव आह्मी **श्री कलमेश्वरा**च्या

देवळांत मोठ्या थाटानें करतों अशी इच्छा दर्शविल्यावरून **दादांनीं** त्यास परवानगी दिली. तेव्हांपासून म्हणजे सुमारें सन १८६० पासून **अण्णा** आपल्या मित्रमंडळीच्या साहाय्यानें **गुळसुरास शंकर-जयंती**चा उत्सव करूं लागले. या मित्रमंडळींत प्रमुख **बाबा गर्दे**, देवाचे पुजारी **पांडुरंगभट बेहेरे, सुब्बाभट घाटे, दिवाकर दीक्षित, वासुदेव दीक्षित, कृष्णंभट घाटे, कृष्णंभट मुणगेकर** वगैरे मंडळी होती. यांच्या साहाय्यानें हा उत्सव फार चांगला होत असे. वैशाख शुद्ध प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत हा उत्सव असतो. या पंधरा दिवसांत पंधरा निरनिराळ्या प्रकारच्या पूजा, रोज वसंतपूजा, आरास, दशमी व पौर्णिमेस ब्राह्मणभोजन असा क्रम आहे. शेवटच्या दिवशीं आतषबाजी व्हायची. पुढें खर्च वाढूं लागला तशी **अण्णा** व **बाबा** हे पदरची भर घालून उत्सव पार पाडीत. **अण्णांनीं** या उत्सवाकरितां प्रत्येक दिवशींच्या वाहनाचीं निरनिराळीं पदें करून शिवाय विडा, शेजारती, काकडआरती इत्यादि पदें फारच भक्तिरसपूर्ण अशीं केलीं आहेत. यांतील कांहीं कांहीं पद्यें त्यांच्या काव्यरचनेची प्रगल्भावस्था दाखवितात. यावरून तीं **अण्णानीं** उत्सव सुरू झाल्यानंतर कांहीं वर्षांनीं केलीं असावींत असें वाटतें. उत्सवप्रसंगीं ह्मटलीं जात तीं पद्यें पुढें क्रमशः दिलीं आहेतः—

## शंकराच्या वाहनांचीं पदें.

### पुष्प वाहन १.

( शशिकुल भूषण गुणवंता या चा० )

वंदुनि पुष्पकिं शंकर हा ॥ जनहो भविं निःशंक रहा ॥ धृ० ॥ कारण पुष्पचि सृष्टीला ॥ बघतां दिसे दृष्टीला ॥ पुष्पाविण फळ वृक्षाला ॥ नाहीं भासे हें सकला ॥ निःसार्थकता पूजेला ॥ पुष्पाविण कीं प्रिय त्याला ॥ चाल ॥ ह्मणुनि बसवुनि प्रथम पुष्पकीं करिति महोत्सव हा ॥ भक्ता कल्पद्रूमसम हा ॥ वंदुनि पुष्पकिं० ॥ १ ॥ सृष्टी स्थावर जंगम ही ॥ रचिली क्षणांत लवलाही ॥ जेणें परमेष्ठी तोही ॥ निपजे कोठुनि हें पाही ॥ यापरि शोधन करितांही ॥ पुष्पाचि निदान सकलाही ॥ चा० ॥ कुसुमप्रिय कुसुमावरि बैसे कुसुमायुध हर हा ॥ सेवन करितां सौख्य महा ॥ वंदुनि पुष्पकिं० ॥ २ ॥ हिमनगतनया वरदेवा ॥ घ्यावी भक्ताची सेवा ॥ तुमचा प्रसाद हा व्हावा ॥ कृपाकर मस्तकिं तो ठेवा ॥ तुजविण अन्य नसे ठावा ॥ यातें योग्य पथीं लावा ॥

चाल ॥ नीलकंठ गंगाधर शंभो सांब पिनाक वहा ॥ बलवंतावरि सदय पहा ॥ वंदुनि पुष्पकि० ॥ ३ ॥

### सूर्यवाहन २.

( मला शांत मुनी भासतो या चा० )

अमरवरनमितपद गौरीमुखकमल रवि ॥ सक्त भक्ताघ भो शीघ्र वेंची ॥ देव ॥ धृ० ॥ परम दैदीप्यता काय ही झळकते ॥ अरुण-सारथि-तरणि-मंडलाची ॥ त्यावरि ईश आरूढतां फांकली कोटि विद्युत्प्रभा कुंडलांची ॥ देव ॥ अमरवर० ॥ १ ॥ यदुदयें सकल तम नष्टता पावते ॥ दुष्ट रोगासि करि पिष्ट साची ॥ इष्ट जो सकलिकां त्याचिया विंबगत तूज पाहोनि हा दुःख मोची ॥ देव ॥ अमरवर० ॥ २ ॥ जो रवि एकला सर्वदा तापवी ॥ त्यांत तव योग मग कायनाची ॥ कांचनीं जेवि मणि तेवि रवि मंडळी ॥ बघत बलवंत अनिमेष साची ॥ देव ॥ अमरवर नमित० ॥ ३ ॥

### मयूरवाहन ३.

( काय परम रमणीय सखीचें या चा० )

आज परम रमणीय दयाघन दीन पावन देखीला ॥ धृ० ॥ आगम-निगम-दुर्गम महिमा परि ॥ दृष्टिं सुगम जाहला ॥ सर्पवसन कंदर्पविनाशन शिखिवरी आरोही जो नमूं त्याला ॥ आज० ॥ १ ॥ नाम अति मंगल ज्या प्रभूचें ॥ किती विमल भोला गणपजनक कुणपेशसुधारक चूडबर्हिवरि बैसुनि आला ॥ आजप ॥ २ ॥ काय विभो वर्णूं तव महिमा ॥ शेषहि बहु शिणला ॥ दुस्तर भवजलनिधिमग्ना या ॥ पार करीरे बलवंताला ॥ आज परम रमणीय ॥ ३ ॥

### अश्ववाहन ४.

( वाटे सर्वथा मुक्त झालों. या चालीवर )

वंदूं शंभुला हर दयाला ॥ धृ० ॥ शुद्ध-पयफेन-धवलांग-तुरंगावरी ॥ वज्र-वैडूर्य-माणिक्य-नग ज्या वरी ॥ आजि कामारि आरूढ झाला ॥ वंदूं० ॥१॥ वेगजितवातमन रूपजित शक्र हय ॥ वर्णजित सोम रविकिरणजित मेघभा ॥ त्या हयीं आमुचा देव भोला ॥ वंदूं० ॥ २ ॥ काय मद्भाग्य हें रूप अजि दाविलें ॥ पाप तें मागलें सर्वही जाळिलें ॥ तोडि बलवंत गत मोह झाला ॥ वंदूं० ॥ ३ ॥

### सिंहवाहन ५.

( शंकरा भरणा० या चालीवर )

वद वद गुण वाचे ॥ भव-नदि नाविकाचे ॥ धृ० ॥ उत्पत्तिस्थित्यंतका ॥ दक्षयज्ञ-विध्वंसका ॥ सिंहासन तव मौजेचें ॥ शोभतें साचें ॥ वद वाचे ॥१॥ यानियामहाखालीं ॥ बसुनिया करी केली ॥ रात्रिंचर रुधिराचे ॥ पानीं हरि

नाचे ॥ बद वा० ॥ २ ॥ वाहन हें भयंकर ॥ परि दासा सुशंकर ॥ भय निंदा करणाराचें ॥ बलवंता कैचें ॥ वद वा० ॥ ३ ॥

### शेषवाहन ६.

रक्षीं विभो दासाला ॥ देवा गौरीमुखांबुजलोला ॥ धृ० ॥ विबुधांचित-पद-कमला ॥ भस्मविलिप्त-विशाला ॥ निखिल-सुरासुर-मूला ॥ देवा ॥ कुंडलशोभि कपोला ॥ रक्षीं विभो ॥ १ ॥ धृत-भव-नाटक-सूत्रा ॥ नाग-विभूषित-गात्रा ॥ कर-नर-कपाल-पात्रा ॥ देवा ॥ पितृवण-विहरणशीला ॥ रक्षीं विभो० ॥ २ ॥ ब्रह्माद्या शिखील पाला ॥ शेषयानिं नमुं तुजला ॥ पद-रज दे भक्ताला ॥ हो मोक्षद सुख बलवंताला ॥ रक्षीं विभो० ॥ ३ ॥

### नंदीवाहन ७.

( कर्नाटकी चाल श्रीराम. )

पहा पहा काय सुंदर ॥ दिसे शोभा वीर नरवर ॥ नंदिकेश्वर पृष्ठिवर ॥ आरूढला त्रिपुरान्तक हर हर ॥ पहा० ॥ धृ० ॥ हेम-घंटा नाद घणघण ॥ दोहिं भागीं सर्वही गण ॥ नंदी भृंगी धरिति वेसण ॥ उडविति वर छत्र चा-मर ॥ पहा० ॥ १ ॥ शंख दुंदुभि डमरु वाजत ॥ भूतांचा सरदार गाजत ॥ आली स्वारी किती साजत ॥ आज त्या बघतो नयनभर ॥ पहा० ॥ २ ॥ नभीं दाटलें सुर विमानें ॥ पहाया तुज संभ्रमानें ॥ कुसुम वर्षति अति मानें ॥ बलवंता हर्ष निर्भर ॥ पहा० ॥ ३ ॥

### हंसवाहन ८.

शृंगा ताडोनि या चालीवर. )

रवीशशि-शिखिनेत्रा ॥ पालय ॥ यक्षराजमित्रा ॥ पालय ॥ धृ० ॥ कटि-वे-ष्टित-चर्मा ॥ शर्मद ॥ रण-दारुण-कर्मा ॥ शर्मद ॥ धर्मा-धर्म-विहित-पथ-वर्मा ॥ कूर्मा-कृति हरि वरद पवित्रा ॥ रवि० ॥ १ ॥ निजबोधामृतपा ॥ भूपा ॥ श्रुति-निर्णित-रूपा ॥ भूपा ॥ श्रितभवतापामृतमयकूपा ॥ पापागाशनि चित्र-विचित्रा ॥ रवि० ॥ २ ॥ नमितों वरपुंसा ॥ हंसा ॥ वरि तुज परहंसा ॥ हंसा ॥ कंसांतक कृतपूजोत्तंसा ॥ अंसा धरि बलवंता पुत्रा ॥ रविशशि० ॥ ३ ॥

### गजवाहन ९.

( पूर्वी अधरोष्ठावरि तूझ्या या चाली० )

कैसा करि-राजावरी शोभे गिरिराजाचा जामाता ॥ पंचवदन हा पतितोद्धारक त्याजपुढें जोडा हाता ॥ धृ० ॥ कमलासन केशव रुद्राचा कर्ता जो आश्रय संता ॥ दक्षा-भक्ताध्वर-संहर्ता चंद्रार्धा शेखरिं धरितां ॥ कैसा० ॥ १ ॥ वहनोत्तम अजिच्या यानावरि देवोत्तम ईशां बघतां ॥ संचित पापांतुनि किंचितही उरविशि हे ध्रुव भगवंता ॥ कैसा० ॥ २ ॥ गंगाधर निःसंग निरं-जन निर्गुण मी मायातीता ॥ माता तात तुजचि जो म्हणतो रक्षीं रे त्या ब-लवंता ॥ कैसा० ॥ ३ ॥

## रथवाहन १०.

( जो मम नयनचकोरा इंदु. या चालीवर ).

नांदे कैलासाच्या शिखरीं ॥ सक्त-भक्त संकट वारी ॥ सुरवर पूजिति ब्रह्मा हरि ॥ नित्य नियमानें ॥ १ ॥ भाळीं शोभे शशिची कला ॥ भस्म अंगीं अहिमेखला ॥ गणेश बालक अजब छबिला ॥ पांच वदनें ॥ २ ॥ मस्तकीं गंगा व्याघ्रचर्म ॥ आसन सज्जनपालन धर्म ॥ असुरा मर्दुनि दिधलें शर्म ॥ वंद्य वेदानें ॥ ३ ॥ महिरथ गिरिचे केले चाप ॥ शतधृति सारथि बाण माप ॥ रवि-शशि चक्रें रज्जु साप ॥ वेद हयें ज्यानें ॥४॥ ऐसा ईश अघटितपरी ॥ बलवंतानें चित्तावरी ॥ रेखुनि केलासे शेजारीं ॥ थोर भाग्यानें ॥ ५ ॥

## जन्मपूजा ११.

( तनु ईची सुंदरा सहज मनोहरा. या चालीवर ).

पहा कौतुक झडकरी ॥ स्मराचा अरि ॥ धरुनि शिशुरूप मानवापरी ॥ बसला हा स्वांबांकावरीं ॥ धृ० ॥ माया ज्याच्या करीं ॥ तो मृत्सा घेऊनियां रुदन करी वरी वरी ॥ लीला बालत्वाच्या करी ॥ पहा० ॥ १ ॥ कैलासींच्या शिरीं ॥ भक्त कैवारी ॥ प्रार्थिला दुःख कथुनिया सुरीं ॥ म्हणोनियां रूपा हा धरी ॥ पहा० ॥ २ ॥ मौज करिल हा खरी ॥ या अवतारीं तारिल बहु जन भवसागरीं ॥ देवा बलवंता उद्धरी ॥ पहा० ॥ ३ ॥

## मृत्युंजयावतार १२.

मम मानस-मधु-लिह रमला ॥ पाहुनि शिवपद कमलाला ॥ धृ० ॥ भक्त-मनोरथ-पूरक तो हा ॥ गौरीहि दे दशवदनाला ॥ मम ॥ १ ॥ मुनिसुत यम-दूता जैं भ्याला ॥ लिंगांतुनि जो अवतरला ॥ मम० ॥ २ ॥ काला जिंकुनि मृत्युंजय तो ॥ संरक्षी बलवंताला ॥ मम० ॥ ३ ॥

## किरातवेष १३.

( पंचतुंड नररुंड मालधर० या चा० )

पार्थासाठीं शंकर कपटी भिल्लाचा मग वेष धरी ॥ धृ० ॥ वल्कल कटिशीं कसुनि करीचा गंडस्थल-मद तिलक करी ॥ गुंजा-मणिचे हार गळ्यामधि पार्वति भिल्लिण बनलि खरी ॥ पार्था० ॥ १ ॥ शिखिपिच्छानें मस्तक शोभवि नग धनु तेंही घेई करी ॥ सर्वहि गण ते तत्सम होति तेथें विलासे त्रिपुरारि ॥ पार्था ॥२॥ विश्वनिगम ते श्वान बरोबर आला विजया शेजारीं ॥ बलवंतानें हेंचि जाणिलें भक्ताचा हा कैवारी ॥ पार्था० ॥ ३ ॥

## शेजेचें पद.

( दिसतीं जों जों शैलाचींही शिखरें० या चा० )

निशा फार जाहली जाणुनी भोळ्या नाथासी ॥ नेत्र-कटाक्षें सुचवी पार्वति यावें शेजेसी ॥ शेजमंदिरीं सर्व सिद्धता सत्वर मग केली ॥ सकल-समूहा-सहीत तेथें शिवमूर्ती आली ॥ काय वर्णुं तेथिल ती शोभा मति कुंठित जाहली ॥ रत्न-मंचकीं शिवानंदलहरी ती आरूढली ॥ वामांकावरि येउन गौरी

प्रेमानें बसली ॥ ब्रह्मासंनिध चैतन्याची कळाचि ती दिसली ॥ सुधेतुल्य ती दुग्ध शर्करा शिवासि पाजियली ॥ उत्तम वासित थंड उटी मग देवा लावियली ॥ भक्तसंकटें हरोनि सर्वहि बहूत जी श्रमली ॥ ब्रह्मानंदीं मग्न शिवाख्या मूर्ती मग निजली ॥ सर्व गुणांनीं पूर्ण तांबुला शिवासि खायासी ॥ बलवंताची माता पार्वती उठली द्यायासी ॥ निशा फार० ॥

## विडा-पद.

( शार्ङ्गरवा मित्रा हे सारे० या चा० )

हात जोडुनी विनवी गिरिजा विडा घ्या देवा ॥ प्रेम-भक्तिनें अर्पण केला आपण सेवावा ॥ धृ० ॥ भक्ति नागवल्लीचीं पानें आणिलीं काढोनी ॥ चुना लाविला अहंकार मौक्तिकें जाळोनी ॥ ध्यानपटीं जो शांतिजलानें शुद्धचि गाळोनी ॥ क्रोध सुपारी फोडुनि घातली राग कात पहावा ॥ हात० ॥ १ ॥ संसाराचा सर्व मसाला मध्यें मिसळीला ॥ वैश्वानररूपत्वीं तुमच्या मुखिं यो रंगाला ॥ कीर्तिरूप-वासानें सुखवित आपुल्या वदनाला ॥ भक्तावरिचा रक्तपणा तव अधरोष्ठीं यावा ॥ हात० ॥ २ ॥ भक्तकाम-कल्पद्रुम घेई विडा आनंदें ॥ सकल सुरांचा यूथ येउनी चरणीं मग वंदे ॥ संतोषानें आशी दिधल्या ब्रह्माच्या कंदें ॥ भो चिद्रूपा या बलवंता मोक्षपथीं लावा ॥हात०॥३॥

## शेजारति-पद.

( आरती भुवनसुंदराची० या चा० )

सुरवर मधुकर सत्कमला ॥ शेजारती करूं तुजला ॥धृ०॥ रंजित जटाजूट गंगा॥ उमा वदनाब्ज दृष्टि भृंगा॥ गुणगण मंडित भस्मांगा त्रिपुरमन्मथहर निःसंगा॥ ॥चाल॥ कोटि-रवि-दीप्ति वदनिं झळके॥ फणामणि सर्वांगीं ठळके॥ जेंवि धगधगित ॥ वीज झगझगित गौरी चकचकित ॥ चकवी विधिहरिनेत्राला ॥ शेजारती०॥१॥ करनरकपाल सुखसदना ॥ चराचर-गुरो पंचवदना ॥ खरतर-रात्रिंचर कदना ॥ गणप-मुखलोल कुंदरदना ॥ चाल ॥ रजतगिरिनिलय कालकाला॥ निशाकरसंसेवितभाला ॥ दंड सडसडित ॥ छाटि खडखडित ॥ डमरु गडगडित ॥ खडाडा ध्वनी खडावाला ॥ शेजारती० ॥ २ ॥ योगिहृत्कमल राजहंसा ॥ ओंवाळितो परमहंसा ॥ आदि-मध्यांतरहित-पुंसा ॥ महोरगवेष्टित शुच्यंसा ॥ चाल ॥ सकलसुरमंडन शिखिनयना ॥ निशामुख तांडव दिग्वसना ॥ झांज झं झनन ॥ मुरज धुं धनन ॥ गानिं तुं तनन ॥ श्रवणकरी बलवद्गानाला ॥ ॥ शेजारती० ॥ ३ ॥

याप्रमाणें आद्य **शंकराचार्यां**चा जन्मोत्सव पुढें आणण्याचें श्रेय **अण्णा** व **गुर्लासूर** येथील त्यांची मित्रमंडळी यांस आहे. व प्रस्तुत **अण्णांचें** कुटुंब व **बाबा गर्दे** हे तो चालवीत आहेत.

---

## पुण्यास येणें.

सन १८६३ सालीं विद्याभ्यासाकरितां **अण्णांस** व **बाबा गर्दे** यांस त्यांचे आजे **नानासाहेब** यांनीं पुण्यास पाठविलें, **अण्णांचीं** पूर्वी इंग्रजी पुस्तकें दोन झालीं होतीं. **बाबांचें** नुसतें मराठीच शिक्षण झालें होतें. म्हणून **अण्णा विश्रामबागेंतल्या** शाळेंत गेले. व **बाबा फडके** यांच्या वाड्यांतल्या मिशनस्कुलांत गेले. विश्रामबागेंतल्या त्या वेळच्या शिक्षणपद्धतीप्रमाणें **अण्णा** जुनीअर फर्स्ट क्लासपर्यंत गेले. त्या वेळचे त्यांचे सहाध्यायी म्हणजे **नाशीकचे** वकील **नारायण परशराम टिळू** व **पुण्यांतले** शनिवार पेठेंतले प्रतिष्ठित घराण्यापैकीं **नाना शेवडे** व **नाना लेले** हे गृहस्थ होते. **शेवडे** हे पुढें **पंढरपूर, विजापूर** वगैरे ठिकाणीं नाझर होते. **अण्णांचें** राहणें शनिवार पेठेंत मारुतीच्या देवळाच्या पिछाडीस **सरवटे** यांचे वाड्यांत बिऱ्हाड करून असे. जेवणखाण प्रथम **मोरो गोपाळ दप्तरदार** यांचेकडे असे. परंतु तेथें व्यवस्था बरोबर होत नसे म्हणून मग त्याच पेठेंत **भाऊ आरोळे** ह्मणून एक सत्वस्थ गृहस्थ असत त्यांच्या घरीं जेवणाची व्यवस्था झाली. येथपर्यंत विद्यार्थीपणाला जी योग्य व्यवस्था पाहिजे होती ती झाली. परंतु तिचा अम्मल आमच्या चारित्रनायकावर कोठें झाला? त्यांनीं आपली दिशा निराळीच धरिली. मनावर कोणाचें दडपण नसल्याकारणानें स्वतंत्र वागण्यास अधिक मोकळीक सांपडूं लागली. त्यांत **अण्णांचे** बरोबर **कृष्णशास्त्री खांडेकर** नांवाचे हरदास होते—हेही स्वच्छंदींच होते—यांची विशेष संगती लागली. **अण्णांना** मनुष्याचें वशीकरण फार असे, त्यामुळें **हिरण्यकश्यपूचा** पुत्र **प्रल्हाद** याला त्याच्या कुळधर्माप्रमाणें योग्य शिक्षण देण्याकरितां जरी चांगली व्यवस्था केली होती, तरी त्यानें गुरुजीची पाठ वळली कीं, जसें “ नारायण ” नामानें आपल्या संवगड्यांसह शाळा दणाणून सोडावी त्याप्रमाणें **अण्णांनींही** वर सांगितलेले सहाध्यायी **टिळू, शेवडे, लेले** वगैरे आपल्यासारखे करून ठेविले. शाळा सुटली कीं, नाटकाचा छंद. नाटकमंडळीच्या ओळखी झाल्या. नाटकें पाहण्यास मिळूं लागलीं. **अण्णा** मग त्या मंडळीला कविता करून देऊं लागले. इकडे अभ्यासाकडचें लक्ष उडत चाललें. दिवसां कसेबसे शाळेंत जात; परंतु रात्रीं नाटक असेल

तें मात्र चुकत नसे. समुद्रमंथन, अंबाअंबिकाअंबालया व विक्रमचरित्र या आख्यानांवर **पुणें**कर मंडळीस त्या वेळीं **अण्णां**नीं कविता करून दिल्या आहेत. **अण्णां**च्या कवितेंत पुढें पुढें जो प्रसादगुण भरला तो जरी आरंभीं नसे तरी कवित्वाचा जो सहजपणा तो आरंभापासूनच त्यांच्या कवितेंत दिसून येतो. यांनीं केलेल्या अंबा अंबिका अंबालया कथेंतल्या पदांतील एक पद पुढें दिलें आहे. हा प्रसंग **भीष्मानें काशी राजा**च्या तिन्ही कन्या जिंकल्या असतां **अंबे**चा त्यानें धिक्कार केल्यावरून ती त्यांस म्हणत आहेः—

**पद ताल झंपा.**

गर्व तुज सर्वजित, परि पहा घालविन सेविते कानना जाण वेगीं. ॥ ध्रु० ॥
काय त्या मज गुहा नसति तप साधका म्हणुनिरे पातका साधु येथें ॥ १ ॥
शंकरा तोषवुनि आसिते घेऊनि आस ते धरुनिया जाण वेगीं ॥ २ ॥

हें पद्य पूर्ण मिळत नाहीं तरी एवढ्यावरूनच त्यांच्या कावित्वगुणाची कसोटी कळते.

असो. अशा तऱ्हेचा क्रम चालत असतांना मुलांचा अभ्यास कसा चालला आहे तो पाहण्याकरितां **बाबां**चे वडील **दादा गर्दे** पुण्यास आले. तों अशा स्थितींत मुलांस येथें ठेवणें बरें नाहीं असें वाटून त्यांस **बेळगांवास** नेण्याचा त्यांनीं निश्चय केला; परंतु **अण्णांस** हा विचार रुचला नाहीं. त्यांनीं येथलीच शाळा चांगली आहे, आह्मी येथेंच राहून अभ्यास करणार म्हणून स्पष्ट सांगितलें. तेव्हां **दादां**चा निरुपाय होऊन त्यांनीं आपल्या चिरंजीवास एकट्यासच **गुर्लासुरास** परत नेलें.

याप्रमाणें **अण्णा** व **बाबा** हे एकाच उद्देशानें एकाच ठिकाणीं राहिले असतां दोघांच्या दिशा भिन्न होऊन त्यांच्या आयुष्यक्रमांत पुढें फेरफार कसा झाला ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. **अण्णा**साहेब पुढें नाट्यकलेंत लौकिकास चढले व त्यांनीं आपलें नांव चिरस्थायी करून ठेवलें ही गोष्ट निराळी; परंतु त्या वेळची स्थिति व नाटकासंबंधीं लौकिकसमजुती ध्यानांत घेतल्या, म्हणजे त्या वेळेस तरी त्यांनीं आत्महितविघातक व आपल्या घराण्याचा दुर्लौकिक करणारा मार्ग स्वीकारला होता असें म्हणण्यास चिंता नाहीं व यावरूनः

पूर्व-दत्ता च या विद्या पूर्वदत्तं च यद्धनम् ।
पूर्व-दत्ता च या भार्या अग्रे धावति धावति. ॥

हें वचन खरें म्हणावें लागतें. असो. याप्रमाणें **अण्णां**च्या विद्याभ्यासाची सुमारें एकोणीस वीस वर्षांच्या वयांतच **पुणें** मुक्कामीं इतिश्री झाली.

---

## नवा आश्रम.

**पुणें** शहरची **कसबा** पेठ ही हल्लींपेक्षां, चाळीस वर्षांपूर्वीं अगदीं कोन्याकोपऱ्यांतली वस्ती असे. **कसब्याच्या गणपती**समोर हल्लीं जो मोठा रहदारीचा रस्ता आहे, तेथें सुमारें चार हात रुंदीची गल्ली असे. या गल्लींतून गणपतीजवळ आणखी एक **केदारेश्वरा**चा बोळ आहे. व त्या बोळांत दोन हात रुंदीची एक लहानशी गल्ली आहे. या गल्लींत अगदीं कोपऱ्यांत व अडचणींत असें एक घर आहे कीं, सध्यां जरी चोहोंकडे हमरस्ते झाले आहेत तरी ती जागा अझूनसुद्धां कोणाला एकाएकीं सांपडावयाची नाहीं. तेथें आज कित्येक वर्षें वस्ती नाहीं. तें घर **अण्णां**च्या दीक्षेचें मूळपीठ होय. येथें मागच्या भागांत सांगितलेले संवगडी व आणखी गांवांतलीं मुलें जमवून तालमीला सुरुवात झाली. पैशाची मदत पाहिजे. बाकीची मंडळी पराधीन. कायते स्वतंत्र अण्णाच. त्यांनीं आपल्या कानांतली मोत्याची भिकबाळी विकली. शिवाय सावकाराकडून कांहीं कर्जही काढलें. सावकार जातीनें मारवाडी होते कीं, कृतीनें होते हे बरोबर समजलें नाहीं. परंतु **शेक्सपीयर**च्या **शायलाक**प्रमाणें त्यानें **अण्णा** व त्यांचे जोडीदार यांच्याकडून शंभर रुपयांला दोनशांचा कागद करून घेतला. या मंडळींत कांहीं मुलें **पुणें** शहरांतील अब्रूदार व घरंदाज गृहस्थांचीं होतीं, त्यामुळें **पुण्यां**त नाटक करावयास कोणी धजेना. तेव्हां पहिला मुक्काम **नगरास** करावयाचा असें ठरलें. **अण्णां**नीं त्या वेळीं माणसें मिळविलीं तीं त्या काळच्या नाटकाच्या प्रत्येक कामास लायक अशींच मिळविलीं. पूर्वीं पौराणिक नाटकांत राक्षसी व तरवारी फिरविण्याचे कामांत प्रसिद्ध असलेले **रावजी पवार** व **बळवंतराव डाके**, पखवाज वाजविण्यांत अजूनही प्रसिद्ध असे **पुण्यां**तील **मार्तंडबोवा गुरव**, बायकाच्या सोंगाकरितां **नाना मोनी** नांवाचा एक चांगलें काम करणारा मुलगा, सूत्रधाराच्या

कामाकरितां मागें सांगितलेले कृष्णशास्त्री खांडेकर इत्यादि माणसें जमवून जय्यत तयारी झाली व मंडळी नगरास गेली. मात्र जातांना नाना शेवडे व लेले हे गळाले.

पूर्वी नाटकांत मुलें न्यावयाचीं तीं बहुतेक पळवून व आईबापांस विचारल्याशिवायच नेत असत. हा प्रकार कित्येक वर्षे तरी चालला होता. एका प्रतिष्ठित गृहस्थाचा मुलगा त्यावेळीं नाटकांत गेला होता, त्यानें यासंबंधानें ज्ञानप्रकाशपत्रांत एक पत्रव्यवहार प्रसिद्ध केला होता तो पुढें दिला आहे:

" रा. रा. सर्व मराठी वर्तमानपत्रकर्ते यांस—

" विनयपूर्वक, नम्रतेनें प्रार्थना करतों कीं, नाटकवाले व तमाशेवाले हे लहान व अल्पवयी मुलें व संभावित कुळींचीं मुलें फुसलावून आपले नाटकांत वगैरे नेतात व तेणेंकरून त्या गरीब बापुड्या त्यांचे आईबापांस फार दुःख होतें. व तीं आपलीं बाळकें परत आणण्यासाठीं त्यांस गांवोगांव फिरावें लागून म्याजिस्ट्रेट वगैरेकडे फिर्याद करून फार कष्ट भोगावे लागतात व कोणी मुलांकडील माणूस तपासावयास आलें आहे असें त्या धूर्त नाटकवाल्यास समजलें म्हणजे त्या मुलांस लपवून ठेवून त्यांची व मनुष्याची गांठ पडूं देत नाहींत असा त्या बापुडे आईबापांस अनर्थ प्राप्त होतो, हें सर्वांस माहित आहेच. यास्तव त्याजबद्दल उदाहरणें दाखविण्याचें कारण नाहीं. असा अनर्थ टळावा याजकरितां इतःपर नाटकवाल्यानें अगर तमाशेवाल्यानें कोणा सोळा वर्षांचे आंतील मुलांस त्यांचे आईबापांचे रुकाराखेरीज घेऊं नये व जर कोणी घेईल तर त्यास दोनशें रुपयेपर्यंत दंड होईल म्हणून वगैरे आक्ट ठरवावा. याजबद्दल मीं आनरेबल मि० एलिस साहेब यांजकडे त्यांचे योग्य विचाराकरितां याद प्रविष्ट केली आहे. हें कृत्य जनाच्या हिताचें व संबंधाचें आहे, यास्तव या कृत्यास सर्व पत्रकर्ते आपले पत्रद्वारें योग्य मदत करतील अशी त्यांस सेवकाची प्रार्थना आहे व येणेंकरून दीन आईबापांवर व लोकांवर आपले फार उपकार होतील.

ता० १० डिसेंबर १८६५ "गरीब सेवक."

या पत्रावरून वर जीं अब्रूदारांचीं मुलें होतीं ह्मणून सांगितलीं त्यांचा संबंध यांत असावा असा तर्क होतो. असो. मंडळी नगरास गेल्यावर तेथें विक्रमचरित्र, व एल्फिन्स्टन व बाजीराव यांचा " फार्स " वगैरे भाग करून दाखवीत असे. इंग्रजी भाषेत तेथील ग्यारिसन नाटकगृहांत प्रमिलास्वयंवराचा प्रयोग करून दाखविला. असें कोणी कोणी सांगतात. ही मंडळी फार दिवस टिकली नाहीं. यांतली कांहीं कांहीं

मंडळी फुटून वेगळी झाली व बाकी राहिलेल्या मंडळीस घेऊन **अण्णा** खानदेशाकडे गेले. मंडळी चालवितांना त्यांची हालअपेष्टाही बरीच झाली. परंतु नाटकाचा नाद सुटेना. घराकडून शोध करीत दोनदां माणसें आलीं. एकाला पहिल्या खेपेस थापा देऊन वाटेस लावलें. दुसऱ्या खेपेस मात्र **हरभट खरे*** नांवाचे त्यांचेच आश्रित होते ते आले व **अण्णांस** घेऊन गेले. **अण्णांना** या वेळीं परत जाण्याला आणखी एक दोन कारणें झालीं आहेत. एक त्यांचे आजे **नानासाहेब** स्वर्गवासी झाले होते. व दुसरें खानदेशांत कोणत्याशा गांवीं यांची मंडळी गेली, तेथें मंडळींत कांहीं बैदा झाल्यामुळें म्हणा, किंवा गांवांतल्या लोकांनीं कांहीं खोडसाळपणा केल्यामुळें म्हणा, यांस कचेरीची पायरी चढण्याचा प्रसंग आला. त्या ठिकाणीं **किर्लोस्कर** घराण्याचें **अण्णांच्या** तोंडून नांव कळतांच, तेथील अधिकाऱ्यानें कांहीं रागे भरून व कांहीं बोधाचे दोन शब्द सांगून यांना नाटकाच्या धंद्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. अशा कित्येक गोष्टी जमून आल्या कारणानें **अण्णा** मंडळी सोडून घरीं **गुर्लासुरास** आपल्या वयाच्या बाविसाव्या वर्षीं म्हणजे सुमारें १८६६ मध्यें परत आले.

---

## घरीं आल्यावरचे उद्योग.

दोन वर्षांच्या व्यवसायांत **अण्णांची** प्रकृति फार खराब झाली होती ती घरीं आल्यावर नीट होण्यास बरेच दिवस लागले. घरीं असतांना 'दक्षिणाप्राईज कमेटी'कडून **शिवाजीवर** कविता करणारास बक्षीस मिळे-

---

* हे भटजी नुकतेच निवर्तले आहेत. अण्णाला परत आणण्याची मोठी कामगिरी केल्यावद्दल त्यांना दोनशें रुपये देऊन त्यांच्या कुटुंबानें स्वतःला ऋणमुक्त करून घेतलें. असें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, अण्णा परागंदा झाले असतां त्यांच्या कुटुंबानीं जो कोणी अण्णास परत आणून देईल त्यास मी अंगावरचा दागिना सुद्धां देईन असें काकुळतीनें सांगितलें होतें. हें काम हरभटजीनें केल्यापासून त्यांनीं सारखी टुमणी लावली होती. ती इतकी कीं, ऐन अण्णासाहेबांच्या सुतकांत सुद्धां ते भटजी विसरले नाहींत. अण्णासाहेबांच्या कुटुंबानें तशा दुःखांत आपल्या जवळचा जिन्नस पुढें करून त्यांचें तोंड मिटविलें व पुढें वर सांगितल्याप्रमाणें त्यांनीं आपलें वचन पुरें केलें.



बळवंतराव तांबे, अ. सा. चे स्नेही. | डाक्तर गणपतराव गर्दे. | अण्णासाहेब

चि० शा. प्रेस, पुणें.

ल म्हणून एक जाहिरात प्रसिद्ध झाली होती. तिच्यावरून पांचशें आर्या करून अण्णांनीं कमेटीकडे पाठविल्या होत्या. बक्षिसाकरितां पाठविलेल्या पुस्तकांचे गुणाप्रमाणें चीज होतेंच असा कांहीं नियम नाहीं. त्याप्रमाणेंच अण्णांच्या कवितेची स्थिति झाली. त्या वेळीं **माधवराव कुंटे** यांच्या कविता पसंत पडल्या. अण्णांच्या कविता नापसंत झाल्यामुळें त्या आतां मुळींच उपलब्ध नाहींत; त्यामुळें त्यांच्या बरेवाईटपणाबद्दल कांहींच बोलतां येत नाहीं.*

---

* कमिटीनें ज्या कविता पसंत केल्या आहेत त्यांच्या मासल्याच्या कविता म्हणून एका " विलायती कवी " नें करून १८७२ च्या फेब्रुवारी महिन्याच्या ज्ञानप्रकाशच्या एका अंकांत प्रसिद्ध केल्या होत्या. त्या जराशा मनोरंजक आहेत ह्मणून पत्रासुद्धां जशाच्या तशाच दिल्या आहेत.

" आलीकडे थोड्या दिवसांत एक कवितेचें पुस्तक माझ्या पाहण्यांत आलें. त्या पुस्तकाचे कर्ते कोणी रा. महादेव मोरेश्वर कुंटे ह्मणून आहेत. त्यांची भाषा इतकी प्रौढ ( व ) अर्थगांभीर्य इतकें मोठें आहे कीं, त्यांनीं केलेल्या कवितेप्रमाणें आपणही करावी व त्यांचा कल्याणशिष्या व्हावें असें मनांत आलें. त्याप्रमाणें कांहीं पद्यें करून आपणाकडे पाठविलीं आहेत त्यांचा स्वीकार करावा.

इथे हा मराठा तिथे हा मराठा ।
कसा हा हो ओटा कसा हा खराटा ।
नको लाथ मारू नको टांग मारू ।
नकोरे नकोरे वो वो रे रुरुरु ।
जरी तूज आला बहुतोचि घुस्सा ।
तरी तूज देईन वरा एक ठुस्सा ।
तुझा बाप लंगडा इथें झाडपाला ।
मला जेवणें करीं मस्ती झाला ।
यटाटा फटाटा यटाटा सणाटा ।
हटाटा हटाटा थटाटा टटाटा ।
अगग अरेरे अवव अगाई ।
रंग होतो दंग होतो नकोगे अगाई ।

अशीं पुष्कळ पद्यें केलीं आहेत व यांत अर्थ जसा लौकर लक्षांत येतो तसा त्यांतही पण येतो. "

ता० १ आंगस्ट १८७२ च्या ज्ञानप्रकाशांतच "Poet turned a philosopher" या निबंधांत कुंट्यांच्या पुस्तकाचें परीक्षण आलें आहे. हें परीक्षण पुढें तीन अंक चालू होतें. त्यांत यांची एक कविता दिली होती ती पुढें दिल्याप्रमाणें:--

यानंतरचा उद्योग म्हणजे वकीलीचा अभ्यास करून परीक्षा देणें. परीक्षेकरितां ते मुद्दाम **धारवाडास** जाऊन राहिले. तेथें अभ्यास झाला कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं; परंतु परीक्षा मात्र नापास झाली. तेव्हां कांहीं तरी उद्योग पहावा म्हणून ते **बेळगांवास** येऊन **बाबा गर्दे** यांच्या जवळ पुनः राहिले. **बाबा** १८६८ म्याट्रिक्युलेशनची परीक्षा पास होऊन नुकतेच सिटीस्कुलांत असिस्टंट मास्तर झाले होते.

---

## बेळगांव येथें.

**अण्णा** नोकरीच्या उद्देशानें **बेळगांवास** येऊन राहिल्यावर सुमारें पांच सहा महिन्यांनीं तेथील आंग्लोव्हर्नाक्युलर स्कूलमध्यें त्यांस **इन्स्पेक्टर रसेल** साहेब यांच्या मेहेरबानीनें पंचवीस रुपयांची उपशिक्षकाची जागा मिळाली. ही जागा देण्याची जशी **रसेल** साहेबांनीं मेहेरबानी केली तशी **अण्णांनीं**ही ती स्वीकारण्याची मेहेरबानीच केली म्हणावयाची. कारण आळस, रंगेलपणा, मंडळी, गाणें, वाजविणें इत्यादि शोकामुळें नोकरींत नियमितपणा कसा राहणार ? विद्यार्थी दशेंत अभ्यासाची हेळसांड होण्याला जीं कारणें झालीं तींच शिक्षक झाल्यावरही होतींच. **बेळगांव** शहर बहुतेक गोष्टींत **पुण्याच्या** बरोबरीचें असल्या कारणानें येथेंही कोणीना कोणी नाटकमंडळीचा तळ असावयाचाच. नाटकमंडळीचा तळ गांवांत पडला कीं, **अण्णांचा** तळ मंडळींत पडलाच. मग नोकरींत कधीं वेळेवर, तर कधीं मागून, कधीं लवकरच उठून यायचें तर कधीं जायचेंच नाहीं. किंवा एखादे वेळीं शाळेंत जाऊनही जो मुलगा वर्गांत प्रथम येईल त्यालाच वर्ग घेण्यास सांगून आपण खुशाल आडबाजूला घोरत पडावें असा क्रम चालायचा. **अण्णा** सर्वांनाच हवे असत.

---

(टीप मागील पृष्ठावरून).

"हा वृक्ष आहे बहुधर्म यांत
उंचीहि रुंदीहि नसेच अंत
उंची कशी हें मन मुख्य पाही
लावी किती लक्ष निमग्न राही."

एकंदरींत कुंट्यांचें कवित्व म्हणजे "अव्यापारेषु व्यापार" अशी लोकांची समजूत झालेली दृष्टीस पडली. तरी पण अण्णांच्या कविता नापसंत झाल्या व यांच्या तपंस पडल्या हें खरें.

म्हणून त्यांच्या अनियमितपणाचा कोणालाही विषाद वाटत नसे. अशा तऱ्हेनें **अण्णांनीं** सुमारें आठ वर्षें **बेळगांवांत** काढलीं. एवढ्या काळांत त्यांनीं उद्योगही बरेच केले आहेत. १८७३ मध्यें "श्रीशांकरदिग्जय" नांवाचें गद्य नाटक त्यांनीं रचून प्रसिद्ध केलें. पूर्वीं **शंकराचार्यांचा** इतिहास प्राकृत लोकांस फारसा माहीत नव्हता. तो याच नाटकापासून विशेष माहीत झाला म्हटलें तरी चालेल. यांत बौद्ध धर्माचें प्राबल्य, कर्ममार्गाची प्रवृत्ति, **शंकराचार्यांचा** जन्म, संन्यास, दिग्विजय, व त्यांचें निर्याण वगैरे इतिहास कथेची विसंगति न होऊं देतां फार चांगल्या रीतीनें नाटकरूपांत दाखविला आहे. हें नाटक निव्वळ प्रयोगाकरितांच रचलें असल्यामुळें, त्या वेळेच्या लोकांच्या अभिरुचीप्रमाणें नाटकांत त्या वेळेची भाषणपद्धति, सूत्रधार विदूषक संवाद हे भाग घातले आहेत.* सदर्हू नाटक **श्रीशंकराचार्य मठ संकेश्वर** यांस आर्पण करून **अण्णांनीं** प्रत्यक्ष वाचून दाखविलें. **स्वामींनीं** त्याबद्दल **अण्णांस** बहुमानपूर्वक शालजोडी बक्षीस देऊन पुढील आशीर्वादपत्र दिलें आहे:

**श्रीशंकर.**

**"श्रीमत्परमहंस, परिव्राजकाचार्यवर्य**
**श्रीऋष्यशृंगपुर षड्दर्शनसंस्थापक**
**श्रीकमलानिकेत करवीरसिंहासनेश्वर**
**श्रीमच्छंकराचार्यान्वय संजातानिभव**
**श्रीविद्याशंकर भारती स्वामिकरकंजोद्भव**
**श्रीविद्यानरसिंह भारती स्वामी जगद्गुरु**
**यांचे संनिधानाहून**

**शांकरदिग्जय नाटक हा ग्रंथ रा० बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णा किर्लोस्कर यांनीं स्वकपोलकल्पित करून संस्थान देवतेस वाचून दाखविला. या ग्रंथांत कथेची वगैरे विसंगति न होऊं देतां सर्व रस**

---

* संस्कृत नाटकांत कथाभागाची संगति जुळविण्याकरितां किंवा जो इतिहास रंगभूमीवर न दाखवितां घडून आला आहे त्याची माहिति देण्याकरितां अंकापूर्वी प्रवेशकाची किंवा विष्कंभकाची योजना केलेली असते. तोच प्रकार या सूत्रधार विदूषक संवादांत असे. कीर्तने यांच्या माधवराव पेशवे या नाटकांत असे संवाद कांहीं आहेत.

साधावयाचे तसे साधले आहेत. व हा ग्रंथ ऐकून संस्थानदेवतेस फारच आनंद झाला. या लहानशा ग्रंथावरून सर्व लोकांस संस्थान-देवतेच्या मूळ कथेची चांगली माहिती होईल. यास्तव सर्व लोकां-नीं या ग्रंथास आश्रय दिल्यास संस्थानदेवतेस संतोष होऊन त्यांनीं संस्थानदेवतेची चांगली सेवा केली असें समजूं. मित्ती आश्वीन शुद्ध १२ शके १७९५ श्रीमुखनाम संवत्सरे.

महानुशासनं वरिवर्ति. ”

या नाटकाचे प्रयोग कोल्हापूरकर, इचलकरंजीकर, सांगलीकर वगैरे मंडळी करीत होती व ते चोहोंकडे फारच लोकप्रिय झाले होते. या नाटकांत विशेष गुण हा होता कीं, प्रयोगांत चित्तवेधकपणा शेवटपर्यंत कायम रहात असे. पुष्कळशा नाटकांत हा गुण आढळून येत नाहीं. या नाटकावर **अण्णांनीं** पद्येंही केलीं आहेत तीं कांहीं नाटकमंडळी पूर्वीं ह्मणत असत. **अण्णांनीं** हें नाटक केलें तेव्हांपासूनच कीर्तिमंदि-रांत त्यांचा प्रवेश झाला असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

यानंतरचा त्यांचा दुसरा उद्योग ह्मणजे **बेळगांवास, भरतशास्त्रोत्तेजक** मंडळीची स्थापना करणें हा होय. या मंडळीनें संस्कृत शाकुंतल, वि-क्रमचरित्र, मल्हाररावाचें नाटक वगैरे प्रयोग केले आहेत. या कामांत यांचे साह्यकारी; **बन्याबापू केळकर, रामभाऊ गिंडे, आरदेसर पारसी, सडेकर** व **अप्पाण्णा मजलीकर** हे असत. **अण्णांनीं** एखा-दी गोष्ट करावयाची मनांत आणिलें कीं, तिच्यांत बहुतकरून ही मं-डळी असावयाची. **बेळगांवास** एक कर्नाटकी पारिजातकनाटक कर-णारी मंडळी आली होती. त्या धर्तीवर मराठींत बसवावें ह्मणून कांहीं बायका जमवून **अण्णांनीं** खटपट सुरू केली, परंतु मिळालेल्या बायका फारच अडाणी असल्याकारणानें तो उद्योग सफल झाला नाहीं. हें पा-रिजातकनाटक पुढें सांगलीकर मंडळीस **अण्णांनीं** स्वतः बसवून दिलें. या नाटकांत बरींच पद्यें संगीत नाटकाच्या पद्धतीचीं ह्मणजे पात्रांनीं ह्मणण्यासारखीं आहेत. यावरून संगीताची कल्पना तेव्हांपासूनच **अण्णांच्या** डोक्यांत घोळत होती हें सिद्ध होतें. *

---

* मराठी रंगभूमीची किल्ली. पान १६

**बेळगांवास** होळीचा सण इतर ठिकाणांपेक्षां निराळ्या प्रकारानें होत असतो. **कामण्णा** ह्मणजे कामदेव याचें चित्र करून त्याचा उत्सव होळीच्या दिवसांत करण्याची तिकडे चाल आहे. इतर शहरांप्रमाणें धूळ, शेणकाला, चिखल, राड, वगैरे सौगंधिक (!) पदार्थांचा खप न करितां धुळवडीच्या दिवशीं रंगाच्या हांड्यांनीं गाड्या भरून रस्त्यानें मिरवीत भेटेल त्याच्या अंगावर रंग टाकण्याची व दिपवाळीच्या सणाप्रमाणें फटाकडे वगैरे दारूही उडविण्याची तेथें वहिवाट आहे. **अण्णांनीं** तेथें एक नवीनच टूम काढली होती. धुळवडीच्या दिवशीं ह्मणण्याकरितां एक स्वतंत्र काव्य रचून त्यांत कांहीं होळीवर व कांहीं गांवांतील त्यांची वकील, शाळामास्तर, सावकार, वगैरे मित्र मंडळी व त्या मंडळीचा ज्या ज्या प्रेमपात्रांशीं संबंध होता त्यांच्यावर पद्यें केलीं आहेत. हें शिमगा काव्य ऐकण्याकरितां धुळवडीच्या दिवशीं शेंकडो लोक जमत असत. हा धुळवडीचा समारंभ **अण्णा** तेथें असत तोंपर्यंत मोठ्या मौजेचा होत असे. **अण्णांच्या** इतर कविता जशा भारदस्तपणांत व कवित्वगुणांत श्रेष्ठ आहेत, तशा शिमग्याच्याही कविता त्या प्रसंगाला साजतील अशा आहेत. ज्या शब्दांनीं कवितेंत प्रसादगुण येईल असें त्यांना वाटलें ती शब्दयोजना शिमग्याच्या कवितेंत करितांना **अण्णांनीं** बिलकूल काटकसर केलेली दिसत नाहीं. शृंगारांत संभोग शृंगार व विप्रलंभ शृंगार असे दोन प्रकार आहेत तशी **अण्णानीं** या कवितेंत कांहीं ठिकाणीं अगदीं उत्तान अर्थाची योजना केली आहे व कांहीं ठिकाणीं गर्भित कल्पना घातली आहे. ही कविता विशिष्ट प्रसंगापुरती व स्नेही मंडळीच्या करमणुकीपुरतीच असल्यानें तिचें महत्व तेवढ्यापुरतेंच आहे; तरी **अण्णांच्या** चारित्रांतील तो एक गमतीचा भाग आहे ह्मणून त्याचा प्रसंगोपात उल्लेख येथें केला. **अण्णा** जरी अधिकारानें तेथें कोणी नव्हते तरी गुणांमुळें त्यांची मानमान्यता गांवांत चांगली असे व त्यामुळेंच वरील प्रकाराबद्दल तेथें कोणास वैषम्य वाटत नसून ते हौसेनें आवडले जात असत. इतकेंच नाहीं तर **अण्णा** तेथें असत तोंपर्यंत त्या शहरांत जो रंगेलपणा व उत्साह असे तो आतां नाहीं असें त्या वेळेचे लोक ह्मणतात.

**अण्णां**नीं नाटकमंडळ्या व हरदास लोक यांना पुष्कळ आख्यानें करून दिलीं आहेत. त्यांपैकीं हल्लीं उपलब्ध आहेत तीं हीं:—

१ पारिजातक.
२ शुकरंभा संवाद.
३ विक्रम चरित्र.
४ रासक्रीडा.
५ हरिश्चंद्र.
६ वीरभद्र अवतार.
७ इंद्रजित वध.
८ रामजन्म.
९ कृष्णजन्म.
१० भीष्मजन्म.
११ कंसवध.
१२ पंडुनिधन.
१३ उत्तर गोग्रहण.
१४ कर्णपर्व.
१५ समुद्रमंथन.
१६ शकटव्यूह.
१७ राधाविलास.
१८ कचदेवयानी.
१९ शांकरादिग्जय.

उपलब्ध नाहींत तीं आख्यानें:

१ अहिमही.
२ कालिदास चरित्र.
३ अंबा, अंबिका, अंबालया.
४ कालिदास उत्पत्ति.
५ विराटपर्व.
६ मेधावती स्वयंवर.

यांशिवाय युक्लीडच्या सिद्धांतांवर सुमारें पन्नास पदें केलीं होतीं; परंतु तींही उपलब्ध नाहींत. हीं सर्व आख्यानें **बेळगांवास** असतांनाच त्यांनीं केलीं आहेत.

**अण्णां**च्या अनियमित वागण्यानें शाळाखात्यांत त्यांची बढती होण्याचा संभव नव्हता. त्यामुळें ते नोकरीला कंटाळल्यासारखे झाले होते. या संधीस **रावजी गंगाधर खोत** हे **बेळगांवास** शहर फौजदार होते. बुद्धिबळें खेळण्याच्या संबंधांत **अण्णां**चा व यांचा फार स्नेहसंबंध होता. यांच्या खटपटीनें तेथेंच त्यांस जमादारीची नोकरी प्रथम वीस रुपयांवर लागली. त्यांच्या सुदृढ व धिप्पाड शरीराची ही शिफारस पोलीस खात्यांत शिरण्याला विशेष उपयोगीं पडली. सुमारें तीन महिने **बेळगांवास** खोतांच्या हाताखालीं काम केल्यावर त्यांची बदली **चंदगडास** झाली. शाळाखात्यांत आपल्याला बढती मिळेल अशी त्यांना आशा नव्हती. ह्मणून त्यांनीं ही जागा हौसेनें पत्करली. परंतु पुढें त्यांना कळून आलें कीं, पोलीस खातें हें सत्वस्थ मनुष्याला फारसें उ-

पयोगी नाहीं. या खात्यांत पुष्कळ वेळां खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें दाखविण्याचे प्रसंग येतात अशी साधारण समजूत असते. स्वतः **अण्णाच** अशा एका प्रसंगाची गोष्ट सांगत असत कीं, एक खोटें नाणें पाडणारा गुन्हेगार पकडावयाचा होता. वहिमानें एका मनुष्याला पोलिसांनीं धरलें. परंतु पुराव्याशिवाय धरणें काय उपयोगाचें? शेवटीं पैला पारा लावून केलेल्या चवल्या कशा बशा त्या गुन्हेगाराजवळ सांपडल्या. परंतु या गुन्ह्याच्या खरेखोटेपणाबद्दल **अण्णां**चें मन त्यांना खाऊं लागलें. अशा एक दोन कारणांमुळें एका वर्षांतच त्यांना त्या नोकरीविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला. या संधीस दक्षिण भाग रेव्हिन्यू कमिशनरचे त्या वेळेचे दप्तरदार **नारायण गणेश** ऊर्फ **नानासाहेब साठये** होते. त्यांची व **अण्णासाहेब** यांची गांठ पडून त्यांनीं यांस तुह्मी पोलीस खात्यांत उपयोगाचे नाहींत असें ह्मणून आपल्या कचेरींत चाळीस रुपये दरमहावर ता. १६ आक्टोबर १८७८ रोजीं मराठी कामाकडे गुंतविलें. यावेळीं या कचेरींत बरेच विद्वान् व पदवीधर गृहस्थ होते. त्यांपैकीं हल्लीं कोणी मोठमोठ्या अधिकारावर आहेत व कोणी पेनशनर आहेत. **अण्णा**ही कदाचित् पुढें मागें अधिक पायरीवर चढले असते. परंतु त्यांच्या अंगचें तेज निराळ्याच गोष्टींत गोचर व्हावयाचें होतें. तें त्यांनीं आपल्या बुद्धीनें सुमारें दोन वर्षांतच अशा रीतीनें दाखविलें कीं, त्यावेळीं जर त्यांच्या व त्यांच्या बरोबरीच्या मंडळीमध्यें योग्यतेंत कांहीं अंतर असेल तर त्यांनीं तें पार नाहींसें करून टाकलें. इतकेंच नाहीं तर ते विद्वान् व अविद्वान् यांना सारखेच आदरणीय होऊन बसले.

---

## सन १८८० सालापूर्वीचें पुणेंशहर.

हिंदुस्थानांत अनेक कारणांनीं अनेक शहरें प्रसिद्धीस आलेलीं आहेत. त्यांमध्यें **पुणें**शहरची प्रसिद्धि कांहीं विशेष प्रकारची आहे. एके काळीं **दिल्ली, लाहोर, नागपूर, विजापूर, सातारा** इत्यादि अनेक शहरें प्रसिद्ध होतीं. परंतु त्यांचें राजकीय वैभव संपल्याबरोबरच त्यांचें महत्त्व नाहींसें होऊन तीं जशीं एक प्रकारें निर्माल्यवत् होऊन बसलीं, तीच दशा **पुणें**शहरचें वैभव संपल्याबरोबर त्याचाही व्हावयाची, परंतु

पुढें इंग्रजी अमदानी सुरू झाली, त्या अमदानींत जे निरनिराळे पुरुष प्रसिद्धीस आले, त्यांच्यामुळें **पुण्याचें** नांव पूर्ववत् कायम राहिलें; व पूर्वीं मर्दुमकींत व मुत्सद्दीपणांत प्रसिद्ध असलेलें **पुणें** शहर पुढें अनेक प्रकारच्या विद्याविषयक चळवळींनीं प्रसिद्ध झालें. सुमारें साठ वर्षांत म्हणजे १८२० पासून १८८० पर्यंत **पुणें** शहरांत वेळोवेळीं जीं जीं स्थित्यंतरें होत आलीं त्यांत अनेक लौकिकवान पुरुष निपजले आहेत. इंग्रजीच्या सुरुवातींत शास्त्री व पंडित मंडळींत प्रसिद्धीस आलेले **मोरशास्त्री साठे, त्रिंबकशास्त्री शाळीग्राम, जनार्दनाचार्य वळे, गंगाधरशास्त्री दातार** यांच्यासारखे विद्वान्, **त्रिंबकबोवा नाशीककर, बापूसाहेब मेहेंदळे, बंडूनाना रानडे,** यांच्यासारखे हरदास, वैद्य व अक्षरनिपुण; या निरनिराळ्या पुरुषांचें लौकिक खरोखरीच "काशी-पासून रामेश्वरापर्यंत" गाजत होतें.* पुढें दुसऱ्या पिढींत उदयास आलेले **कृष्णशास्त्री चिपळूणकर, केरुनाना छत्रे, गणेश वासुदेव जोशी, बाबा गोखले, महादेव गोविंद रानडे, महादेव मोरेश्वर कुंटे, डाक्तर विश्राम रामजी घोले** यांचीही कीर्ति फार दूरवर पसरली असून ही मंडळी म्हणजे **पुणें** शहरचीं भूषणें समजलीं जात असत.

या मंडळीच्या योगानें जसें **पुणें** शहर विशेष प्रसिद्धीस आलें तसेंच निरनिराळ्या सामाजिक, धर्मविषयक, विद्याविषयक व राजकीय इत्यादि चळवळींनेंही तें सर्व महाराष्ट्रांत प्रमुख झालें. सुमारें १८३७ मध्यें इंग्रजी शिक्षण सुरू झाल्यानंतर सुधारलेल्या देशांतील, वर्तमान-पत्रें, छापखाने, वाचनालयें, सभा, मंडळ्या, इत्यादि गोष्टी क्रमाक्रमानें

---

* पुणें शहरांत जुन्या पिढींत बहुधा प्रत्येक पेठेंत एकादा तरी वैदिक, शास्त्री, विद्वान् प्रसिद्ध असे. परंतु एकट्या कसबा पेठेंतच, सर्वशास्त्रज्ञ असे त्रिंबकशास्त्री शालिग्राम, व्याकरणशास्त्रांत जनार्दनाचार्य वळे, याज्ञिक कर्मांत नाना शालिग्राम, वैदिकांत मधुभट घोडे, वैद्यकांत भाऊ वैद्य आडघरे व श्रौत कर्मांत बावाजी ढेरे ही मंडळी पुणें शहरांत नाणावलेली होती. त्यावरून जुने लोक म्हणत असत कीं, पुणें शहरानें जें विद्येचें मंदीर बांधलें आहे त्यावर कसबा पेठेनें शिखर केलें. परंतु दुर्दैवानें हल्लीं या सर्व घराण्यांत विद्येचा सर्वस्वीं लोप झाला असून कांहीं घरें तर निर्वंश आहेत.

लौकरच या शहरांत अस्तित्वात आल्या. व तेव्हांपासून सुमारें तीस वर्षांत तितक्याच निरनिराळ्या संस्थाही स्थापन झाल्या*. नवीन राज्यपद्धतीच्या

---

* १८७४ सालापर्यंत पुण्यांत आमच्या लोकांकडून निघालेल्या पुढील संस्था होत्या. त्यांपैकीं १८८० सालापर्यंत ज्यांच्यावर खुणा आहेत तेवढ्याच शिल्लक राहिल्या:

१ ज्ञानप्रकाश. ( वर्तमानपत्र )*
२ वृत्तप्रकाश. ( सदर )
३ ज्ञानचक्षु. ( सदर )*
४ विबुध सुधा. ( सदर )
५ लोककल्याणेच्छु. ( सदर )
६ विचारलहरी. ( मासिक पुस्तक )
७ नेटिव्ह जनरल लायब्ररी *
८ रास्त्याच्या पेठेंतील लायब्ररी.
९ यंग मेन्स असोशिएशन.
१० पूना असोसिएशन.
११ बाबा गोखल्यांची खाजगी शाळा.
१२ महागांवकरांची खाजगी शाळा.
१३ नातूंची खाजगी शाळा.
१४ सार्वजनिक सभा.*
१५ अनाथप्रेतसंस्कार सभा.
१६ शनिवार पेठेंतील वाचनगृह.
१७ पूना नेटिव्ह इन्स्टिट्यूशन.*
१८ डा० विनायकराव यांचा दवाखाना.
१९ विंचूरकरांचें घड्याळ.
२० वक्तृत्वोत्तेजक सभा.*
२१ व्यापारोत्तेजक सभा.
२२ कलाकौशल्य मंडळी.
२३ फ्रेंडली मीटिंग.
२४ स्वदेशी मालाचें दुकान.
२५ स्वदेशी मालाच्या उत्पत्तीस उत्तेजन देणारी मंडळी.
२६ विष्णू परशराम रानडे यांच्या स्मारक कृत्याबद्दल फंड.*
२७ डेकन कॉलेज क्लब.
२८ प्रार्थनासमाज.*

सहवासानें या नवीन चळवळी उत्पन्न झाल्यापासून **पुणें** शहरच्या सामाजिक व्यवस्थेंत ही बरेंच स्थित्यंतर होत चाललें; व त्यामुळें जुन्या व नव्या लोकांच्या पोषाखांत, रीतरिवाजांत व आचारविचारांत कसें अंतर दिसूं लागलें याची साक्ष प्रार्थनासमाजपंथ, पुनर्विवाहपक्ष इत्यादि नवे नवे प्रकार १८७१ पासून उपस्थित झाले यांवरून मिळत आहे. नीतिदृष्ट्याही लोकांचीं बंधनें याच सुमारास ढिलीं पडत चाललीं होतीं. **पुणें** शहर पूर्वीं म्हणजे अगदीं पवित्र होतें, असें शहरच्या अगदीं चवाठ्यावर "बावनखणी" सारखी संस्था ऐन ब्राह्मणी अमदानींतही जागृत होती तिच्यावरून म्हणतां येत नाहीं हें जरी खरें आहे, तरी विद्येचा प्रसार पुष्कळ झाल्याबरोबर नव्या नव्या व्यसनाचेंही पाऊल **पुणें** शहरांत अधिक अधिक पडत चाललें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं.*

असे जरी कांहीं वाईट प्रकार घडून येऊं लागले तरी हें शहर विद्वत्ता, शहाणपणा, रसिकपणा, गुणग्राहकता इत्यादि गुणांचें माहेरघर असे. त्यामुळें बाहेर ठिकाणच्या लोकांना **पुण्या**विषयीं आदर व विश्वास वाटत असे. कोणत्याही चळवळीचा उपक्रम **पुण्यांत** झाला कीं,

---

* मद्यपानाचें व्यसन १८५० पूर्वींच पुणें शहरांत चांगल्या प्रतिष्ठित लोकांत शिरल्याचें आढळून येतें. त्याबद्दल वरचेवर ग्रामण्यें चालत असत. पुढें १८७१ सालापासून दारूच्या दुकानांची संख्या वाढत चालली. यावरून हें व्यसन पुण्यांत कसें वाढत गेलें याची कल्पना होईल.

खोटे कागद करण्याचा एक भयंकर प्रघात याच सुमारास पुणें शहरांत पसरला होता. यांतही चांगली जाणती मंडळी असत. या संबंधानें ज्ञानप्रकाशाच्या १८७२ सालच्या एका अंकांत खालचा मजकूर आहे:

"आह्मांस लिहिण्यास दुःख वाटतें कीं, आमच्या पुणें शहरची जशी इतर कामांत प्रसिद्धि झाली आहे, तद्वतच खोट्या कागदाचे कामांतही झाली आहे. पुणें शहरांत विद्वान् लोक आहेत, सुधारणेचें पाऊल पुढें पडलें आहे, चार शास्त्री आहेत, पंडित आहेत, वैदिक आहेत ही मात्र आमच्या शहरची आजपर्यंत कीर्ति होती; पण आतां आणखी एक प्रकारची त्यास प्राप्त झाली आहे. ती ही कीं, पुण्याप्रमाणें खोटे कागद, खोट्या नोटा, खोटे चेक, खोट्या हुंड्या कोठेंही होत नाहींत. ही कीर्ति सर्व हिंदुस्थानभर पसरली आहे......"

धूम्रपान पुढें पुढें तर इतकें वाढलें कीं, त्याचा एक मोठा व्यापार बनून त्यावर हजारो लोक एकट्या पुण्यांत पोट भरीत आहेत.

तिचें अनुकरण करण्याकडे लोकांची प्रवृत्ति होई व अद्यापिही थोडीब-हुत आहे. दूरदूरच्या अनेक गुणी व विद्वान् लोकांना **पुणें** **शहरांत** नांव मिळविण्याची महत्त्वाकांक्षा असे. देशांतरावरील राजेरजवाडे, पर-देशावरील राजकीय पाहुणे, संस्थानिक, नाटकमंडळ्या, इतर करमणु-कीचे खेळ करणाऱ्या मंडळ्या यांची सफर हिंदुस्थानांत कोठेंही झाली तरी तिची सफलता **पुणें** शहरांत येऊन गेल्याशिवाय होत नसे. सारां-श, अशा अनेक कारणांनीं **पुणें** शहरांत कोणत्याना कोणत्या करम-णुकीशिवाय व चळवळीशिवाय वर्ष सुनें जात नसे. व त्यामुळें सुमारें १८८० पर्यंत **पुणें** शहरांत आनंद आणि उत्साह सदां सर्वदां नांदत आहे असें दिसत असे. या सालीं पुनः निरनिराळ्या लोकोपयोगी चळ-वळी सुरू झाल्या व त्या चळवळींत दोन महत्त्वाच्या गोष्टींत स्थित्यंतर घडून आलें. एक सुशिक्षित वर्गाच्या नव्या पिढींत **विष्णुशास्त्री चिपळूणकर, बाळ गंगाधर टिळक, महादेव बल्लाळ नामजोशी, गोपाळ गणेश आगरकर** प्रभृति विद्याविभूषित व कर्तबगारीचे पुरुष उदयास आले व त्यांनीं पूर्वीं कोणीं न दाखविलेला आत्मकर्तव्याचा व स्वावलंबनाचा मार्ग सुशिक्षित लोकांना दाखवून एक नवी जागृति उ-त्पन्न केली;* व दुसरें **अण्णा साहेब किर्लोस्कर** यांनीं स्वतःच्या

---

* या मंडळीनें काय केलें याबद्दलचें वर्णन विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या चरि-त्राच्या आरंभीं केलेलें आहे. हें जरी शास्त्रीबोवांसंबंधानें आहे तरी तें पुष्कळ अंशानें याही मंडळीस लागू आहे. तें वर्णन याप्रमाणें:

" आमचे महाराष्ट्र देशांत इंग्रजी विद्येचा प्रसार होऊं लागल्यापासून जे पु-ष्कळ विद्वान् पुरुष होऊन गेले त्यांमध्यें विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचेपेक्षां चरित्र लिहिण्यास अधिक योग्य पुरुष क्वचित् निपजला असेल. जेथें जेथें म्हणून मराठी भाषा बोलतात, तेथें तेथें या थोर पुरुषाचें नांव माहीत नाहीं असा मनुष्य सांपडणें कठीण. यांचे हातून अल्पवयांतच अनेक महत्वाचीं कृत्यें घडून आलीं. तशीं गेले पन्नास साठ वर्षांत कोणाचे हातून घडून आलीं नसतील. सुमारें दहा बारा वर्षांतच यांनीं आपलें ग्रंथरचनेनें महाराष्ट्र भाषेस अगदीं वेगळें स्वरूप दिलें. लोकमताचा प्रवाह जो आपले देशाचे खरे हिताविरुद्ध जबरदस्त असा वहात चालला होता त्यास अगदीं उलट दिशा दिली; आपले देशबांधवांविषयीं, स्वभावाविषयीं, स्वभा-षेविषयीं, स्वजातीविषयीं अभिमान जागृत केला; व नवीन शाळा, नवीन छापखाने, नवीन किताबखाने हातीं घेऊन सरकारचे नोकरीवरच भिस्त न ठेवतां खाजगी उद्योगानें विद्वान् लोकांस स्वतंत्रपणानें व अब्रूनें कसें राहतां येईल हें प्रत्यक्ष उदाहरणानें दावून दिलें. "

कल्पनेनें नाट्यकलेस नवीन स्वरूप देऊन लोकांत नवीन अभिरुचि उत्पन्न केली हें होय.

---

## संगीतकलेचा उदय.

इंग्लंडचा—नव्हे सगळ्या जगाचा नाटककार **शेक्सपीयर** ज्या वेळीं जन्मास आला त्या वेळच्या इतिहासाशीं **किर्लोस्कर** ज्या वेळीं उदयास आले त्या वेळच्या महाराष्ट्राच्या इतिहासाचें थोडेंसें साम्य जुळतें. एका इंग्रजी ग्रंथकारानें **शेक्सपीयर**च्या काळासंबंधानें असें ह्मटलें आहे कीं,

"The age which could give birth to a genius like Shakspeare must also have had the power of producing and maturing so rare a fruit. For every person, and especially every one who figures in the history of the world, is at the same time a creation of universal history and their birth may be regarded as much a matter of necessity as every great invention. Thus, when the development of the human mind required the magnate, gunpowder, and the art of printing they were discovered. When, in the course of the world's history, a Luther, Dante, Raphael, Shakespeare &c. were required they were born."

Shakspeare's dramatic art
by Ulrici Vol I.

[ ज्या काळांत **शेक्सपीयर**सारखा बुद्धिमान पुरुष झाला त्या काळाच्याच अंगीं तशा प्रकारची असामान्य बुद्धि उत्पन्न करण्याचें व ती पूर्णतेस आणण्याचें सामर्थ्य असलें पाहिजे. कारण जगाच्या इतिहासांत जे कोणी उदयास आले आहेत तेच त्या इतिहासाला कारणभूत आहेत. ह्मणून अशांचे जन्म, जशा एखाद्या मोठ्या कलेचा शोध अवश्यक असतो तशाच प्रकारचे अवश्यक समजले जातात, व याप्रमाणें जेव्हां मनुष्याची कल्पनाशक्ति पूर्णत्वाला पोंचून तिला लोहचुंबक बंदुकीची दारू, छापण्याची कला इत्यादि सामुग्रीची अवश्यकता वाटू

लागली त्या वेळेसच त्यांचे शोधही लागले. त्याचप्रमाणें जगाच्या इतिहासक्रमांत जेव्हां **लूथर, ड्यांटी, ऱ्याफेल, शेक्सपीयर** यांच्यासारख्याची अवश्यकता भासूं लागली तेव्हां त्यांचेही जन्म झाले. ]

सन १८८० च्या सुमाराचा काल अशाच प्रकारचा महत्त्वाचा होता. या वेळीं महाराष्ट्रांतील **पुणें** व **मुंबई** शहरांत वक्तृत्व, लेखन, विद्वत्ता, मुत्सद्दीपणा, वैद्यक इत्यादि गुणांनीं प्रसिद्धीस आलेले, पूर्वोक्त छत्रे, रानडे, कुंटे, चिपळूणकर, बापू मेहेंदळे, मंडलीक, तेलंग, आपटे हायकोर्ट वकील इत्यादि अलौकिक पुरुष महाराष्ट्रांतील बुद्धिमत्व दाखवीत होते. या वेळीं असाच एखादा बुद्धिमान् नाटककार उदयास येण्याची अवश्यकता होती ती उणीव **अण्णा**साहेबांच्या योगानें भरून निघाली. यांच्या पूर्वीं महाराष्ट्रीय कवि व नाटककार कोणीं निपजला नव्हता. पारशी लोकांत मात्र **दादाभाई सोराबजी पटेल एम. ए.** यांनीं इंग्रजी आपेराच्या धर्तीवर उडदू भाषेंत गायनपद्धतीवर नाटकें सुरूं करून नाच, देखावे, पडदे इत्यादि सामुग्रींनीं त्यांना चांगलें स्वरूप आणलें होतें. आमच्याकडे पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें फक्त पौराणिक व गद्य नाटकें प्रचारांत होतीं. परंतु त्यांत सुधारणा करण्याची कल्पना कोणाच्या मनांत आल्याचें दिसत नव्हतें. १८८० मध्यें **किर्लोस्कर**, दक्षिण भाग कमिशनर यांच्या स्वारीबरोबर **पुण्यां**त आले. त्या वेळीं पारशी नाटक पाहून ती तऱ्हा आपल्या लोकांत असावी अशी कल्पना त्यांच्या मनांत उद्भवली व ते त्या प्रयत्नास लागले. या वेळीं **मोरोबा वाघोलीकर** व **बाळकोबा नाटेकर** हे **पुण्यां**त असत. हे दोघेही गाण्यावाजाविण्यासंबंधानें लोकांत प्रसिद्ध होते. **मोरोबा** पूर्वीं **मोरशास्त्री वांईकर** म्हणून प्रसिद्ध हरदास असत, त्यांच्या बरोबर कांहीं दिवस, नंतर **मुंबई**चे **रणछोडदास, गोकुळदास देवजी, पुण्याचे सदर अमीन नाना**साहेब **आपटे, पनवेलीचे विठोबा खंडापा गुळवे** यांच्या सारख्याच्या आश्रयानें होत. **बाळकोबा** गवयी पेषानें **पुण्यां**तच असत. दोघेही तरुण, देखणे व गायनकलेंत निष्णात असल्यानें, **अण्णा**साहेबांच्या इच्छेनुरूप गोष्टी जुळून येण्याचा योग आला. या वेळेपर्यंत नाटकासंबंधानें लोकांच्या समजुती सर्वत्र अगदीं वाईट असत. व त्या चांगल्या अस-

ण्याचें कांहीं कारण घडलेंही नव्हतें. अशा स्थितींत नाटकाकडे मंडळींचें मन वळविण्याचें काम अवघड होतें. परंतु एका कलेचा उदय व्हावयाचा होता म्हणून **अण्णा**साहेबांना त्यांत चांगलें यश आलें. पारशी पद्धतीवर नाटक रचण्याची कल्पना मनांत आल्यापासून त्यांनीं **शाकुंतल** नाटकाचें भाषांतर करण्यास सुरुवात केली होती. त्यांत ही जोडी व तिसरे **अण्णां**च्या पूर्वाश्रमांतले स्नेही **नाना शेवडे** हे मिळाल्यानें **अण्णा** अधिक उत्साहानें कामास लागले. **शेवडे** हे धंद्यानें गवयी नव्हते तरी चांगले गाणारे असत.

याप्रमाणें संगीत नाटकाला अवश्य अशीं निवडक व गुणी पात्रें मिळालीं. यांशिवाय इतर जीं पात्रें पाहिजे होतीं त्यांकरतां **अण्णांनीं** आपल्याच कचेरींतील मोठमोठ्या पगाराची पदवीधर मंडळी ओढली. व कोणाला कांहीं कोणाला कांहीं अशीं नाटकांतलीं किरकोळ कामें नेमून दिलीं. याप्रमाणें व्यवस्था लागल्याबरोबर तालमीस सुरुवात झाली. सुमारें १८८० च्या आगष्टमध्यें कल्पना निघून **अक्टोबर**च्या **१३वे** तारखेस म्हणजे **विजयादशमी**च्या **सुमुहूर्तानें** तंबाखू आळींतील **गुळवे** यांच्या हवेलींत पहिल्या तीन अंकांची रंगाची तालीम झाली. तालीम सुरू झाल्यापासून संगीत नाटकाबद्दलचा गवगवा सर्व शहरांत पसरला होताच; परंतु रंगाची तालीम झाल्यापासून लोकांची उत्सुकता अधिक अधिक वाढूं लागली, व ते नाटकाचा दिवस कधीं येतो म्हणून वाट पाहत राहिले.

---

## संगीत शाकुंतल नाटक.

नाटकाचा दिवस ठरला. परंतु नाटकाला नांव काय द्यावें हें ठरलें नव्हतें. कारण अशा प्रकारचें नाटक व याची कल्पनाही पूर्वीं नव्हती. कोणीं "गद्यपद्यात्मक शाकुंतल" ह्मणावें ह्मणून सुचविलें व कोणीं "गायनयुक्त शाकुंतल" हें नांव द्यावें असें सुचविलें. परंतु **अण्णासाहेबा**नीं शेवटीं "**संगीत शाकुंतल**" हेंच नांव योग्य आहे असें ठरविलें. व त्याप्रमाणें "**किर्लोस्कर संगीत मंडळी**" च्या नांवाचीं हस्तपत्रकें शहरांत प्रसिद्ध झालीं. मोठ्या जाहिराती लावून

प्रसिद्धीची अवश्यकताच राहिली नाहीं; कारण तिकीटें अगोदरच पार खपून गेलीं होतीं. **तारीख ३१ अक्टोबर १८८० अश्विन वद्य १३ रविवार शके १८०२ अमृतसिद्धि योग** हा संगीत नाटकाचा प्रथम दिवस. **बुधवार** पेठेंतील त्यावेळीं भरभराटींत असलेलें **आनंदोद्भव नाटकगृह** तिन्ही मजले गच्च भरलें होतें. " सकल कला गुणवेत्ते पंडित " या दिवशीं जमले होते. प्रत्येकाच्या मुद्रेवर व पात्राच्या अंतःकरणांत उत्साह दिसत होता. पात्रांची तयारी झाली. सूत्रधार दोन पारिपार्श्वकांसह पडद्यांत सज्ज होऊन नांदी ह्मणण्याकरितां उभे राहिले* व आतां नाट्यशास्त्रविधीप्रमाणें पडद्यांत

**" पंचतुंडनररुंड मालधर पार्वतीश आधीं नमितों "**

हें मंगलाचरण म्हणण्यास सुरुवात करणार, तों जणू पडदा ओढणारासही तेवढा विलंब असह्य होऊन त्यानें एकदम पडदा वर केला. त्याबरोबर **अण्णा**साहेबांनीं घेतलेली सूत्रधाराची भव्य मूर्ति प्रगट होऊन त्यांचा गंभीर आवाज, व **नाटेकर** व **शेवडे** या पारिपार्श्वकांचे गंधर्वतुल्य आलाप प्रेक्षकांच्या कर्णद्वारां प्रवेश करूं लागले. त्या प्रसंगीं **अण्णां**चा रंगभूमीवरचा हा प्रवेश म्हणजे **संगीत** कलेच्या विश्वकर्म्याचा अवतार असें लोकांस वाटूं लागलें. नंतर नटीचा प्रवेश झाला. तिच्या—

**" खेळ चांगला वेषधर वरे**
**असलीयावरी काय भय बरें**
**थोर तुमची नाट्यकल्पना**
**विदित ती असे या महाजनां "**

या पद्यांतील भावार्थ वस्तुस्थितींत अगदीं बरोबर होता. नाटकांत उत्तमोत्तम असें शाकुंतल नाटक, संगीताची अपूर्व कल्पना व संगीताकरितांच ब्रह्मदेवानें निर्माण केलेलीं सर्वोत्तम नाटकपात्रें या सर्व गोष्टी संगीत नाट्यावतरणाच्या प्रथम दिवशींच लोकांच्या खऱ्याखऱ्या प्रत्यास आल्या. नाटकाची प्रस्तावना झाल्यावर प्रथम हरिणामागें लाग-

---

* नांदी ( मंगलाचरण ) पडद्यांत म्हणून सूत्रधारानें प्रवेश करावयाचा असा कांहीं संस्कृत नाटकांतील सांप्रदाय आहे. परंतु वरील प्रसंगीं ती प्रथमच रंगभूमीवर करण्यांत आली.

लेला दुष्यंत राजा सारथ्यासह पुढें आला. सारथ्याची भूमिका **केशवराव शुक्ल**—यांस फौजदारही ह्मणत असत—नांवाच्या गृहस्थाकडे असे. यांचा बांधा ठेंगणा असून शरीराची ठेवण चांगली व आवाजही साधारण बरा असे. त्यांनीं:

**" दौरत है मृग चली आपकी मूरत धनुक चढाके "**

ही साकी म्हणतांच प्रेक्षकांचें अवधान पुढील पात्रांकडे ओढलें. तों लागलींच दुष्यंताच्या:

**" काय बेव्या हरिणाची मजा तरी वायुगति पळतो "**

या पदास सुरुवात झाली. दुष्यंताची भूमिका **मोरोबा वाघुलीकर** यांचेकडे होती. यांच्या एकंदर शरीराचा बांधा राजकीय वेषाला साजेल असा, व रंगभूमीवर येण्याचा आवेश प्रसंगाला अनुरूप होता. यांच्या सुस्वरकंठांतील पहिलें पद ऐकतांच प्रेक्षकांचें अंतःकरण, श्रोतृ आणि नेत्र अधिक अधिक आतुर होऊं लागले. या प्रवेशांतच शिकारीपासून परावृत्त करण्याला वैखानसाच्या वेषानें **अण्णासाहेब** प्रविष्ट झाले. त्यांचा धिप्पाड देह व

**" शशिकुलभूषण गुणवंता ऐके मद्वच दुष्यंता "**

हें त्यांच्या तोंडून द्रव उत्पन्न करणारें पद ऐकून व त्यांचा त्यावेळचा अविर्भाव पाहून प्रेक्षक थक्क होऊन गेले.

नंतर शकुंतला दोघी सख्यांसह झाडांना पाणी घालीत येत आहे असा प्रवेश आला. तो प्रसंग किती मनोहर होता याचें दुष्यंताच्या:

**" किती मधुर रूप तरी यांचें । मम नेत्र धन्य आजि-
साचे । नृप मंदिरीं यापरी कैचें । वन हरी सत्व बागे-
चें । किती वर्णुं येईना वाचें । या बघतां कामी न वांचे।
हळु हळु चमकति बागेंतुनिया । विद्युल्लता तशा या ऋ-
षिजा भाग्योदय माझा ॥ १ ॥**

या पद्यांतच वर्णन आहे. स्वतः **मोरोबाच** आपला अनुभव अद्याप सांगतात कीं, " रंगभूमीवर आरंभीं माझी किंचित् संकोचवृत्ति होती, परंतु शकुंतलेचा प्रवेश झाल्याबरोबर मी तद्रुप बनलों. " पुढें पहिल्या

अंकांतीलें प्रत्येक प्रसंगांत त्यांनीं अभिनय आणि संगीत यांनीं प्रेक्षकांची चित्तवृत्ति तल्लीन करून सोडली.

पहिला अंक संपला. त्याबरोबर कोणी **आण्णासाहेबांची** व कोणी **मोरोबांची** तारीफ करण्याकरितां पडद्यांत आले. **केरुनाना छत्रे, विठोबा आपा गुळवे, नानासाहेब साठे** दप्तरदार या मंडळींचा **मोरोबांवर** अतिशय लोभ असे. **मोरोबांच्या** हातून पहिल्याच खेपेला इतकें उत्तम काम होईल कीं नाहीं ही त्यांना शंका होती. **विठोबा आपा** तर ह्मणत कीं, " **मोरोबा** जड बुद्धीचे यांच्या हातून कसलें येवढें अवघड काम होतें ! " परंतु **मोरोबांनीं** सगळ्याच कल्पना खोट्या केल्या. व पहिल्या प्रसंगाला इतकी कांहीं करामत केली कीं, चांगल्या अनुभविक नटाकडूनही प्रसंगीं तशी होत नाहीं.

दुसऱ्या अंकास सुरवात झाली. विदूषक **गंगाधर भीमराव जांभेकर बी. ए.** हे होते.* आणखी दोन पदवीधर, करभक, रैवतक वगैरे साधारण कामास होते. पहिल्याप्रमाणेंच दुसरा अंकही बहारीचा उडाला. तिसऱ्या अंकास सुरवात झाली. या अंकांतही अर्थबोध होणाऱ्या व रसाळ पद्यांनीं **मोरोबांनीं** इतकें नाट्यकौशल्य दाखविलें कीं, त्या प्रसंगाची कल्पना प्रेक्षकांच्या मनांत तंतोतंत उतरून दिली.

चौथा अंक सुरू झाला. हा अंक शाकुंतल नाटकांत सर्वांत सरस आहे असें रसज्ञ ह्मणतात. कण्वाची भूमिका **बाळकोबा नाटेकर** यांचेकडे होती. प्रथमच प्रसंग व डोळे दिपविणारा प्रेक्षकसमूह पाहून **नाटेकर** आरंभीं किंचित् कचरल्यासारखे दिसले. परंतु अखेरीस त्यांनींही लोकांना इतकें तल्लीन केलें की त्यांचें:

**" परक्याचें धन कन्या तें त्या देउनि आज मि सुटलों ॥**
**ठेव जशी मालकाशीं अर्पुनि आज ऋणांतुनि फिटलों ॥**
**मुलींनो या आतां ॥ गेली लाडकि मम दुहिता ॥ "**

हें शेवटचें पद्य संपून पडदा पडतांच प्रेक्षक स्वप्नसृष्टींतून जागें झाल्याप्रमाणें देहभानावर आले.

---

* हे गृहस्थ सप्टेंबर महिन्यांत परलोकवासी झाले. हे विजापुरास मामलेदार होते.

याप्रमाणें पुणें शहरांत—नव्हे महाराष्ट्रांत संगीत नाट्यकलेचा अवतार होतांच, लोकांना करमणुकीचें एक नवें युग मिळाल्यासारखें झालें. नवे नेत्र मिळाल्यासारखे झाले व नवे श्रोतृ आल्यासारखे झाले.

पहिला प्रयोग होतांच अण्णासाहेबांचें, संगीत नाटकांचें व त्यांतील गायक पात्रांचें नांव सर्वतोमुखीं झालें. व पुन्हां प्रयोग पाहण्याविषयीं लोकांची उत्कंठा अनावर झाली. याविषयींची हकीकत मुंबईच्या इंदुप्रकाश पत्रांत पुढें दिल्याप्रमाणें सविस्तर प्रसिद्ध झाली होती:

**संगीत शाकुंतल.**

“ मागील रविवारीं येथील आनंदोद्भव नाटकगृहांत संगीत शाकुंतल नाटकाचा प्रयोग झाला. हें नाटक प्रायशः गायनयुक्त असून त्या प्रसंगीं कालिदासकृत अभिज्ञान शाकुंतल नाटकापैकीं पहिले चार अंक अभिनित झाले. प्रयोगाचे सोईकरितां रा. रा. बळवंत पांडुरंग उर्फ अण्णा किर्लोस्कर शांकरदिग्जय नाटकाचे कर्ते यांनीं मुद्दाम नवीन भाषांतर तयार केलें असून त्यांत निरनिराळ्या रसांस अनुरूप अशा अनेक रागांवर गातां येण्याजोग्या पदादिक कवितांचा फारच मनोहर संग्रह होता. प्रयोगस्थ पात्रांपैकीं दुष्यंत राजाचा भाग फारच अप्रतीम झाला. हें पात्र स्वतः देखणें आणि बांधेसूद असून शिवाय याचा कंठही अति मधूर व हावभावांची ठेवणही फारच मोहक होती, यामुळें या पात्राचा अभिनय पाहून सर्व प्रेक्षकजनांची चित्तवृत्ति तटस्थ झाली यांत नवल नाहीं. याच्या खालोखाल विदूषक, शकुंतला, प्रियंवदा, व वैखानस इत्यादि पात्रांचीं कामें फार चांगलीं झालीं. कण्वाचें पात्र गायनकलेंत निपुण होतें, तथापि कंठ अतिशयच मधूर पडला, व गायनांत रसपोषापेक्षां ताना घेण्याकडेच विशेष लक्ष पुरविलें गेलें, यामुळें चतुर्थ अंक व्हावा तसा झाला नाहीं. तथापि एकंदरींत संपूर्ण प्रयोग फारच दर्शनीय होता यांत संशय नाहीं. देखावेही चांगले होते; तथापि हेंच नाटक येथील नाटकगृहांत न होतां मुंबईतील ग्रांटरोड नाटकगृहांत झालें असतें, तर येथें प्रयोग खुलला याहून तेथें फारच अधिक खुलला असता यांत संशय नाहीं. असो, याच नाटकाचा द्वितीय प्रयोग येत्या रविवारीं व्हावयाचा आहे. ”

नोव्हेंबर ८।१८८०

पुन्हां तो प्रयोग झाला त्यावेळीं पूर्वीपेक्षांही नाटकगृह खेचून भरलें होतें. पूर्वीपेक्षां पात्रांच्या अंगीं धीटपणा आला होता. त्यामुळें दुसरा प्रयोग फारच सुरस वठला. पहिल्या प्रयोगाच्या वेळीं **नाटेकराच्या** कण्वाच्या कामांत जर थोडीसी कसर राहिली असेल तर या प्रसंगीं त्यांनीं ती इतकी भरून काढली कीं, त्यांच्या प्रवेशांत आरंभापासून

शकुंतलेस निरोप देईपर्यंत रडला नाहीं असा एकही मनुष्य सांपडला नसेल. पुणें येथें दोन प्रयोग झाल्यावर त्यांचें बरोबर वर्णन, ज्ञानप्रकाशाच्या नोवेंबर ११ तारखेच्या अंकांत पुढें लिहिल्याप्रमाणें आलें होतें:

" Shakuntala the well known play by Kalidas was upon the stage during the last fortnight..................On both these occasions the theatre was excessively crowded ............Every one acquitted himself of his part in a creditable manner. But दुष्यंत, शकुंतला, and कण्व deserve to be specially mentioned. On the occasion of his meeting शकुंतला, in the lonely bower by the riverside, दुष्यंत displayed his abilities to such a perfection as to evoke repeated deafening applause from the audience. In the same way the कण्व sustained his character very creditably when शकुंतला was taking leave of her father. All the spectators were rapt attention itself during the time that the touching scene was being enacted and there were not a few who were actully moved to tears. We conclude this brief notice of the two performances with the expression of our heartfelt thanks to Mr. Anna Kirlosker for his having entertained the Poona public in the manner setforth above. We only hope that the next year when he comes once more amongst us, he will be prepared to entertain us in a similar manner, We have no doubt that if the native stage be under the able guidance of gentleman like Mr. Kirlosker it will be improved in time, and the taste of the theatre-frequenting public reformed " *

पुण्यांत झालेल्या नाटकामुळें अण्णांची कीर्ति चोहोंकडे झाली. मुंबईस येण्याबद्दल सूचना आल्या. परंतु अण्णांस व इतर मंडळीस नोकरीमुळें सवड नसल्या कारणानें जातां येईना. शेवटीं वरिष्ठाकडे रदबदली करून चार दिवसांची सवड काढून मंडळी मुंबईस गेली. हल्लीं

---

* भाऊरावांचें चरित्र पान ५१६ पहा.

ग्रांटरोडवर ज्या ठिकाणीं रिपन नाटकगृह आहे तेथें व्हिक्टोरिया नाटकगृह होतें. त्यांत तारीख २१ नोवेंबर रोजीं खेळ झाला. मुंबईचाही प्रेक्षकसमाज पुण्यापेक्षां योग्यतेनें कोणत्याही दृष्टीनें कमी नव्हता. पुण्यास जशी विद्वान् मंडळी साह्यास होती तशी मुंबईसही होती. व पुण्यास जसें अण्णासाहेबांच्या संगीतानें लोकांना वेडें केलें तसें मुंबईच्याही लोकांना केलें.

प्रयोग संपतांच समोर 'बाक्स' मध्यें **बाळ मंगेश वागळे, शांताराम नारायण, प्रोफेसर भांडारकर, काशिनाथ त्रिंबक तेलंग** इत्यादि थोर थोर मंडळी बसली होती, त्यांनीं आणखी एकवार तरी प्रयोग करून दाखवावा ह्मणून विनंति केली. परंतु **अण्णांस** व इतर मंडळीस रजा नव्हती ह्मणून ती विनंति मान्य करतां आली नाहीं. **मुंबईस जांभेकर** रजा न मिळाल्यामुळें आलेच नव्हते. त्यामुळें त्यांचें विदूषकाचें काम **सखारामपंत बापूसाहेब किर्लोस्कर** यांस करावें लागलें* या प्रयोगाची हकीकत इंदुप्रकाशांत प्रसिद्ध झाली होती ती ही:

[ पत्रव्यवहार. ]

" कालरोजीं येथील व्हिक्टोरिया नाटकगृहांत मि. अण्णा किर्लोस्करकृत संगीत शाकुंतल नाटकाचा प्रयोग झाला. हाच प्रयोग पुणें येथें अगोदर दोन वेळां केला होता, तो फारच चांगला उतरला वगैरे प्रकारचे स्तुतिलेख अनेक वर्तमानपत्रांतून आले होते, यामुळें प्रयोगप्रेक्षणार्थ अतिशय समाज जमला होता. तो इतका कीं साडेआठाचे सुमारास कांहीं कांहीं ठिकाणचीं तिकिटें विकणेंही बंद करावें लागलें. तिकिट विक्रीचें उत्पन्न सुमारें ७०० रुपये झालें. या प्रयोगसमयीं प्रेक्षकांची जेवढी गर्दी नाटकगृहांत दृष्टीस पडली तेवढी गर्दी पूर्वीं कोणत्याही हिंदु नाटककारांच्या नाटकांचे वेळीं दृष्टीस पडली नव्हती असें ह्मणतात. नऊ वाजण्याचे पूर्वींच सर्व जागा भरून गेल्या कारणानें पुष्कळ लोकांस परत जावें लागलें. प्रयोग एकंदरींत फार उत्तम उतरला असून दुष्यंत राजा, विदूषक, कण्व महर्षि, वैखानस, शकुंतला, प्रियंवदा इत्यादि पात्रांचीं कामें फार उत्कृष्ट झालीं. प्रयोग आटपल्यावर रा. रा. बाळ मंगेश वागळे, काशिनाथ त्रिंबक तेलंग वगैरे मंडळींनीं हा प्रयोग उत्तम झाला असून तो आणखी एकवार याच अभिनयकारांनीं करून दाखवावा ह्मणून सु-

* डेक्कन कालेजमध्यें जितकीं नाटकें यांच्यावेळीं झालीं, तितक्यांत नाट्यअभिनयाच्या संबंधानें यांचें नांव प्रमुखांत असे. वरील प्रसंगींही यांनीं अगदीं थोड्या वेळांत तयारी करून आपलें काम फारच उत्तम केलें.

चना केल्या, परंतु मि. अण्णा किर्लोस्कर हे सरकारी नोकर असल्यामुळें त्यांस येथें रहाण्यास मुद्दलच सवड नाहीं. या कारणानें भूयः प्रयोगदिदृक्षुजनांची निराशा झाली. अस्तु मि. अण्णा यांनीं केलेल्या या नाटकापासून नाटककलेचें पाऊल उत्तरोत्तर विशेष पूर्णतेच्या पंथास लागलें आहे. व याच्या व या सारख्याच इतर प्रयोगांच्या योगानें आमच्या ताकपिठ्या अललकारांचीं नाटकें लोकांस नीरस वाटूं लागून उत्तरोत्तर नाटककलेची खरी योग्यता त्यांच्या मनांत बिंबूं लागण्याचा संभव आहे, हें पाहून आह्मांस परम संतोष वाटतो. नाटकगृहांत पडद्यांची सोय असावी तशी नाहीं. तथापि एकंदरींत देखावे फार चांगले करण्यांत आले होते. विशेषतः मदनावस्थ झालेली शकुंतला सख्यांसह लतागृहांत निजल्याचा देखावा फारच नयनमधुर झाला, हा प्रयोग चालू असतां कांहीं कुत्सित लोकांच्या तोंडून हा केवळ तमाशाच आहे अशा प्रकारच्या निंदोक्ति बाहेर पडल्याचें समजतें. तथापि हिंदूंचीं पुराणें ह्मणजे शिमगा अशा जातीच्याच त्या निंदोक्ति असल्यामुळें त्यांचें आह्मांस बिलकुल महत्त्व वाटत नाहीं." २२ नोव्हेंबर १८८०.

याप्रमाणें संगीत नाट्यकलेचा उद्भव ज्या वेळीं झाला त्या वेळीं जी एकदम सर्वत्र चळवळ झाली तिचा वृत्तांत आहे. **अण्णासाहेबां**च्या कृतीला जी एवढी लोकमान्यता मिळाली त्याला तीन कारणें आहेत, एक त्यांची कल्पकता, दुसरें त्यांना मिळालेलीं अद्वितीय पात्रें व तिसरें त्या वेळेच्या रसिक, मार्मिक व विद्वान् लोकांची अनुकूलता. या तिहींची एकवाक्यता त्या वेळीं झाल्या कारणानेंच संगीताचा उत्कर्ष झाला म्हणण्यास हरकत नाहीं.

पहिल्या वर्षीं तीन प्रयोग मिळून दोन हजारांवर प्राप्ति झाली होती. यांपैकीं **बुधवारवाडा** १८७९ सालीं जळाला त्याबरोबर त्यांत असलेली नेटिव्ह जनरल लायब्ररीही अग्निनारायणाच्या भक्ष्यस्थानीं पडली. तिच्या ग्रंथसंग्रहांत भरती करण्याकरितां २०० रु. व **गणेश वासुदेव जोशी** यांच्या स्मारक फंडास ५० रु. दिले. व बाकी राहिलेल्या पैशांतून मंडळींतील बऱ्याच जणांस कोणास घड्याळें व कोणास रोख बक्षिसें दिलीं. **अण्णासाहेबांनीं** त्यावेळीं मंडळीचें स्मरण ह्मणून सर्वांच्या आग्रहावरून एक चौदा रुपयांचें घड्याळ मात्र ठेवून घेतलें.

संस्थानी थाटानें नाटक मंडळीनें कसें रहावें हा कित्ता **अण्णासाहेबांनीं** येथून घालून दिला. त्यांनीं संगीत नाटकाची ही अपूर्व टूम काढल्या-

पासून नाटकासंबंधानें लोकमत एकदम बदलून टाकलें; जुन्या नाटक-मंडळींना कलेच्या सुधारणेचा मार्ग दाखविला; व जीं पौराणिक नाटकें सुमारें चाळीस वर्षें चांगल्या प्रकारें लोकरंजन करीत आलीं तीं एका शाकुंतलाचे फक्त तीन प्रयोग झाल्याबरोबर एका महिन्याच्या अवकाशांत निस्तेज व रूक्ष करून टाकलीं. संगीतानें लोकांच्या अभिरुचींत तर आश्चर्य वाटण्यासारखा फरक इतक्या थोड्या अवकाशांत केला कीं, गवयाच्या मैफलींत, नायकिणीच्या मजलशींत, बायकांच्या गाण्यांत, मुलांच्या ह्मणण्यांत, वाजंत्र्यांच्या वाद्यांत संगीत शाकुंतल नाटकाचीं पदें ऐकूं येऊं लागलीं.* अशाप्रकारें **अण्णासाहे**बांची कीर्ति प-

* अशा प्रकारचें लोकांच्या अभिरुचींत व नाटकाच्या परिस्थितींत महदंतर पडल्याचें दुसरें उदाहरण आपल्याकडे नाटकाच्या इतिहासांत नाहीं. इंग्लंडांत "बेगर्स आपेरा" नांवाचें एक नाटक सुमारें १७२७ मध्यें रंगभूमीवर आलें. त्यावेळीं जी लोकांत चळवळ उडाली तिचा इतिहास वरील संगीताच्या इतिहासाला सदृश आहे. तो असाः—

"This piece was received with greater applause than was ever known. Besides being acted in London sixty three days without inturruption, and renewed the next season with equal applause it spread in to all the great towns of England; was played in many places to the thirteeth and fortieth time; ..........The ladies carried about with them the favourite songs of it in fans, and houses were furnished with it in screens. The fame of it was not confined to the author only. The person who acted Polly, till then obscure, became all at-once the favourite of the time; her pictures were engraved, and sold in great numbers; her life written, books of letters and verses to her published, and pamphlets made even of her sayings and jests. Further more, it drove out of England ( for that season ) the Italian opera, which had carried all before it for ten years"

"Lives of the Poets."

सरण्यास सुरुवात झाली. येथून त्यांनीं पुढें काय केलें तो इतिहास पुढील प्रकरणांत आहे.

---

## साग्र संगीत शाकुंतल.

नाटकांत जशीं निरनिराळीं पात्रें रंगभूमीवर येऊन आपली कामगिरी बरी वाईट बजावून जातात, त्याप्रमाणें या चरित्ररूपी रंगभूमीवर अशींच स्वभाव-वैचित्र्याचीं निरनिराळीं पात्रें येणारीं आहेत. त्यांपासून मनोरंजन किंवा बोध काय घ्यावयाचा असेल तो वाचक घेतीलच.

**मुंबईस** एक प्रयोग करून १८८० च्या नोव्हेंबरच्या अखेरीस **अण्णा**साहेब कचेरीबरोबर पुन्हां फिरावयास गेले, ते १८८१ मध्यें पावसाळ्याकरितां कचेरी पुन्हां **पुण्यास** आली तेव्हां परत आले.* स्वारींत असतांना शाकुंतल नाटकाच्या पांचव्या अंकापासून भाषांतर करण्यास त्यांनीं थोडथोडी सुरुवात केली होतीच. **पुण्यास** येऊन सर्व मंडळी जमल्यावर तालमीस सुरुवात झाली. मात्र पहिल्या वर्षी जी **जांभेकर** वगैरे **अण्णा**च्या कचेरींतील मंडळी प्रयोगांत होती ती या खेपेस नव्हती. प्रथम सहा अंकांचा प्रयोग **डेक्कन कालेज**मध्यें डाक्तर **किलाहर्न साहेब** पेनशन घेऊन स्वदेशीं परत जावयाचे होते ह्मणून त्यांचे सन्मानार्थ ता. ३ सप्टंबर १८८१ रोजीं झाला. कालेजच्या लायब्ररीच्या दिवाणखान्यांत प्रयोगाकरितां सोयी केल्या होत्या. कालेजचे सर्व युरोपियन व नेटिव्ह प्रोफेसर, कांहीं आमंत्रित सभ्य गृहस्थ व सर्व विद्यार्थी हजर होते. एकंदर समारंभ व प्रयोग प्रेक्षणीय झाला. **आण्णासाहेब** व **नाटेकर** यांचे वेष पाहून **किलाहार्न** साहेबांनीं "I see before me the old Rishies of ancient times in their true garb."

---

* पूर्वी पुण्यांत पावसाळ्याकरितां, रेव्हिन्यु कमिशनरचीं तिन्हीं दप्तरें, मोजणीखात्याचीं सर्व दप्तरें, सर्वेखात्याचीं सर्व दप्तरें वगैरे बहुतेक एकंदर खातीं सहा महिने राहत असत. परंतु आलीकडे आठ दहा वर्षांत कांहीं खातीं मोडलीं आहेत. व कांहींचीं दप्तरें कायमचीं बाहेर गेलीं आहेत. त्यामुळें पुणें शहरची पहिली शोभा पुष्कळ कमी झाली आहे. प्लेगपासून आलीकडे तर तें मोडकळीसच आलें आहे.

असे उद्गार काढले. या प्रसंगाला **मुंबईचे** लष्करी खात्याचे पेनशनर अधिकारी **मेजर जनरल ह्यूवेट** यांसही बोलावलें होतें. हे नेटिव्ह लोकांत जरा अधिक मिसळणारे, गाण्यावाजविण्याचे शोकी व अतिशय उदार असत. **किर्लोस्कर** मंडळीचे प्रयोग **मुंबईस** होत असत, तेव्हां यांच्याबरोबर आठ दहा यांची नेटीव्ह मित्रमंडळी यायची. शिवाय यांच्या राहत्या बंगल्याच्या तिसऱ्या मजल्यापर्यंत नाटकाच्या दिवसीं तिकिटाकरितां प्रतिष्ठित भिक्षुकांची दोन्ही बाजूंनीं रांग लागलेली असे. त्यांच्याकरितां सदर साहेबांस प्रत्येक खेळास सुमारें साठ पाऊणशें रुपयांचीं तिकीटें विकत घेऊन खैरात करावी लागत असे. सदर साहेबाचें हा प्रयोग पाहून काय मत झालें तें त्यांनीं दुसरे दिवशींच **अण्णासाहेबांस** पुढील पत्र पाठवून कळविलें:

" Poonah Monday
5th September 1881.

Mr.

Balwant Pandurang
alias Anna Kirlosker

Dear Sir,

I cannot tell you how much obliged I feel to you for having afforded me such a very pleasant evening last Saturday, by inviting me to a rehearsal of the " Shakoontala performance at the Deccan College. That I was thoroughly pleased, you, I trust feel sure from the fact of the great interest I was taking in the performance the entire evening and the attention I was devoting to each act it was being performed. To my idea it was faultless. So well was every thing done.

I am here for another week and trust if you intend repeating the rehearsal you will invite me again, resting assured that you will have one among you than a European who will thouroughly appreciate and enjoy the performance.

I am told you will have it again on a grand hall on Saturday, 17th September; if so I trust you will give me timely notice there of through Mr. Kirlosker pleader High Court, that I may come to it if I possibly can. I wrote to Mr. Kirlosker yesterday telling him of your civility and all about the performance.

The native gentleman who made that speech after the performance and made allusion to my attendance there erred greatly in terming me Major Hewett. I am "General Hewett" and have been that for over six years now. I was a Major once upon a time but that was 21 years ago ! !

Please acknowledge receipt of this letter addressing to me Napier Hotel Poonah.

Belive me
Your Faithfully
H. S. Hewett.

---

M. General ."

या पत्रावरून हे साहेब नेटिव्ह लोकांत मिसळणारे व गाण्यावाजविण्याचे खरे भक्त होते हें दिसून येतें. अण्णासाहेबांनीं सदर पत्राचें त्याच दिवशीं उत्तर पाठविलें तें हें:—

" Dear Sir,

I feel proud to acknowledge your favour of yesterday's date. I was informed that you took much interest in native entertainments like these and that you mixed among natives with your usual frank and unreserved disposition. I learnt of your arrival here last Saturday through my brother Mr Kirlosker of Bombay and immdiately my desire of, having at the performance an able critic became over powered. Hence the trouble I gave you Saturday night which I am extremely delighted to see you call " pleasant. " I had no correct idea as to

how our exertions were that night crowned with success; but now I am confident that the performance was on the whole capital as I am sure that the remark " faultless " has emanated from a person who weighs merits and demerits in a nice scale.

I should feel highly obliged by your granting me an intereview tomorrow morning or at any other time which will suit your convenience best.

I express sincere regret and hope to be pardoned for the error which the gentleman who made the speech unwittingly committed. I discovered the mistake so soon as the words " Major " fell from his lips, but it was then too late to correct it and I then hoped to beg your pardon on a personal interview.

Hoping to be excused.

I am your &c.
Balvant P. Kirlosker.

6th Tuesday.

संगीत नाटकाची १८८० सालीं जी चळवळ उडाली होती तिच्यापेक्षां या सालीं अधिक उडाली. यावेळीं प्रत्यक्ष नाटकांनीं **पुणें मुंबई** व प्रयोगाकरितां आलेल्या लांबलांबच्या लोकांची जितकी करमणूक केली तितकी वर्तमानपत्रांनींही केली. पूर्व दिवशीं नाटक पाहून जी करमणूक होत असे तशीच किंबहुना जास्ती दुसरे दिवशीं नाटकावरील पत्रकर्त्यांचे व गांवगुंड लोकांचे टीकालेख वाचून होत असे. या वर्षी नाटकाची लोकप्रियता किती वाढली होती याला दुसरी साक्ष नकोच आहे. **पुण्याच्या** व **मुंबईच्या** वर्तमानपत्रांतून लागोपाठ दोन महिने **किर्लोस्करांच्या** नाटकासंबंधानें अनुकूल प्रतिकूल लेख येत असत. जों जों वर्तमानपत्राचे कालम वाढत चालले, तों तों इकडे नाटकाला गर्दी अधिक होत असे. जणूं काय नाटक पाहणारे लोक आणि वर्तमानपत्रांतील लेखक यांच्यामध्यें स्पर्धा चालली होती. शेवटीं हरलें कोण हें समजण्याला मार्ग नव्हता. कारण **किर्लोस्करांची** कचेरी फिरण्यास निघण्याची वेळ आली त्यामुळें नाटकें बंद झालीं. व वर्तमानपत्रांतील

झगडाही बंद झाला. **पुण्यास** व **मुंबईस** गेल्या वर्षाप्रमाणेंच **मोरोबा** व **बाळकोबा** यांनीं आपापल्या कामांत प्रवीणता दाखविली. त्यांत सर्वदमनाची भूमिका **बापूसाहेब किर्लोस्कर** यांच्या मुलाकडे होती. ती त्यानें " यथाबीजस्तथांकुरः " या न्यायानें सुमारें पांच वर्षांच्या वयांतच बापाप्रमाणें आचंबा वाटण्यासारखी केली. साग्र प्रयोग असेल तेव्हां सुमारें आठ तास हा प्रयोग चाले. परंतु एवढा वेळ कसा जात असे हें समजून येत नसे. प्रयोग पहाण्याकरितां लांबलांबचे लोक येऊन निराश होऊन परत जाण्याची वेळ येई. अगोदरच चार चार दिवस तिकिटें घेऊन त्यांवर लोक व्यापार करूं लागले. खेळ पाहण्याविषयीं लोकांची उत्कंठा इतकी अनावर असे कीं, पैसे जास्त जातात, हा विचार मनांतही येत नसे. **मुंबईस** या सालीं **किर्लोस्करांचें** अनुकरण करून एक संगित मंडळी **वासुदेव नारायण डोंगरे** यांनीं स्थापन केली. या मंडळींतही दोन गवयी बरे होते. या मंडळीनें प्रथम शाकुंतल नाटकाचेच चार अंक बसविले. **अण्णासाहेबांनीं** संगीताची कल्पना काढल्यापासून एक वर्षाच्या आंतच दोन संगित मंडळ्या लोकरंजनार्थ अस्तित्वांत आल्या ही गोष्ट एक प्रकारें अभिनंदनीय झाली. **डोंगरे** यांचेही प्रयोग **मुंबईस** लोकप्रिय झाले. परंतु इकडे **किर्लोस्करा**च्या संगीताचा जसजसा उत्कर्ष होऊं लागला तसतसे मत्सरी, हेवेखोर लोकांचे विकार जागृत होऊन ते वर्तमानपत्रांतील लेखांच्या रूपानें बाहेर येऊं लागले. विद्येचें साम्राज्य असलेल्या एका नामांकित शहरांतल्या प्रसिद्ध व वजनदार अशा दोन पत्रांतून या नाटकासंबंधानें जो झगडा चालला होता त्याचे उतारे पुढील प्रकरणांत आहेत. त्यावरून कोणत्या पत्रांत कोणत्या विकाराचें त्या वेळीं प्राबल्य होतें तें दिसून येईल.

---

## वर्तमानपत्रांचा झगडा.

**पुण्यास** दोन प्रयोग झाल्यावर **मुंबईच्या** नेटिव्ह ओपिनियन पत्रांत प्रथम पुढील लेख आला होताः

नेटिव्ह ओपिनियन ता. १६।१०।८१

" संगीत शाकुंतल नाटक. "

" या नाटकाचे प्रयोग गेल्या ता. ८ व १२ रोजीं पुणें मुक्कामीं झाले. पहिल्या दिवशीं आरंभापासून ५ अंक व दुसरे खेपेस शेवटील ४ अंक करून दाखविण्यांत आले. दोन्ही खेपेस प्रेक्षकांची अतिशय गर्दी झाली होती. प्रयोग फारच उत्तम झाले; तथापि दुष्यंत राजा, कण्व, शकुंतला, वैखानस, शार्ङ्गरव, मातली, मारीच, सर्वदमन या पात्रांचीं कामें फारच उत्तम झालीं. या प्रयोगकारांच्या गुणांबद्दल वास्तविक कीर्ति फार लांबपर्यंत पसरली असल्यामुळें मुद्दाम प्रयोग पाहण्यास मुंबई, सातारा, अहंमदनगर, बेळगांव, धारवाड इत्यादि लांबलांबच्या ठिकाणांहून लोक आले होते. आतां सांगितलेल्या पात्रांपैकीं दुष्यंत, कण्व, मातली, शार्ङ्गरव हे वेष घेणारे गृहस्थ तर स्वतः गायनकलेंत प्रवीणच आहेत, तेव्हां त्यांचीं कामें चांगलीं वठल्यास मुळींच नवल नाहीं. मात्र ह्या ठिकाणीं शकुंतलेचें पहिल्या अंकांतील भ्रमरबाधानिरूपण, व पांचव्यांतील रोषाकुलित दृष्टीनें दुष्यंत राजाकडे अपूर्व अवलोकन, शार्ङ्गरवानें केलेली पांचव्या अंकांतील राजनिर्भर्त्सना, व प्रत्यक्ष दक्षयज्ञ विध्वंसाच्या वेळच्या उग्र शिवदृष्टीप्रमाणें उग्र दिसणारी कोपारुणित दृष्टि, सातव्या अंकांतील मारीच ऋषीचें तें दिव्याद्भुत भव्य दर्शन, व त्याच अंकांतील पंचवर्षीय शकुंतलात्मज सर्वदमनाचे ते धीट, मंजुळ आणि बोबडे आलाप इत्यादिकांच्या योगानें प्रेक्षकांचीं मनें अगदीं तन्मय होऊन गेलीं होतीं म्हटल्यास हरकत नाहीं. बुधवारचा प्रयोग आटपल्यावर रा. शांताराम नारायण वकील यांनीं समग्र प्रयोग आणखी एकवार करून दाखवावा म्हणून सूचना केली होती, तिजअन्वयें कालरोजीं प्रयोग व्हावयाचा होता. असो; हा प्रयोग रा. रा. बळवंत पांडुरंग उर्फ अण्णा किर्लोस्कर, प्रसिद्ध शाङ्करदिग्जयाचे कर्ते यांच्या श्रमाचें फळ असून त्यांतील पहिले चार अंक आमच्या मुंबापुरस्थांस गुदस्तसालीं पाहावयास सांपडले होते, त्यावरून प्रयोगाच्या गुणांबद्दल सर्वांची खात्री झालीच आहे. व यासाठीं प्रयोगकारांनीं एक वेळ मुंबापुरीस येऊन आपल्या अपूर्व गुणप्रदर्शनाचा लाभ इहस्थांस करून देण्यास अनमान करूं नये असें आह्मीं त्यांस सुचवितों. "

हा लेख प्रसिद्ध झाल्याच्या दुसरेच दिवशीं इंदुप्रकाशांत एक पत्रव्यवहार आला. त्यांतील विषयाला सोडून असलेला मजकूर गाळून फक्त नाटकासंबंधाचा लेख खालीं दिला आहेः

इंदुप्रकाश ता. १७।१०।१८८१

........................................ ..... ..............

" महाराज, आतांशा पुण्यामध्यें अशी काय गंमत उडाली आहे कीं, कोणाला

पुरुषार्थ करावयाचा असेल तर नाटकांत सोंग घ्यावें, लौकिक मिळवावयाचा असल्यास एकाद्या नाटकाच्या जाहिरातीखालीं नांव घालावें, " संभावित " हें पद मिळवावयाचें असल्यास नाटक्यांशीं संगत ठेवावी, नाहीं तर निदान नाटकांच्या मागून रिकामटेकडें तरी हिंडावें. वाहवा ! कां मासलेवाईक आहे कीं नाहीं स्थिति ? तात्पर्य तूर्त पुण्यांत संभावित कोण ? नाटकी, थोर कोण ? नाटकी, विद्वान कोण ? नाटकी ! खरोखर तूर्त सद्दी अशी आली आहे या धंद्याची ! ! ज्या लोकांस थोड्या वर्षांपूर्वी चांगले लोक जवळ सुद्धां उभे करीत नसत, त्यांना तूर्त मेजवान्या व बिदाग्या चालल्या आहेत !

" आज त्या सर्वांकडे विशेष लक्ष न देतां फक्त संगीतावरच चार शब्द लिहितों ! कारण हें नाटक संभावित, विद्वान् व देशहितवादी अशा मंडळीनें केलें असा बाहेर व्यर्थ गवगवा उठून लोक फसून त्यापासून वाईट होणार आहेत. या मंडळींत थोडेसे कांहीं कारकून असून बाकीचे बहुतेक अक्षरशून्य गवये ह्मणजे अर्थातच * * *, आईबापांपासून पळून आलेलीं कांहीं पोरं, व कांहीं पहिल्या प्रतीचे * * * * लोक आहेत. उगीच बाहेर लौकीक कीं विद्वानांनीं केलेलें नाटक ! या नाटकाच्या नुकत्याच झालेल्या पहिल्या प्रयोगावर चार शब्द लिहून हा लेख आज येथें आटपतों.

" प्रथमतः टिकिटें विकण्यामध्येंच फार चूक केली; त्यामुळें कित्येकांस ( दुरून आलेल्या ) तर तीं मिळालींच नाहींत. लोक आंत सोडण्याच्या वेळीं जो दंगा झाला तो तर केवळ कोंडमार : डोअर उशीरा उघडल्यामुळें जो घोंटाळा उडाला व जो त्रास झाला तो अनुभविलेल्यांसच समजला. म्यानेजमेंट ठेवायाला सत्तावीसजण होते पण उपयोग काय ? आंत गेल्यावर थिएटर इतकें भरलें होतें कीं, लोक बहुतकरून कोंडून मरतात असें वाटलें. अशाह्यांत लोकांच्या गडबडींत एक गृहस्थ रंगभूमीवर येऊन ह्मणाले कीं, " मंडळीच्या हातून एकदांच सात अंक होत नाहींत ह्मणून हें दोनदां करण्याचा बेत केला आहे. नहून पैसे मिळविण्याकरितां नव्हे ? " वः ? काय निस्पृहता ! पण त्याच मंडळीनें काल कसें हो एकाच रात्रीं संपूर्ण नाटक केलें ? तेव्हां अर्थातच पैशासाठीं ही युक्ति केली किंवा नाहीं हें कोणीही कबूल करील. नाटकही पण ख्यातीप्रमाणें वठलें नाहीं, त्यांत पहिल्या दिवशीं प्रियंवदेच्या नेसण्यानें तर सर्व नाटकाचा बेरंग केला, कंचुकीचा घसा बसला होता. देखावेही उत्तम नव्हते. शकुंतला, दिसण्यांत मात्र चांगली पण न बोलती तर बरें झालें असतें ! एकंदरींत जरी हें इतर नाटकांपेक्षां बरें झालें तरी ओरडीप्रमाणें नाहीं. राजा, कण्व, शार्ङरव, भरत हीं पात्रें मात्र बरीं वाटलीं. ७ व्या अंकांत तर पहिलें, राजाचें हावभाव करणें चुकीचें होतें. पाया खालच्या ढगांचें वर्णन करावयाच्या ठिकाणीं तो तर वरतीं दाखवीत होता ! तिस-

ऱ्या अंकाच्या वेळीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट हीच झाली कीं, शृंगार चालला होता तेव्हां पुरुषांच्या अगोदरच स्त्रियांच्या टाळ्या ! असो; तात्पर्य ही पैसे उपटण्याची कंपनी तिकडे लवकर येणार तर, मुंबईकर हो, पैशाची व्यर्थ हानि न करितां त्याचा दुसरा चांगला उपयोग करा व अशा वाईट धंद्यास उत्तेजन देऊं नका एवढी विनंति करून येथें रजा घेतों. वेळ सांपडल्यास आपल्या भेटीस पुनः येईन कळावें. ”

“ **नाटक शत्रु.** ”

सदर पत्रव्यवहार इंदुप्रकाशांतून पुन्हां **पुणेंवैभव** पत्रांतही प्रसिद्ध झाला होता. नाटक शत्रूच्या या पत्रास नेटीव्ह ओपियनमध्यें एक लांबलचक उत्तर आलें होतें. त्याची पोच घेतांना नेटिव्ह ओपिनियन कर्ते यांनीं पुढील उत्तर दिलें होतें:

“* * * सदरील पत्रव्यवहार इं. प्र. तील ज्या लांबलचक पत्रास उत्तरादाखल ‘ क्ष ’ कडून आह्माकडे आलें आहे, तेंच पत्र गेल्या आठवड्याच्या पुणेंवैभव पत्रांत सबंध उतरून घेतलें आहे. अशा प्रकारचीं पत्रें एकंदर पत्र भरण्याचे कामीं फार उपयोगीं पडतात, व निदान दिवाळीच्या सणांत स्वतः पत्रकर्त्यांचीं मनें सोंगट्या, गंजीफा वगैरे खेळण्याकडे आंतून ओढ घेत असतात, यासाठीं पु. वै. कारांनीं हें पत्र आपल्या कालमांत सबंध ओढून घेतलें याबद्दल आह्मांस बिलकुल आश्चर्य वाटत नाहीं. तथापि या पत्रांत जो आशय आहे, त्याचा संभावित रीतीचा उपयोग न करितां पु. वै. कार पाहिजे तसें बहकतात हें मात्र आह्मांस बंधुप्रीतीस्तव अयोग्य ह्मणावें लागतें. *आज मित्तीला राज्यकारणी विषयांची चोहोंकडून कशा प्रकारची गर्दी होऊन गेली आहे, व त्यांतील प्रत्येक विषयावर प्रत्येक पत्रकर्त्यानें अत्यंत श्रम व शोध करून खरी माहिती सरकारांपुढें व जगापुढें मांडणें हें किती अवश्य आहे, या गोष्टीचा आमचे बंधु यत्किंचितही विचार करते तर अमुक स्त्रीपात्र अमुक गृहस्थाकडे अमक्या वेषानें जातें किंवा कसें इत्यादि प्रकारच्या कुत्सित कल्पना काढण्यांत, व सांप्रत वर्तमानपत्रांतील लेखही नाटकीच होत चालले आहेत इत्यादि प्रकारचे अवास्तव जल्प करण्यांत आमचे बंधु गुंतले नसते अशी आमची खातरी आहे; व इतःपर तरी पु. वै. कर्ते आह्मी बंधुप्रीतीस्तव केलेल्या ह्या अल्प उपदेशाबद्दल मनांत रोष न आणितां आपलें वर्तन सुधारण्याचा यत्न करितील अशी आह्मी अंतःकरणपूर्वक आशा करितों. ”

“ **नेटीव ओपिनियन कर्ता.** ”

ता. ३१।१०।८१

* पुणें वैभवाचे उद्गार पुढें वाचण्यास सांपडतील. ”

ता. ३१ आक्टोबरच्या इंदूच्या अंकांत ठिकठिकाणीं **किर्लोस्कर** मंडळीवर कसे प्रहार आहेत ते प्रत्यक्षच पुढील मोठ्या निबंधांत वाचण्यासारखे आहेत:

इंदुप्रकाश ता. ३१ आक्टोबर १८८१.

**" आमच्या विद्वानांचें कर्तव्यकर्म. "**

.....................................................

" ह्या विषयाचा विचार करूं लागल्यावर असें मनांत येतें कीं, ही जी गोष्ट आहे ती अशिक्षित लोकांच्या मनांत कधींही यावयाची नाहीं. ज्यांचें बहुतेक आयुष्य नांगर धरण्यांत किंवा हिंग जिरें विकण्यांत गेलें आहे, त्यांस आपल्या ह्या हिंदुस्थान देशास पाहिजे काय आणि तें मिळवावयाचें कसें हें मुळींच कळावयाचें नाहीं. कारण तें कळावयास देशाच्या स्थितीची पूर्ण माहिती पाहिजे. ती त्यांस नसते. तेव्हां या गोष्टीचा विचार करण्याचा सगळा भार शिकलेल्या विद्वान् तरुण होतकरूं लोकांवर आहे हें उघड झालें. आतां त्यांच्या हातून हा विचार होत आहे किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे. आह्मी तर असें ह्मणतों कीं एक दोन सन्माननीय व्यक्तीखेरीज करून बाकीच्याकडून हा विचार होत नाहीं ही गोष्ट अत्यंत शोचनीय आहे. आपसांत एकत्र होऊन लोकांच्या सुधारणेच्या पुष्कळ गोष्टी करावयाच्या आहेत. त्याप्रमाणेंच आपल्या राज्यकर्त्यांपाशीं पुष्कळ मागणीं मागावयाचीं आहेत; हें बहुतकरून सर्व लोकांस ठाऊक असतां, त्यांजकडे ते लक्ष देत नाहींत. एवढेंच केवळ नव्हे, तर भलत्याच हलकट कामांत पुढारीपणा घेण्यास त्यांस भूषण वाटतें हें पाहून पराकाष्ठेचें दुःख होतें. या दिवसांत मुंबई ईस्त इंडिया असोशिएशन, बांबे असोशिएशन, ज्ञानप्रसारक सभा इत्यादि अत्यंत उपयुक्त मंडळ्या ज्या अगदीं आहेत कीं नाहींत अशा झाल्या आहेत त्यांचें पुनरुज्जीवन करणें हें स्तुत्य काम एकीकडे ठेवून **तीन तीन चार चार पदव्यावाले, तीन तीन चार चार गृहस्थ नाटकांच्या हँडबिलावर सह्या करितात. आणि त्यांतच कृतकृत्यता मानितात, ह्याहून देशाचें दुसरें दुर्दैव तें कोणतें? ज्या नेटिव्ह ओपिनियन पत्रामध्यें, कांहीं वर्षांपूर्वीं नाटकसंबंधाच्या नुसत्या बातमीसही जागा मिळण्याची पंचाईत असे त्या नेटिव ओपिनियन पत्रांत तूर्तकालीं पुण्यांत झालेल्या संगीत शाकुंतल नाटकासंबंधीं स्तुतिपर एक एक दोन दोन कालम निबंध यावे काय?** असें असून, इंदुप्रकाशाच्या " पॉलिसींत " फरक पडला ह्मणून उलटी ओरड! तिकडे कोल्हापूरच्या राजाचे हाल होत आहेत, इकडे बडोद्यास मोठमोठ्या खटपटी चालल्या आहेत, लोकांत अज्ञान फार असल्यामुळें त्यांस नाना प्रकारच्या विपत्ति भोगाव्या लागत आहेत, मद्यपानादि दुर्गुण लोकांत वाढत चालले

आहेत, व विधवाविवाहासारख्या सत्कार्यांकडे तरुण होतकरू व स्वतंत्रतेच्छु यांचें दुर्लक्ष होत चाललें, **असें असतां आमच्या विद्वान लोकांनीं नाटकें ह्मणजे एका प्रकारचे तमाशेच करण्यांत तल्लीन व्हावें काय?** व हीं नाटकें करून करावयाचें काय? तर दुष्यंत राजानें आणि शकुंतलेनें जें केलें ह्मणून कालिदासानें वर्णिलें आहे, त्याचें अनुकरण करून दाखवावयाचें, तर त्यावांचून आमच्या राष्ट्राचें कांहीं आडलें आहे काय? हो! अशी कल्पना करा कीं, अशीं पुष्कळ नाटकें उत्तम प्रकारें तयार होऊन आमच्या देशांत हजार पांचशें दुष्यंत नट आणि हजार पांचशें नटी शकुंतला तयार झाल्या तरी त्यांचा उपयोग काय? या विद्वानांच्या भगीरथ खटपटीनें शकुंतला दुष्यंताचीं अशीं जोडपीं तयार झालीं तरी भरत कुलांतील पूर्वींच्या वैषयीक सुखकीर्तांपैकीं त्यांस एक कण तरी प्राप्त होईल काय? आह्मी तर असें समजतों कीं आमच्या देशास आलेली निकृष्टावस्था नाहींशी होण्यास आणि दुष्यंताचे वेळेची स्थिति प्राप्त होण्यास याच्या उलट प्रकार घडला पाहिजे; ह्मणजे आमच्यांतल्या बायकांचे ठायीं शकुंतलादिकांप्रमाणें पातिव्रत्यादि गुण, पोक्त विचार, पोक्त बुद्धि, चातुर्याचीं कामें काजें करण्याचें सामर्थ्य व धीर हीं आलीं पाहिजेत अशी ही वेळ आहे.

आतां आह्मांस ह्मणजे आमच्या राष्ट्रास मुख्यत्वें पाहिजे काय, तर देशकल्याणाचा हेतु धरून ईश्वरास स्मरून दृढनिश्चयानें उद्योग करणारे असे पुरुष किंवा स्त्रिया पाहिजेत. महाराष्ट्रांतले शिवाजी महाराज, रूस देशाचा राजा पिटर धि ग्रेट, इंग्लंड देशाचा राजा आलफ्रेड धि ग्रेट असे पुरुष व अहिल्याबाई, बायजाबाई सारख्या माउल्या व्यवहारप्रकरणांत शिरल्यावांचून आमचें हित व्हावयाचें नाहीं. तसेंच सर ऐझाक् न्यूटन आणि लॉर्ड बेकन् त्यांसारखे पुरुष विद्याविषयामध्यें पैदा झाले पाहिजेत. त्याप्रमाणेंच जॉर्ज वाशिंग्तनासारखे निरिच्छ व फ्रयांक्लिनसारखे उद्योगी पुरुष राष्ट्रांच्या कल्याणाकरितां झटणारे झाले पाहिजेत. तरच, ह्या आमच्या किंवा दुसऱ्या कोणत्याही एकाद्या राष्ट्रास उत्तम स्थिति प्राप्त होणार. असे पुरुष पैदा होण्यास राष्ट्रामध्यें विद्या, दृढ निश्चय, धर्मनिष्ठा, स्वदेशाभिमान इत्यादि गुणांचा प्रसार पुष्कळ झाला पाहिजे. हें काम पांच चार किंवा शेंपन्नास वर्षांत होण्याजोगें नाहीं. हें चांगलें सिद्ध होण्यास पिढयाच्या पिढया लोटल्या पाहिजेत; आणि त्यास लवकर आरंभ झाला पाहिजे. तो आरंभ करणें हें आमच्या सुधारणेच्छु पंडितांचें काम आहे. "महाजनो येन गतः स पंथा" प्रमाणें **लोक ज्यांस थोर मानतात; आणि ज्यांच्या कित्यानें वागण्याची इच्छा करितात त्यांनीं कित्ता चांगला घालून द्यावा, आणि लोकांस चांगला मार्ग दाखविल्याचें यश पदरीं बांधून घ्यावें. हें जर ते करणार नाहींत आणि नाटकासारखा भलताच कित्ता घालून देऊन जर त्यास**

कुमार्गास लावितील, तर देशाचें सर्वस्वीं अकल्याण केल्याचें खा-पर त्यांच्या माथीं फुटणार आहे."

याच अंकांत "**नाटकाची पर्वणी**" या सदरा खालीं आणखी मजकूर आहे:

..................................................

"कालचे रात्रीं व्हिक्टोरिया थिएटरांत पुणेंकर संगीत शाकुंतलवाल्यांनीं सं. शाकुंतल नाटकाचे ४ अंकांचा प्रयोग केला. उत्तरभाग उद्यांचे रात्रीं होण्याच्या जाहिराती लागल्या आहेत. मुंबईच्या लोकांस वरीच गणेश टोपी बसणार. तिकिटांचे दर ४,३,२,१८८ आणि ८१२ असे आहेत. हर! हर! किती जबर हे दर आहेत असें असून ते ने. ओ. कर्त्यांस मात्र "जबर" वाटत नाहींत. ठीकच आहे. "Love is blind" "प्रिय सदोषही चांगलें" असें मोरोपंतांनीं ह्मटलें तेंच खरें आहे. "They pay too muteh for there whistle" अथवा "अनेक दोषदुष्टोऽपि कायः कस्य न वल्लभः कुर्वन्नपि व्यलीकानि यः प्रियः प्रिय एव सः" कालच्या दिवशीं नाटकगृह द्वारीं ४ रु., २रु., १रु. व तिकिटें हातांत घेऊन प्रेक्षक स्त्री पुरुषांचा पंढरीच्या कार्तिकीप्रमाणें तोबा उडत होता. मुंबई संगीत व पुणें संगीत हीं नाटकें पाहिलेल्या आमच्या कितीएक मित्रांच्या सांगण्यावरून ऐकतों कीं, पुण्याचा दुष्यंत आणि मुंबईची शकुंतला हा जोडा उत्तम जमता! कण्वद्वयांची समानताच समजली पाहिजे. पोषाख व हावभाव हे पुणेंकरांत जास्त सफैदार होते. व कविताही मुंबईपेक्षां पुण्याच्या सुधारणासंपन्न आहेत. रागदारी व गायनपद्धति मुंबईहून पुण्याची असभ्यतेची ह्मणण्यास गवई लोक मागें घेणार नाहींत. ही मंडळी देशकल्याणार्थ याप्रमाणें व्यष्टिप्रयोग झाल्यानंतर एक दोन लागोपाठ समष्टि प्रयोग करून चालती होणार. मध्येंच येत्या गुरुवारीं मुंबई शकुंतलाकार आपला नित्याचा प्रयोग करणार आहेत व हीच मंडळी पुढील आठवड्यांत "संगीत वेणीसंहार" करणार. इतक्यांत कोल्हापूरकरही "प्रमिला स्वयंवर" शेवटचा प्रयोग करून इथून प्रयाण करणार असें समजतें. शिवाय पारसी, भरत शास्त्रोत्तेजक या बारीक सारीक मंडळ्यांसही पोटासाठीं या गर्दीतच घुसावें लागतें. एकंदरींत आजकाल येथें ही नाटक पर्वणी मोठी गर्जत आहे. कोठेंही दोन तीन तरुण स्त्री पुरुष व्यक्ति जमल्या कीं नाटकाच्या गोष्टी."

इंदुप्रकाशच्या या तारखेच्या विस्तृत लेखावर नेटिव्ह ओपिनियनमध्येंही तसाच लेख प्रसिद्ध झाला. त्यांत वरील लेखांच्या उद्देशानें स्पष्टीकरण केलें आहे:

ने. ओ. ता. ६ नोवेंबर १८८१.

" आमच्या विद्वानांचें कर्तव्यकर्म. "

" गेल्या इंदुप्रकाशांत सद्र हेडिंग दिलेला एक लांबलचक निबंध छापला आहे. त्याचा तात्पर्यार्थ सांप्रतकाळीं देशहितासंबंधानें आपणांस पाहिजे आहे काय व तें संपादण्यास कोणते उपाय करावे हें जाणण्याकडे आमच्या अलीकडील विद्वान् लोकांचें लक्ष लागत नाहीं एवढेंच ह्मणण्याचा आहे. आमच्या बंधूंचा एवढयाच महत्त्वाचें निःपक्षपातानें प्रणयन करण्याचा खरा उद्देश असता, तर तो आह्मीं मोठ्या आनंदानें स्वीकारिला असता; व त्याबद्दल आमच्या विद्वन्मंडळास योग्य वेळीं जागृत करण्याचा यत्न केल्याबद्दल आह्मीं आमच्या बंधूची तारीफही केली असती. परंतु आमच्या बंधूनीं आपल्या निबंधांत ज्या क्षुल्लक कारणावरून प्रस्तुत विषयाचा उपन्यास केला आहे, त्या कारणाकडे यत्किंचित् लक्ष पुरविलें असतां इंदूचा हा लेख केवळ कुत्सित बुद्धीनें प्रेरित होतसाता मुद्रणयंत्राच्या दाबाखालीं सांपडला एवढेंच निःसंशय सिद्ध होतें. व असा प्रकार असल्याबद्दल आह्मांस आमच्या बंधूंची खरोखरी कींव वाटते. **आलीकडे थोडे दिवस पुणें व मुंबई या ठिकाणीं संगीत शाकुंतल नाटकाचे प्रयोग होऊं लागले आहेत; हें काय तें आमच्या बंधूस राग येण्याचें व वाईट वाटण्याचें कारण ! व एवढें कारण मनांत बाळगून आमच्या बंधूनीं गेल्या खेपेस " नाटक " या विषयाकरितां कित्येक कालमच्या कालम खर्च केले आहेत ! ' पत्रें पाठविणारास सूचना ' दिल्या आहेत. त्यांत एका असलेल्या ' क्ष ' नामक गृहस्थास नाटकासंबंधानें त्यांचा कुत्सित बुद्धिसूचक उपदेश आहेच ! मुख्य निबंधाच्या भागांतही " आमच्या विद्वानांचें कर्तव्य कर्म " या बडेजावीच्या विषयाचा प्रस्ताव मात्र करण्याचा मुख्य हेतु नाटकच** ! व सरते शेवटीं " मुंबई " सदराखालीं ' नाटकाची पर्वणी ' ह्मणून लांबलचक मजकूर आहे तो आहेच ! नाटकासारख्या अत्यल्प महत्त्वाच्या विषयाला आमच्या बंधूनीं इतकें महत्त्व कां दिलें, ह्याचें आह्मांस मोठें आश्चर्य वाटतें, व या कामीं त्यांनीं आपल्या पुणेंकर एका बंधूंचा कित्ता गिरविण्यास आरंभ केला हें पाहून आह्मांस अत्यंत सखेदाश्चर्यही होतें ! जो इंदुप्रकाश नाटकाचा इतका शोकी, कीं त्यानें इचलकरंजीकर नाटककारांचे नाटकासंबंधानें स्तुतिलेख लिहितांना एक आठवडाही वायां जाऊं दिला नाहीं व कोल्हापूरकर नाटक मंडळीस पंडित गट्टू लालजी यांनीं दिलेलें प्रशंसापत्र आपल्या स्वतःच्या लेखाखालीं नमूद करून घेण्यास क्षणभर सुद्धां आळस केला नाहीं, फार कशाला, ज्या इंदुप्रकाशानें थोड्या ह्मणजे एक दोन महिन्यांच्या पूर्वीच मुंबईकर संगीत शाकुंतलमंडळीचे ध्वजोच्छ्रयण करण्यास आरंभ केला होता, तोच इंदुप्रकाश पुणेंकर

संगीत शाकुंतलकारांचें पाऊल या शहरीं पडतांच पित्तप्रकोपाच्या विकाराप्रत पावतो हें केवढें आश्चर्य ! ! ! इंदूनें मुंबईकरांचें ध्वजोच्छ्रयण करण्यास झटावें, व पुणेंकरांच्या मात्र ध्वजावपतनास मुद्दाम उद्युक्त व्हावें, अशाविषयीं आमच्या बंधूंस काय कारण झालें असावें, हें आह्मांस माहीत नाहीं. तथापि आह्माकडे आलेल्या एका ‘ विचारी द्रष्टा ’ च्या पत्रांत याबद्दल खुलासा केला आहे. हें पत्र लांबलचक असून शिवाय आमचे मनांत या संबंधानें वर्तमानपत्रांतून मुळींच वादविवाद करावयाचा नाहीं, याकरितां आह्मी त्या पत्रास मुळींच जागा देत नाहीं. एवढेच नव्हें तर त्या पत्र लिहिणारानें केलेला खुलासा कदाचित् अक्षरशः खराही असला, तथापि आमच्या बंधूंची त्यायोगें मानहानि होईल ती न व्हावी एतदर्थ त्या खुलाशाचा आह्मी उच्चारही करीत बसत नाहीं. मात्र याठिकाणीं आह्मी आपल्या बंधूंस प्रेमपूर्वक एवढेंच सांगतों कीं, त्यांनीं अशा क्षुल्लक गोष्टींत मन घालून वस्तुतः ज्यास फारसें महत्त्व नाहीं, अशा विषयास मुद्दाम ओढून ताणून महत्त्व देणें वाजवी नाहीं. त्यांतूनही महत्त्व देणेंच तर ज्या विषयाच्यासंबंधानें आपण स्वतः उपदेश करितों त्याप्रमाणें आपलें स्वतःचें वर्तन अगोदर नीट तपासून पहावें. देशहिताच्या संबंधानें काय काय उणीवी आहेत, व त्या काढून कशा टाकाव्या या गोष्टी अशिक्षितांस कधींही कळावयाच्यां नाहींत, त्या कळावयाच्या ह्मटलें ह्मणजे, सुशिक्षित लोकांसच, हें आह्मीही कबूल करितों. परंतु एवढें सांगितलें ह्मणजें आमच्या बंधूंचें कर्तव्यकर्म संपलें असें मात्र त्यांनीं समजूं नये. इंदुप्रकाशकर्तेही स्वतः सुशिक्षितांत मोडतात, तेव्हां ते आमच्या विद्वानांचें जें कांहीं कर्तव्यकर्म ह्मणून सांगतात, तें स्वतः त्यांचें कर्तव्यकर्म नाहीं असें नाहीं.......मिठावरील करासारख्या महत्त्वाच्या विषयासंबंधानें इंदुप्रकाशकर्ते उदासीन राहतात; व संगीत शाकुंतलकारांनीं नाटकाचे दर जबर ठेविले ह्मणजे मात्र कुरकूर करितात. वास्तविकदृष्ट्या नाटकप्रयोग हें देशस्थिति सुधारण्याच्या साधनांपैकींच एक साधन आहे. तथापि आज मित्तीला जी नाटक प्रयोगाची स्थिति आहे तिजकडे लक्ष देतां तिनें निर्दिष्ट प्रयोगास एवढें मोठें भूषण देणें वाजवी होणार नाहीं; व याकरितां आजकालच्या प्रयोगांस कांहीं अंशीं चैनबाजीच्या प्रकारांतच ढकलणें जरूर आहे. तथापि या चैनबाजीच्या प्रकारासंबंधानें एक गोष्ट अवश्य ध्यानांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, ह्या आमच्या देशांत प्रारंभीं जेव्हां महाराष्ट्र भाषेंत नाटक करण्याची तऱ्हा सुरू झाली; तेव्हां नाटकासंबंधानें लोकांची अभिरुची ज्या प्रकारची होती त्या प्रकारची आतां नाहीं. कालेजांतील विद्वान् लोक संस्कृत भाषेंत नाटकें करूं लागले, त्या वेळीं त्यांनीं अभिनयादिकांचा जो कित्ता घालून दिला, त्याच्या योगें पूर्वीची रुचि पालटण्यास आरंभ होऊन मोठमोठाल्या शहरांतून या नाटककलेस सांप्रतचें रूप प्राप्त झालें आहे. अद्यापि यांत पुष्कळच रूपांतर झालें पाहिजे व तें होऊन जेव्हां पुराणादिक गोष्टींचीं नाटकें पाहण्यापेक्षां जनसमुदायास प्रस्तुतच्या खऱ्या खऱ्या देशस्थितीची साक्षात्

चित्रें रंगभूमीवर दिसूं लागतील, तेव्हांच नाट्यकलेचा खरा उद्देश साध्य होऊन देशासही फायदा होईल. परंतु ही गोष्ट साध्य होण्यास देशस्थितीचीं साक्षात् चित्रें काढून तीं रंगभूमीवर नेण्याचें काम विद्वज्जनांनींच अंगावर घेतलें पाहिजे; व तशापैकीं कांहीं प्रकार आज मित्तीला सुरूही आहे. तथापि अशीं चित्रें पुष्कळशीं तयार होतील तेव्हांच ही गोष्ट करूं असें ह्मणून चालावयाचें नाहीं, त्यास हळू हळू विद्वज्जनांनीं टेका देत राहिलें पाहिजे. या दृष्टीनें पहातां पूर्वीच्या नाटकप्रयोगाच्या स्वरूपाचें जें हल्लीं सुधारलेलें रूपांतर झालें आहे, त्यास विद्वन्मंडळीनें यत्किंचितही आश्रय दिल्यास ते दूषणार्ह होतील हें म्हणणें कोणास शोभेल तें शोभो. तशांतून या विद्वन्मंडळीनें जर हा आश्रय बाराही मास नाटकाचा धंदा पत्करणाऱ्या नाटकमंडळीस दिला असता, तर आमच्या बंधूंच्या ह्मणण्यास कांहीं तरी न्यायता येती, परंतु त्यांनीं तूर्त एवढेंच ध्यानांत ठेवावें कीं, मुंबई संगीत शाकुंतलकारांनीं जसा बारमाहीचा नाटकाचा धंदा काढिला आहे तशा प्रकारचा धंदा पुणेंकर मंडळीनें काढिला नाहीं, व एवढ्याकरितां अशा मंडळीस थोडके वेळ आश्रय देणें कदापि गैर होईल, असें आह्मांस वाटत नाहीं. तथापि यासंबंधानें इंदूची दृष्टि उलटी आहे व त्यास पुणेंकर मंडळीस संगीत शाकुंतलवाले, नाटकी मंडळी, इत्यादि निंदाव्यंजक विशेषणें देणें योग्य वाटतें; मात्र तीच बुद्धि मुंबईकर मंडळीसंबंधानें कायम न राहतां, ते तीस " मुंबई संगीत शाकुंतलकार " या महत्त्वसूचक विशेषणानें भूषवितात ! तेव्हां असें करण्यांत आमचे बंधु कितपत निर्मत्सर आहेत, व ते स्वतः आपल्या कर्तव्यकर्मास कितपतसे जागतात याचा विचार वाचकांनींच करावा.

इतका वेळ " नाटक " या विषयाच्यासंबंधानें आमच्या विद्वान् मंडळीच्या कर्तव्यास व कृत्यास अनुलक्षून आह्मीं लेख लिहिला. या कर्तव्याचा संबंध इतर अनेक विषयाशीं आहे, यास्तव सवडीनुसार त्याचें क्रमवार विवेचन करावयाचा आमचा मानस आहे. "

यावर इंदुप्रकाशांत पुन्हां प्रत्युत्तर आलें तें हें:

इंदुप्रकाश, तां. ७ नोव्हेंबर १८८१.

**" नेटिव ओपिनियन आणि पुणें संगीत शाकुंतल "**

" आमच्या मागच्या अंकांत " आमच्या विद्वानांचें कर्तव्यकर्म " ह्या विषयावर जो निबंध आला आहे, तो संगीत नाटकाविषयींच्या सूचनांच्या संबंधानें आमचे मित्र नेटिव ओपिनियनकर्ते यांस बराच लागला आहे, असें त्यांच्या कालच्या अंकांतल्या दुसऱ्या लेखावरून दिसून येतें. त्यांनीं आमच्या आक्षेपावर उत्तर देण्याचा जो प्रयत्न केला आहे तो सगळा निरर्थक झाला आहे, असें कोणाही समंजस आणि निःपक्षपाती वाचणाऱ्याच्या लक्षांत यावयाजोगें आहे. नाटकाविषयींच्या

लेखास आह्मी आपल्या पत्रांत जागा देतों, तेणेंकरून त्या विषयाचें महत्त्व आह्मी वाढवितों, असें त्यांचें ह्मणणें आहे. असत्यापासून किंवा व्यभिचारापासून किती वाईट परिणाम होतात, हें दाखविण्यास ज्यांनीं भारतासारखे ग्रंथ लिहिले आहेत, त्यांनीं त्या दुर्गुणांचें महत्त्व वाढविलें आहे, असें ह्मणावयाचें काय ? आमच्या विद्वानांचीं कर्तव्यकर्मे कोणतीं तीं नुसतीं सांगून स्वस्थ बसू नये, तर तीं करावयास लागावें, असें आमच्या बंधूंचें ह्मणणें आहे; आणि ते विचारतात कीं, इंदुप्रकाशकर्ते आपल्या कर्तव्यास जागलों असें खातरीनें सांगू शकतील काय ? ह्याचें उत्तर आह्मी स्वतः न देतां लोकांवर संपवितों. तथापि, परकीय राष्ट्रांच्या वर्चस्वाच्या प्रखर शस्त्राच्या योगानें आधींच निष्कुंतल झालेले आपण जे हिंदुस्थानांतील लोक त्यांतल्या चांगल्या होतकरू मुलांस थोर पुरुष बनविण्याचा प्रयत्न न करितां शकुंतला नट बनविण्याच्या कामांत आह्मी पुढार घेत नाहीं, हें मात्र आह्माकडून महत्पाप होत आहे !

मिठावरील जकातीसारखे महत्त्वाचे विषय आह्मी एकीकडे ठेवितों, आणि नाटकांवर लिहितों असा त्यांचा दुसरा एक आक्षेप आहे. याचें निरसन अंशतः वरतीं झालेंच आहे. तथापि आमचे मित्र नेटिव्ह ओपिनियनकर्ते जर आमचें पत्र नेमानें लक्षपूर्वक वाचणारे आणि वाचलेला मजकूर लक्षांत ठेवणारे दीर्घावधानी असते व निदान आमच्या मागच्या दोन अंकांचें तरी जर ते अवधान ठेवतें तर त्यांनीं असा वाष्कळलेख लिहिला नसता. ह्याच वर्षाचा इंदूचा ता. १२ सप्टेंबर १८८१ चा ३७ वा अंक पहा. दोन महिन्यांच्या आंतील गोष्टीची इतकी ही विस्मृति पडण्यास आमच्या स्वयंप्रकाश ने. ओ. च्या लेखनकारास वार्धक्य नसतांही काय कारण झालें असावें बरें ? **कारण ते स्वयंप्रकाश महाराज नाट्यक्षारार्णवास मिळणाऱ्या एकाद्या प्रवाहांत संगीताच्या लहरींचे झुकें मारण्यांत दंग होऊन, आपल्या पूर्वीच्या मिठास विसरून व अर्णवास** इंदूची दशा सुटली तरी भरती येत नाहीं, ह्मणून आत्मस्वरूपांत **विरघळून तर गेले नसतीलना ?** परंतु असा आह्मांस त्यांच्याप्रमाणें एककल्लीपणावर जाऊन वृथा उखाळ्या पाखाळ्या काढण्याची इच्छा व वेळही नाहीं. असो, " जनसमुदायास प्रस्तुतच्या खऱ्या स्थितीचीं चित्रें रंगभूमीवर दिसूं लागतील तेव्हांच नाट्यकलेचा खरा उद्देश साध्य होऊन, देशासही फायदा होईल, " असें आमच्या बंधूंचें ह्मणणें आहे. तो उद्देश कोणता ? आणि तो फायदा कोणता ? तो उद्देश म्हणजे पैसा मिळविणें, आणि तो फायदा ह्मणजे लोकांत विषयोपभोगाच्या इच्छेची वृद्धि करणें ! फार उत्तम ! " मुंबई शाकुंतलकारांनीं बारमाहीचा नाटकाचा धंदा काढिला आहे," हा मुंबईकारांचा दोष, " तशा प्रकारचा धंदा पुणेंकरांनीं काढिला नाहीं. " हा गुण ! ! " अशा मंडळीस थोडके वेळ आश्रय देणें कदापि गैर होईल असें आह्मांस

वाटत नाहीं. "! ठीक आहे. आमचे बंधू "गैर नाहीं." असें मात्र ह्मणतात आणि "भूषणास्पद आहे" असें ह्मणत नाहींत, याचा आह्मांस संतोष वाटतो. जगांतल्या चांगल्या उद्योगाची याद जर पाहिली तर तींत नाटकें किंवा तमाशे करणें हें आढळणार नाहीं. मग त्यांत पडलेले लोक शिकलेले असोत किंवा न शिकलेले असोत. पुणेंकरांच्या दुसऱ्या हँडबिलावर एका बी. ए. ची सही कमी झाली आणि दरही उतरले. हा आमच्या लेखाचा गुण असावा, असें पुष्कळांस वाटतें, हें जर खरें असेल तर आमच्या लिहिण्याचें थोडें तरी सार्थक्य झालें असें आह्मी समजतों.

लोकांचें द्रव्य आणि आयुष्य यांचा खर्च ज्या नाटकांकडे इतक्या सपाट्यानें चालला आहे त्याकडे आह्मी आपल्या पत्राची जागा ने. ओ. प्रमाणें यापुढें घालवूं इच्छित नाहीं. मग ह्याविषयीं कोणी आह्मांस अनुकूल लिहो किंवा प्रतिकूल लिहो."

इतकें लिहून झाल्यावर त्याच अंकांत वर्तमानसारांत पुढील मजकूर आहेः

इं. प्र. ता. ७ नोव्हेंबर १८८१.

"पुणें संगीत सत्राचें गेल्या रात्रीं अवभृतस्नान झालें. एकंदर जमा सुमारें २७।२८ शें रुपये झाली असावी. दिल्ली, औरंगाबादी, व पुणेरी कावे होते तेवढे करूनही शेवटीं तुंबडी जेवढी भरण्याची उमेद होती तेवढी भरली नाहीं. त्यांनीं येत्या शिमग्यास आपलें ठाणें व डफादि सामुग्रीसह येथें येऊन हँडबिलावर ४ अनरेबल व चार नगरशेट यांच्या निशाण्या केल्यास मनोदयाप्रमाणें तुमडी भरून देण्यास आमचे मुंबईकर षोकी लोक कमी करणार नाहींत. पण या कंपनीनें इतकें जरी केलें तरीही आमचे ने. ओ. ही कंपनी "निल्याची धंदेवाली नाहीं" असें ह्मणण्यास कधींही चुकावयाचे नाहींत. कारण यांचें डोकें प्रस्तुत संगीतानें आमच्याविषयींच फिरलें आहे असें नाहीं, तर कालचाच ने. ओ. चा अंक पाहा कीं, ज्यांत "पुरवणी पहा," असें मधल्याच एका विषयापुढें ह्मणून आपला हात दाखवून ती पुरवणी वाचकांस आज मिळते ! काय करील बिचारा तो!! आज समग्र आठवडा नाटकाचे पडदे खेचणें, इंदूचा नौकर कोणी संगीत पाहण्यास येईल तर त्याच्या प्रतिबंधार्थ दरवाज्यावर खडा पहारा करणें व पांच मिनिटें पडदा पडेल ह्मणून स्टेजवर येऊन चार शब्दांचें लांबलचक व्याख्यान देणें, पुणेंकरांस थ्यांक्स द्या ह्मणून प्रेक्षकांस सारखें झां झां करणें, मेजर साहेबांचे आभार मानण्याचे प्रसंगीं प्रेक्षकांच्या दंडुक्यांचे टोले सोसणें इत्यादि स्तुत्य व जोखमीचीं कामें करावीं लागलीं आणि त्यांतच इंदूचा मत्सरीपणा काढण्याचा प्रसंग ! तेव्हां तो ईश्वर असला तरी बेशुद्ध होईल, मग नामधारीची काय कथा ?"

दोन्ही पत्रांचा वाद शेवटीं इतका व्यक्तिविषयक झाला कीं, त्या संबंधानें ज्ञानप्रकाशसारख्या तिऱ्हाईत ठिकाणच्या पत्रासही लेख लिहावा लागला. तो लेख हाः

ज्ञानप्रकाश ता. १० नोवेंबर १८८१

" नाटकें "

" एखाद्या दोन मनुष्यांत वैमनस्य सुरूं होऊन उभयतांचींही मनें एकमेकांविषयीं दूषित झालीं म्हणजे आपण लिहितों काय, हल्लीं जें आपण लिहीत आहों त्याजमुळें आपल्या पूर्वीच्या एकाद्या लेखास बाध येत आहे किंवा काय, आपलें लिहिणें सत्यप्रिय व निःपक्षपाती जनांस मान्य पडेल किंवा नाहीं वगैरेबद्दल उभयतांसही देहभान राहत नाहीं असा एक सर्वसाधारण सिद्धांत आहे. ह्याचा एक चटकदार मासला गेल्या इंदुप्रकाशांत वाचण्यांत आल्यावरून तो मुद्दाम साद्यंत उतरून घेतला आहे. अगांतुक किंवा गौण विषयाकडे लक्ष पोहोंचवून मुख्य प्रधान विषयाकडे ह्या व अशाच प्रकारच्या सर्व लेखांत अतिशय दुर्लक्ष झालेंसें दिसतें ह्मणून त्याजबद्दल विस्तारानें लिहिण्याचें प्रयोजन आहे, तरी तसें करण्यांत आज स्थळ नसल्यामुळें पुढील उतारा फार लक्षपूर्वक वाचण्यास वाचकांस आह्मीं शिफारस करतों.

पुढील एकाद्या प्रसंगीं मूळ विषयावर आमचा अभिप्राय काय आहे तो विस्तारानें कळवूं. आज तूर्त एवढेंच सांगणें बस्स आहे कीं, इंदुप्रकाशासारख्या संभावित पत्रकर्त्यानें पुढच्या सारखे द्वेषमूलक व निंद्य लेख प्रसिद्ध करावे हें त्यास अतिशय लांछनकारक आहे. " [ नंतर इंदुप्रकांतील टीकाविषयक उतारा दिला आहे. ]

या वादाच्या शेवटच्या हल्ला नेटिव्ह ओपिनियन पत्रानें भरला आहे. तो येणेंप्रमाणें:

नेटिव्ह ओपिनियन ता. १३ नोवेंबर १८८१

" इंदुप्रकाशाची सभ्यता व नाटकादि किरकोळ विषयांवर शेवटले चार शब्द."

गेल्या आठवड्यांत पुणेंकर संगीत शाकुंतलकारांनीं जे कांहीं नाटकप्रयोग करून दाखविले, त्यासंबंधानें लिहित असतां नीति व अनीति या संबंधानें नवीनच सोवळा वेष धारण करूं पाहणाऱ्या आमच्या ग्रामबंधूंनीं आपल्या गेल्या ह्मणजे ता. ७ मिनहूच्या अंकांत ग्राम्य मजकुराची खूपच गर्दी करून सोडिली आहे. आमचे बंधु " नाटक " तशांतून " संगीत नाटक " व तशांतूनही " पुणेंकरांचें संगीत नाटक " या विषयासंबंधानें कशा प्रकारें बरळत सुटले आहेत, याचा मासला गेल्याच खेपेच्या अंकांत आह्मीं दाखविला आहे. संगीत शाकुंतलकारांनीं ठेविलेले तिकिटांचे दर जबरच आहेत असें निश्चयपूर्वक आजच सांगवत नाहीं एवढे आमचे शब्द आमच्या बंधूंच्या दृष्टीस पडतांच त्यांनीं आपल्या ता. ३१ च्या अंकांत ' पत्रें पाठविणारांस सूचना, ' आर्टिकलें, व ' मुंबई, या तीन सदरांत संगीतास, व त्याचे आडून आह्मांस, शब्दशिलांचा मार करण्यास आरंभ केला. या गोष्टीबद्दल

आमच्या गेल्या अंकांत त्यांची यथोचित संभावनाही झाली. त्यामुळें तर ते सांप्रत अत्यंत विकोपास चढले आहेत, ते इतके कांहीं कीं, संगीत शाकुंतल संबंधानें शिव्या देण्याच्या भरीस पडून त्यांनीं आपल्या पत्रांतील एक सदरही रिकामें जाऊं दिलें नाहीं. ' पत्रें पाठविणारांस सूचना, ' अर्टिकलें, ' मुंबई ( या सदराखालीं यावयाचा मजकूर शिव्या देण्याच्या धांदलींत चुकीनें ' वर्तमानसार, या सदराखालीं घातला आहे ! ) ' वर्तमानसार, ' ' पत्रव्यवहार, व ' वातमीदारांकडील पत्रें, या प्रत्येक सदरांत शिव्यागाळींचा कांहींना कांहीं तरी मजकूर आहेच व तोही थोडाथोडका नसून साऱ्या इंदुप्रकाशांतील मराठी संबंधानें आलेल्या सरासरी साडे दहाशें ओळींपैकीं जवळ जवळ आडीचशें ओळी, ( ह्मणजे जवळ जवळ इं. प्र. ची एक चतुर्थांश मराठीकडील वाजू ), त्यांनीं या कामाप्रीत्यर्थ खर्च केली आहे ! वरें इतकाही मजकूर जर मुख्य विषयाच्या धोरणानें लिहिला गेला असता, तर त्यांस आह्मां फारसें वावगें ह्मटलें नसतें. परंतु इं. प्र. कर्त्यांचा लेख विषयास मुळींच लागू नसून बहुतेक केवळ एकाच व्यक्तीस अनुलक्षून लिहिला आहे यामुळें इं. प्र. कर्त्यांनीं विषयवाद सोडून व्यक्तिवादांत मन घातलें ही गोष्ट आमच्या मतें अत्यंत अश्लाघ्य झाली. इं. प्र. कर्त्यांचा अभिप्राय नाटकांसंबंधानें नितराम् विरुद्ध असता, तरी त्याबद्दल त्यांना कोणीं कांहीं ह्मटलें नसतें; परंतु त्यांच्या या आचरणानें त्यांचें लक्ष, मनस्कत्व व क्षुद्र भीरुता हीं मात्र बाहेर पडलीं यावद्दल आह्मांस अत्यंत खेद वाटतो. अस्तु. या व्यक्तिवादासंबंधानें आह्मांस मुळींच वोलावयाचें नाहीं, याकरितां प्रस्तुतच्या विषयावाबद अखेरचे चार शब्द लिहून आह्मी आमच्या बंधूंचा निरोप घेतो."

आमच्या बंधूंचें आलीकडे नाटकासंबंधानें माथेंच फिरून गेलें आहे. हें वर सांगितलेंच आहे. या माथेंफिरीनें इं. प्र. कर्ते इतके वेडावून गेले आहेत कीं, केवळ व्यक्तिद्वेषास्तव ते आपलीं पूर्वींचीं मतेंही भराभर विसरूं लागले आहेत. गुदस्तसालीं संगीत शाकुंतलचा पुणेंकर मंडळीनें प्रयोग केला, तेव्हां कोणा एका सन्माननीय व्यक्तीनें या प्रयोगास ' तमाशा ' ह्मटलें असतां तें इं. प्र. कर्त्यास त्यावेळीं खपलें नाहीं; परंतु सांप्रत सर्वच प्रकार उलटा होऊन त्यांनीं त्यास उघडपणें हें निंद्य नाम देण्यास आरंभ केला आहे ! पुणेंकर मंडळीनें नाटकाच्या भाषांतर पद्यांस लावणीची चाल लागू केली, यामुळें आमच्या बंधूस नाटकांचा कंटाळा आला हें जर खरें आहे. तर गुदस्तसालच्या प्रयोगास लावण्या नव्हत्या काय ? मग त्या वेळींच आमच्या बंधूस नाटकांचा कंटाळा कां आला नाहीं ? किंवा लावण्या व नाटकाबद्दलच्या तिटकाऱ्यांचा जर कांहीं कार्यकारणभागसंबंध असेल, तर भगवद्भक्ति संबंधानें रामजोश्यानीं लावण्या केल्या आहेत, एवढ्यावरून आमचे बंधु अद्यापि भगवद्भक्ति सोडून नास्तिकांत शिरले नाहींत हें केवढें आश्चर्य ? कसेंही

असो; आमचे सरतेशेवटीं आमच्या बंधूस इतकेंच सांगणें आहे कीं, जर त्यांस (कोणत्याही कारणानें असो) नाटकांचा खरोखरच कंटाळा आला असेल व इतःपर शकुंतला नटांचीं मुखावलोकनेंही नकोशीं झालीं असतील, तर त्यांनीं सर्वांचे पोटीं जें आपलें स्वतःचें निष्कुंतलत्व कबुल केलें आहे तें घालविण्यास झटावें, व तें नच साधलें निदान अनेक दिवस एकसारखा टाहो फोडीत राहून जें शकुंतला स्त्रियांस शकुंतलत्व देण्याविषयीं त्यानीं दीर्घ श्रम केले, तेवढें तरी सार्थकत्वास पोंचवावें, म्हणजे तेणेंकरून तरी शकुंतला नटांविषयीं त्यांनीं दर्शविलेली अभक्ति सत्पात्रीं योजिल्यासारखी होईल.

सदर्हू वादविवादाला नाटकविषयासंबंधाचा मतभेद कारण नसून व्यक्तीव्यक्तीचा मतभेद कारण होय. १८८० सालीं इंदुप्रकाश पत्राचें संपादकत्व **शंकर मोरो रानडे** यांचेकडे होतें परंतु त्यांच्याकडून तें १८८१ सालीं निघून नेटिव्ह ओपिनियन पत्राचें आलें. **रानडे** हे खरे नाट्यकलाभिज्ञ व **किर्लोस्कर** मंडळीच्या पुरस्कर्त्यांपैकीं असत. त्यामुळें नेटिव्ह ओपिनियन पत्रांत अनुकूल लेख येणें हें स्वाभाविकच होतें; व इंदुप्रकाशाशीं यांचा संबंध सुटल्यामुळें त्यांत त्यांच्या विरुद्ध लेख येणें हेंही स्वाभाविकच झालें असें ह्मटलें पाहिजे. नाटकविषयासंबंधानें जेव्हां जेव्हां टीकात्मक लेख येतात, तेव्हां तेव्हां ते कांहींना कांहीं कारणांनीं द्वेषमूलक असतात असा बहुतेक अनुभव आहे. मनुष्याच्या मनावर दुराग्रहाचा पगडा बसला असतां तो चांगल्या गोष्टीही वाईटशा कशा तऱ्हेनें प्रतिपादन करीत असतो हें सदरील व्यक्तिविषयक मजकुरावरून चांगलें समजून येणारें आहे. **अण्णासाहेबांच्या** कृतीचें त्यावेळीं लहान थोर, व विद्वान् अविद्वान् या सर्वांनीं मनःपूर्वक अभिनंदन केलें आहे. **केसरी** पत्रांतही त्यावेळीं " नाटकें करावीं कीं करूं नये ? " ह्मणून एक प्रमुख निबंध आला होता. त्यांत **विष्णुशास्त्री चिपळूणकर** यांनीं संगीत नाटकासंबंधानें अगदीं निप्पक्षपातानें विवेचन करून **किर्लोस्करांनीं** महाकवीच्या कृतीचा उद्धार केल्याबद्दल त्याची किती योग्य स्तुति केली आहे, ती वाचण्यासारखी आहे:

" ही नवीन टूम रा. किर्लोस्कर यांनीं गेल्या ( १८८० ) सालीं काढली. हे गृहस्थ रेविन्यू कमिशनरच्या आफिसांत नौकर आहेत; यास्तव तें आफिस बरसातीकरितां पुण्यांत आलें असतां त्या चातुर्मास्यांत रंगदेवतेची उपासना करून पुण्यजनमनोरंजन वर्षांतून एकदां करावें हा त्यांनीं संकल्प केलेला आहे. यांस नाट्याचा व

काव्यरचनेचा पहिल्यापासून नाद आहे म्हणून ऐकतों. "शाङ्करदिग्विजय" या नांवाचें एक नाटकही यांनीं महाराष्ट्र भाषेंत निर्माण केलें आहे. तेव्हां या सर्व गोष्टींवरून 'संगीताचे' कर्ते रसिकांत मोडण्यासारखे आहेत हें उघड दिसतें. यास्तव स्वतःची हौस फेडून लोकांसही चार घटका उत्तम रीतीची करमणूक करण्याचा संकल्प नाट्याचार्यांनें केला हें सहजच आहे. आतां जो सरकारी नोकर आहे त्यानें नित्याची श्ववृत्ति आटपल्यावर घरीं जाऊन हात जोडून स्वस्थ बसावें. कांहीं इतर कामधंदा त्यास करतां कामा नये, हें अलीकडे जें बादशाही सूत्र निघालें आहे त्यास नाट्यकर्म हें कितपतसें विरुद्ध येईल हा विचार निराळा; पण एरव्हीं सामान्य समजुतीस अनुसरून पाहतां आह्मांस तर असें वाटतें कीं, राजकार्याच्या व्यतिरिक्त वेळांत वरिष्ठांच्या घरांचे उंबरठे पुजणें किंवा रिकाम्या चकाट्या पिटींत बसणें यापेक्षां रा. किर्लोस्करांनीं केलेला कालक्षेप फार उत्तम होय. खिस्ती धर्मांत जशी आदितवारीं कोणतेंही काम करण्याची सक्त मनाई आहे त्याप्रमाणेंच राजसेवानिरतांस नेहमींचा प्रतिबंध आहे खरा; व यासंबंधानें कांहीं परोपकारी मंडळींनीं कमिशनर साहेबांपर्यंत वरील भरतपुत्रांचा बोभाटा नेल्याचें ऐकिवांत आहे; तरी एकंदर लोकांच्या तर्फे नवीन टूम काढल्याबद्दल रा. किर्लोस्करांचे आभार मानल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. इंग्लंडांत 'ऑपरा' या नांवाचा एक नाट्यप्रकार आहे, त्याचाच नमुना हा वरील गृहस्थानें इकडे सुरू केला असें म्हणावयास हरकत नाहीं. त्याचा मासला आजपर्यंत एका पारशी खेळांत मात्र दृष्टीस पडत असे. पण त्याहून हल्लीं सुरू झालेलें संगीत किती उत्तम आहे हें दोन्ही चिजा ज्यानें पाहिल्या असतील त्यास सांगावयास नकोच. एक तर पारशी मंडळीचा एकच एक सूर कंटाळवाणा, तसें इकडे नाहीं; शिवाय त्यांच्या संविधानकांत व नाट्यांत व इकडल्या दोहोंत तर अतिशयच फरक! तेव्हां संगीत शाकुंतलाची पहिली जी तारीफ करावयाची ती एवढ्याकरितां कीं, हा निराळा प्रघात आमच्यांत सुरू झाला. गायन हें मनुष्यमात्रास किंबहुना पशुकोटींतील कित्येकांसही स्वभावतःच अत्यंत प्रिय आहे; यास्तव त्याच्या द्वारें मनोरंजनाची प्रवृत्ति पडणें हें किती इष्ट होय हें सांगावयाला नकोच. दुराचार व ग्राम्यता यांच्या मूर्ति ज्या वेश्या त्यांच्या खेरीज वरील चित्तरंजनाचा प्रकार जर उपलब्ध होऊं लागला तर ही थोडी सुधारणा नव्हे. यास्तव येथें आज कित्येक वर्षें एक गायनसमाज निघाला असून त्याच्या द्वारें ज्या प्रकारची नवी गोष्ट अमलांत येणार आहे त्यासारखेंच संगीताचेंही पर्यवसान असल्यामुळें त्याचें आह्मीं अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों......

रा. किर्लोस्कर यांच्या संगीतांतला दुसरा गुण म्हटला म्हणजे त्यांतील गायनप्रकार. रा. किर्लोस्कर यांनीं दोन गवय्ये मुख्य पात्रांत घेतल्यामुळें त्यांच्या प्रयोगांस फार यश आलें. पूर्वी कोणत्याही नाटकावर लोकांच्या इतक्या उड्या पडल्या नाहींत; व नवीन चाली लोकांस अत्यंत प्रियकर होऊन सदरील नाटकाची एक हजाराची

प्रत सुद्धां उडून गेली. तर पात्रांच्या यथायोग्य निवडणुकीमुळें प्रस्तुत प्रयोग हा लोकांस फार मनोहर होऊन गेला.

तिसरा गुण नाटकाचा यथास्थित अभिनय हा होय. हा अभिनय सर्व पात्रांचा यथोचित होणें हें मोठें कठीण असतें. तरी प्रकृत प्रयोगांत केवल दोष ठेवण्यासारखें एकही पात्र नसून कांहीं तर चांगलींच होतीं. दुष्यंत, शकुंतला, भरत, कण्व, शार्ङ्गरव या पात्रांचीं कामें खरोखर वर्णनीय होत. तीं पाहूनही जो तटस्थ राहिला असेल व ज्यास कांहींच आनंद झाला नसेल, त्या प्रेक्षकाची धन्य म्हटल्यावांचून राहवत नाहीं. ' स वै मुक्तोऽथवा पशुः ' हा चरण वरील वहाद्दरांस लागू करण्यास आह्मांस बिलकुल हरकत दिसत नाहीं ! आतां हें खरें आहे कीं, रा किर्लोस्कर यांनीं केलेलें भाषांतर छापील पुस्तकावरूनच जर वाचलें तर कितपत गोड लागेल हें आमच्यानें सांगवत नाहीं व कांहीं ठिकाणीं तर शब्दसौष्ठवांत जी त्यांची उणीव आहे ती ऐकल्याबरोबरही उमगण्यासारखी आहे. तरी त्यांच्या तर्फेनें येवढें खास म्हणतां येईल कीं मूळ महाकवीच्या कृतीवरून होणारा जो आल्हाद तो सदरील प्रयोगावरूनही बऱ्याच प्रकारें होतो, व साऱ्या जगास मोहून टाकणारी जी कविकुलगुरूची करामत तिचें चीजही वरील प्रयोगकारांनीं बरेंच केलें ! " [१८८१.]

**अण्णांनीं** या वर्षीं शाकुंतल नाटक पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें. शाकुंतल नाटकाचें खरें मर्म त्यांस त्यांच्या तीर्थरूपापासून कळलें होतें ह्मणून त्यांनीं तें पुस्तक पितृभक्तिपुरस्सर आपल्या वडलांसच अर्पण केलें. हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानें मराठी ग्रंथसंग्रहांत एका उत्तम ग्रंथाची भर पडली व सुशिक्षित स्त्रीवर्गाला गाण्यावाचण्याच्या कामांत साहाय्य करण्याला एक साधन मिळालें.

---

## पुणें शहरचें गटारयंत्र.

**बुधवार पेठेंतील भांग्या** मारुतीपासून कोतवालचावडीपर्यंत सुमारें २५ फूट रुंद व २५० फूट लांब असा जो दुतर्फा रस्त्याचा भाग त्याला "गटारयंत्र" ही संज्ञा आहे. गटारयंत्राची कशी व केव्हां स्थापना झाली, याबद्दलचा इतिहास सांगणारीं जुनीं माणसें आतां फारशीं कोणी सांपडण्याचा संभव नाहीं, परंतु पेशवाईपासून इचें अस्तित्व असलें पाहिजे असें वाटतें. **बुधवार** पेठ ही **पुणें** शहरांत प्रमुख पेठ असून अनेक गोष्टींनीं करमणुकीची जागा आहे. या रस्त्यानें दिवसांतून एकवार

तरी गेलीं नाहींत अशीं माणसें शहरांत फार थोडीं सांपडतील. हल्लीं या पेठेंत सर्व प्रकारच्या दुकानांची खिचडी झाली आहे. परंतु पूर्वीं स्टेशनरी सामानाचीं व सुगंधी लोकांचींच दुकानें फार असत. त्यामुळें या दुकानीं, वाण्याउदम्याच्या दुकानासारखी गर्दी नसून शिळोप्याच्या गप्पा सांगणारे, कचेरींतून विश्रांतीकरतां येणारे, भटभिक्षूक, रिकामे व निरुद्योगी लोकांचाच विशेष अड्डा असे. शिवाय दुकानापुढच्या गटारावर आचारी, पाणीवाले व खटपटी वगैरे लोकांची बसण्याची फार दिवसांची वहिवाट आहे. प्रत्येक दुकानदाराचीं जशीं ठरीव गिऱ्हाइकें असतात तशी प्रत्येक दुकानदाराची बैठकीची ठरीव मंडळी असत. अशा भिन्न भिन्न प्रकारच्या मंडळीची संध्याकाळची करमणूक म्हणजे लोकांच्या रिकाम्या उठाठेवी, निंदा, बाजारच्या काल्पनिक व ज्यांना आधार नाहीं, अशा अघळपघळ गप्पा यांत असावयाची. अशा तऱ्हेच्या गप्पा झोंकण्याच्या स्वतंत्र जागा आमच्या इकडे कोणत्याही शहरांत आढळून येत नाहींत; परंतु इंग्लंडासारख्या विशेष सुधारलेल्या देशांतून खेड्यापाड्यांनीं सुद्धां जीं "विश्रांतिगृहें" (inns) व "पानगृहें" (alehouses) असतात, त्यांत प्रवासी व इतर लोक जमले कीं, चिरूटाच्या झुरक्याखालीं व दारूच्या पेल्याच्या नादांत पाहिजे त्या गप्पा चालतात;* मग या गप्पांत कोणत्या गोष्टीशीं कोणता बादरायण संबंध येईल याचा नियम नाहीं. आमच्याकडे सरकारच्या " पोलिटिकल " खात्यांत जशी हजारों प्रकारची माहिती सांचलेली असते, त्याप्रमाणें या गटारयंत्रावरील बखारींत अनेक प्रकारच्या बातमीचा ताजा सांठा असतो, इतकेंच नव्हे, तर केव्हां केव्हां " कामदारांच्या नेमणुका व बदल्या " सुद्धां या कारखान्यांतून होतात. हें गटारयंत्र बंद करण्याचा प्रयत्न कांहीं वर्षांपूर्वीं पोलिसांनी केला होता असें दिसतें. ज्ञानप्रकाशपत्रांत याबद्दल एक लेख आला होता, तो असाः

---

* या ( Inns ) व ( Alehouses ) विश्रांति व पानगृहांचीं वर्णनें इंग्रजी कादंबऱ्यांतून पुष्कळ वेळा आढळतात. आपल्याही गटारयंत्राचें वर्णन, कीर्तने यांच्या " थोरले माधवराव " व इतर कांहीं नाटकांत केलेलें आढळतें.

" येथील बुधवार पेठेंतील गटारावर संध्याकाळीं बसण्याची भिक्षुकांची वगैरे पुष्कळ दिवस चाल चालत आहे. पेशवाईपासून गटारयंत्राची प्रसिद्धि आहे. तें गटारयंत्र मोडण्याचा आमच्या पोलीस अधिकाऱ्यांनीं आतां इरादा केला आहे असें दिसतें. भिक्षूक संध्याकाळीं गटारावर येऊं लागले पुरे कीं, पोलीसचे शिपायी त्यांस शेळ्यांप्रमाणें हुसकून देऊं लागतात. त्यांस तेथें उभें देखील राहूं देत नाहींत. मग बसणें कोठून ! हें पोलीसचे अधिकारी कशाकरितां करतात हें समजत नाहीं. आतां हें खरें कीं, रस्त्यांत गटारावर बसणें व तेथें मांड्या ठोकून वाता मारणें हें सुरेख दिसतें असें नाहीं; परंतु तें वाईट दिसलें तरी सरकारानें त्यांत हात घालण्याची तादृश गरज आहे असें नाहीं. आतां मुंबईसारख्या ठिकाणीं जेथें रस्त्यांतून गाड्यांची गर्दी असते, तेथें पायांनीं चालणाऱ्या लोकांच्या सोईकरतां गटारें मोकळीं ठेवावीं हें ठीकच. परंतु येथें दरएक रस्त्यांतून एक घटकेसही एक गाडी चालण्याची मारामार तेथें असा प्रतिबंध करून लोकांस पीडा करण्यांत कांहीं फायदा आहे असें आम्हांस वाटत नाहीं. कदाचित् असें करण्यांत येथील अधिकाऱ्यांचा दुसरा कांहीं हेतु असेल, परंतु तें समजेपर्यंत त्याविषयीं आम्हांस कांहीं बोलतां येत नाहीं. याकरितां प्रतिबंध करण्याचें कारण काय हें पोलिसचे अधिकारी, लोकांस कळवितील तर फार चांगलें होईल." [ १८६५. ]

या लेखावरून शहरच्या लोकांना या गटारापासून कांहीं तरी उपाधि पोंचत असली पाहिजे हें उघड होतें. ज्ञानप्रकाशपत्रांतच आणखी एकवार " अवश्य वाचा " या सदराखालीं एकाचा लेख प्रसिद्ध झाला होता, त्यांत गटारयंत्रासंबंधाचा उल्लेख केला आहे. तो वाचला असतां येथें कशा प्रकारच्या गप्पा चालत असत तें कळून येतें.

" आणखी एक पोटकारखाना मजकडे अमलांत घेईन ! तो कोणता म्हणाल तर गटारयंत्र बुधवारपेठ. कोणती कोणती गोष्ट खरी अगर खोटी रोज संध्याकाळीं तेथून गांवांत पसरते. कालेजांत ब्राह्मणास काढलें कीं, तेथील विद्यार्थी ओंवळ्यानें भोजन घेतात व अनाचार करतात हें शंकराचार्यांस तो स्वयंपाकी सांगेल म्हणून काढला, अशी खरी गप्प गांवांत पसरते. सैन्यांतील शिपायी लोकांच्या कसरती झाल्या कीं, लढाईची तयारी ही कंडी गांवांत उठते. नानातऱ्हेच्या मनःपूर्वक कल्पित गप्पा अनर्थकारक गांवांत तेव्हांच पसरतात. व घोंटाळा होतो. जशी आग भरदिशीं या टोंकापासून त्या टोंकापर्यंत पसरते तशी या गटारयंत्रांतील गप्पांची गति या दुष्ट व अनर्थकारक गोष्टींचा मी बंदोबस्त करीन. माझ्या सल्याशिवाय या टंकसाळेंत गप्पा निघूं नयेत व खऱ्या गोष्टी निघून प्रसृत व्हाव्या अशी मी तजवीज ठेवीन." [१३।१०।७३.]

**किर्लोस्कर** मंडळीबद्दलही नालस्तीच्या गप्पा दुसऱ्या वर्षी या गटारांतून बऱ्याच सुरू झाल्या होत्या. एखादी संस्था भरभराटीला आली ह्मणजे तिच्याकडे दोषैकदृष्टीनें पाहणारे असावयाचेच. तोच प्रकार सदर मंडळीसंबंधानें झाला. **मुंबईस** मंडळीचे खेळ चालले असतांना मागें सांगितलेले **ह्यूएट** साहेब यांनीं मंडळींतील चार पांच प्रमुख पात्रांस कांहीं पोषाख व घड्याळें प्रसिद्धपणें बक्षीस दिलीं होतीं. परंतु त्यांचा विपर्यास **पुण्या**चे लोकांत कशा प्रकारें झाला व त्याचें रूपांतर त्या वेळीं, लोकांची हुरमत घेणारें एक वर्तमानपत्र **पुण्यांत** निघत असे त्यांत कसें आलें, हें पुढें त्यांतून जो उतारा घेतला आहे त्यावरून चांगलें कळण्यासारखें आहे.

पुणें वैभव ता. २३ आक्टो. ८१.

" संगीत शाकुंतल नाटकवाल्या मंडळींपैकीं कांहीं पात्रांस मे. ज. ह्यूएट साहेबांनीं बक्षीस दिलें याबद्दल येथील ज्ञानचक्षूनें लिहिलें आहे कीं, " मेजर जनरल ह्यूएट हे खेळ पाहण्यास आले होते. मे. ज. ह्यूएट साहेबास रा. रा. अण्णासाहेब किर्लोस्कर यांणीं संगीत शाकुंतल नाटकाचें पुस्तक नजर केलें, तें त्यांस फार आवडल्यामुळें गेले शनिवारीं मे. ह्यूएट साहेबांनीं रा. रा. अण्णासाहेब किर्लोस्कर यांस सुमारें १०० रुपये किमतीची शालजोडी बक्षीस दिली. शकुंतलेचा पार्ट करणाऱ्या पात्रास ह्यूएट साहेबांनीं ८ तोळ्यांचें सोन्याचें कडें व एक घड्याळ त्यावर त्याच्या नांवापुढें शकुंतला अशीं अक्षरें खोदून बंगल्यावर खाजगी रीतीनें बक्षीस दिल्याचें समजतें. ही त्या पात्रावर साहेबांची स्पेशल फेवर समजली पाहिजे. " यावरून वरील साहेब नाटकाचे मोठे शोकी असून हा आंवट शोक ते द्रव्यद्वारा पुरा करून घेत आहेत हें उघडच आहे. अति द्रव्याचा परिणाम चैनबाजी हा जो आमचा सिद्धांत इंग्रजी लोकांस कालांतरानें लागू पडेल असें जें आमचें ह्मणणें तें या साहेबांनीं खरें करून दाखविण्याचा प्रसंग लवकरच आणला हें पाहून आह्मांस फार आनंद होतो. आतां मे. ज. ह्यूएट साहेब आमच्या नाटकाचे किती मार्मिक आहेत हें त्यांच्या प्रियपात्राच्या निवडणुकीवरून सहज दिसून आलें. या नाटकांतील आमची शकुंतला दिसण्यांत मात्र सुबक होती, पण संगीत शाकुंतल नाटकाची करामत तिच्या अंगीं बिलकुल नव्हती हें पाहिजे तो मनुष्य कबूल करील. पण साहेबांस काय ? ते तिच्या सुरेखपणावर भुलले ! हा जो त्यांनीं शकुंतलेच्या पात्रास दौलतजादा केला तो दुसऱ्या एकाद्या गुणी पात्रास केला असता तर साहेबांचा मार्मिकपणा तरी लोकांच्या समजुतीस आला असता. शकुंतलेचें पात्र साहेबांच्या बंगल्यावर गेल्यास साहेब खुष होऊन त्यास दर खेपेस २५ रुपये देत असत हें

निराळेंच ? आतां हें पात्र साहेबांच्या भेटीस शकुंतलेच्या पोषाखानें जातें किंवा पुरुषाच्या पोषाखानें जातें हें आमच्या बंधूंनीं स्पष्ट करून दाखविलें नाहीं हें बरें नव्हे. असो, साहेबलोकांची वहाल मर्जी करून घेण्यास या संगीत शकुंतलेनीं किंवा मुख्यत्वेंकरून शकुंतलेच्या पात्रानें आमच्या सर्व लोकांस एक रस्ता दाखविला याबद्दल लोकांनीं आभारच मानले पाहिजेत.* "

**किर्लोस्कर** मंडळीचीं पात्रें "दारू घेतल्यावांचून स्टेजवर येत नाहींत.†" "अमुक एक मुलगा बायकोचें सोंग घेऊन अमक्याच्या येथें हळदीकुंकूं घेऊन आला." इत्यादि खोडसाळ व असंभवनीय, परंतु क्षुद्र लोकांच्या कानांला बऱ्या वाटणाऱ्या गप्पा गटारांतून त्या वेळीं पसरत असत. मद्यपानाचें व्यसन त्या वेळीं लोकांत चांगलें फैलावत चाललें होतें. तें—उदाहरणार्थ—एका वर्गांतच होतें व दुसऱ्या वर्गांत नव्हतें, किंवा **मुंबईस** होतें व **पुण्यास** नव्हतें असा प्रकार नव्हता. तेव्हां **किर्लोस्कर** मंडळीविषयीं नालस्ती पिकविण्यांत कांहीं विशिष्ट हेतु साध्य होण्यासारखा होता असा प्रकार नाहीं. परंतु गटार व मद्य यांचा पुष्कळच कार्यकारण संबंध आहे, त्यामुळें पहिल्यांतून उद्भवणाऱ्या गोष्टी मद्यप्यांच्या तोंडून निघाल्याप्रमाणें असंबद्ध असतात यांत नवल नाहीं. **शेक्सपीयरनें** ह्मटलें आहे कीं:

"Trifles light, as air, are to the jealous confirmations strong as proofs of holy writ."

ह्मणजे मत्सरी लोकांना अगदीं क्षुल्लक गोष्टीही बलवत्तर पुराव्यासारख्या वाटतात; किंवा लोकांना संतुष्ट करण्यासारखा एकही गुण अंगीं नसणारे क्षुद्र लोक दुसऱ्याचे दोष काढून लोकांचें रंजन कसें क-

---

* सदर पत्राचे कर्ते हल्लीं मयत आहेत व त्यांचें पत्रही दुर्दैवानें नामशेष झालें आहे. हें पत्र एकेकाळीं लोकांची अशाच प्रकारची नालस्ती करण्यानें भरभराटीस आलें होतें.

† अशा तऱ्हेचा बरेच ठिकाणीं ग्रह होता. एके प्रसंगीं कोल्हापूरच्या एका विद्वान् गृहस्थांचा डाक्टर अण्णा मोरेश्वर कुंटे यांच्याशीं याचबद्दल वाद झाला. तेव्हां डाक्टर कुंट्यांनीं अकस्मात नाटकाचे दिवशीं रंगाच्या पडद्यांत येऊन मोरोबा, भाऊराव इत्यादिकांना हाक मारून प्रत्येकाकडून आपल्या तोंडाचा वास सदर गृहस्थांस देवविला. त्यावेळीं आपण ऐकलेल्या या "गटारगप्पा" आहेत अशी त्यांची खात्री झाली.

रतात याबद्दल पुढील सुभाषित प्रकृत विषयास बरोबर लागू पडतें:

" परितोषयिता न कश्चन ।
स्वगतो यस्य गुणोऽस्ति देहिनः ।
परदोषकथाभिरल्पकः ।
स्वजनं तोषयितुं किलेच्छति. "

माघ काव्य.

---

## सन १८८२ साल.

**अण्णा**साहेब पुन्हां स्वारीबरोबर १८८१ च्या नोव्हेंबरमध्यें फिरावयास गेले. इकडे **मोरोबां**ना वाख्याचा उपद्रव होऊन त्यांच्यावर मोठें गंडांतर आलें होतें. एकदोन वेळां तर त्यांच्या मृत्यूची शहरांत व बाहेरगांवीं अफवा उठली होती; परंतु संगीताचा अधिक अधिक उत्कर्ष व लोकांचें रंजन अद्याप व्हावयाचें होतें, ह्मणून सुदैवानें ते त्यांतून बरे झाले.

या वर्षीं **पुणें** शहरांत दोनतीन महत्वाच्या गोष्टी घडून आल्या. एक **कोल्हापूर**च्या माजी महाराजासंबंधानें **बर्वे** प्रकरण उपस्थित होऊन त्यांत **पुण्यां**तील दोन विद्वान् व परोपकारी प्रसिद्ध पुरुषांस कारागृहवास भोगणें पडला ही होय. त्यांच्या बंधविमोचनार्थ देशांतून चोहोंकडून द्रव्यद्वारा साहाय्य मिळालें होतें. **अण्णा**साहेब स्वारी फिरून आल्यावर **किर्लोस्कर मंडळीनें**ही शाकुंतल नाटकाचा एक प्रयोग करून सुमारें चारशें रुपये या सार्वजनिक कार्यास दिलें.

याच वर्षीं विद्याखात्यांत सुधारणा करण्यासंबंधानें चौकशी करण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें नेमलेलें कमिशन **पुण्यां**त बसलें होतें, व त्याचे अध्यक्ष **सर वुईल्यम हंटर** हे होते. हे साहेब फार विद्वान् असत. कमिशन आटपल्यावर शहरच्या वतीनें त्यांचा सन्मान करण्याकरितां **सार्वजनिक सभेनें किर्लोस्कर मंडळी**कडून शाकुंतल नाटकाचा ३–४–५ अंकांचा प्रयोग करविला. या प्रसंगास **पुण्यां**तील सरदार, सभ्य गृहस्थ, बडेबडे कामदार, **लीवार्नर, जेकब** इत्यादि वि-

ह्याखात्याचे युरोपियन अधिकारी, कधीं नाटक न पाहणारे **महादेव गोविंद रानडे** इत्यादि बडी बडी आमंत्रित मंडळी हजर होती. प्रयोग संपल्यावर **गंगाराम भाऊ म्हसके** वकील यांनीं आपल्या नेहमींच्या गोड भाषेनें इंग्रजींत शहरच्या वतीनें **पुण्यां**त आगमनाचा लाभ दिल्याबद्दल साहेबबहादुराचे व प्रयोग करून दाखविल्याबद्दल **किर्लोस्कर** मंडळीचे आभार मानले. साहेबांनींही उलट **पुणें**करांचे व **किर्लोस्कर मंडळी**चे मनःपूर्वक आभार मानले. या कामीं त्या वेळचे सार्वजनिक सभेचे हुशार व तरतरीत सेक्रेटरी **सिताराम हरी चिपळूणकर** यांनीं फार श्रम घेतले होते. सदर साहेबांनीं **किर्लोस्कर मंडळी**चें स्मरण आपल्या जवळ असावें ह्मणून शांकुंतल नाटकांतील चौथ्या अंकांत शकुंतला कण्वाचा आशीर्वाद घेत आहे, व पांचव्या अंकांत ती राजाकडे गेल्यावर त्यानें तिला ओळख दिली नाहीं ह्मणून त्याची निर्भत्सना करीत आहे या दोन प्रवेशांचे मुद्दाम फोटो काढवून बरोबर नेले.

**पुणें**शहरांतील नाटकगृहांत माणसें बसण्यासंबंधानें या वर्षांत एक नवीन नियम अमलांत आला. या शहरांत त्या वेळीं आनंदोद्भव, पूर्णानंद व आर्यभूषण अशीं तीन नाटकगृहें होतीं. परंतु नाटकगृह या दृष्टीनें लोकांच्या किंवा नाटकमंडळीच्या सोयीचें, उपयोगी व दिसण्यांत सुशोभित असें एकही नव्हतें व अद्यापही नाहीं. **किर्लोस्कर** मंडळीच्या नाटकाला जी अतिशय लोकांची दाटी जमत असे ती वरील नियमानें कमी करून टाकून या सर्व सोयी अमलांत आणल्याचें श्रेय आलें. **पुण्यां**त त्या वेळीं कांहीं उपद्व्यापी पुरुष होते. त्यांना कांहीं अधिकाराचाही जोर होता. **किर्लोस्करा**च्या नाटकाला फुकट प्रवेश होण्याला त्यांना पुष्कळ अडचणी येत असत, त्यामुळें त्यांनाच तेवढा या नियमापासून आनंद झाला असेल. इतर लोकांना हा नियम फारसा बाधक झाला नाहीं. ते आजचें नाटक दुसऱ्या खेपेस पाहत इतकेंच. **पुण्या**पेक्षां **मुंबई**स पुष्कळ नाटकगृहें आहेत व तेथेंही लोकांची दाटी पुष्कळ जमते; परंतु **पुण्या**चीं नाटकगृहें ज्या तऱ्हेच्या नियमांनीं जखडलीं आहेत तसे नियम **मुंबई**स मुळींच नाहींत, तरी पण तेथील लोकांचें स्वास्थ्य व आरोग्य कायम आहे. **पुण्या**च्या नाटकगृहांत लोकसमाज मर्यादीत जमावा याबद्दल कदाचित् आणखी कांहीं

कारणें असतील; परंतु किर्लोस्कर मंडळीचे नाटकप्रयोग पाहण्याबद्दल लोकांच्या मनाची घेत असलेली ओढ कमी करण्याचाही कांहीं मंडळीचा दुष्ट हेतु त्या वेळीं कारण झाला.

**किर्लोस्कर** मंडळींत यावेळीं एक मोठा अपघात झाला. **केशवराव गोविंद शुक्ल** हे शुक्रवार पेठेंतील **बाळवेकराच्या** हवेलींत मंडळीचे बिऱ्हाडीं होते तेथून तिसऱ्या मजल्यावरून पडून मृत्यु पावले. हे गृहस्थ आरंभापासून मंडळींत असून सूताचें व विदूषकाचें काम करीत असत. मंडळींत प्रथम जे सरकारी नोकर होते त्यांपैकीं शेवटपर्यंत **अण्णा**साहेब व हेच राहिले होते. हा गृहस्थ मोठा विनोदी, थट्टेखोर व सर्वांस हवासा होता, यांच्या चौकसखोर स्वभावावरून यांस पुण्यांत " फौजदार " ह्मणून ह्मणत असत. हे " एक्झीक्युटीव इंजिनियर, पुणें व खडकी " या कचेरींत नोकर असून त्यांस पन्नास रुपये पगार होता. यांच्या मृत्यूनें मंडळींतील एक करमणूक नाहींशी झाली. हा अपघात ता. २० सपटंबर रोजीं झाला.

येथपर्यंत मंडळी संबंधाच्या ठोकळ ठोकळ गोष्टी झाल्या. येथून ज्यांच्या योगानें **किर्लोस्करांच्या** नांवाला व मंडळीला चिरस्थायित्व येण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं, अशा महत्त्वाच्या गोष्टी पुढें झाल्या आहेत. त्यांपैकीं **किर्लोस्करांनीं** एका नवीन नाटकाची रचना करण्यास सुरुवात केली, ही एक; व अद्वितीय असें एक संगीत पात्र त्यांनीं मिळविलें ही दुसरी होय. **पुणें मुंबई** शहरांतून संगीताची अभिरुचि आतां सर्वत्र उत्पन्न झाली होती. परंतु आपली कृति आतां शहरोशहरीं दाखवावी, चोहोंकडे कीर्ति करावी, पैशाचे ढीग पाडावे, या उंच उंच कल्पना **अण्णा**साहेबांच्या अंतःकरणांत भराऱ्या मारूं लागल्याः

" कोठवरी स्तवूं सांग पामरा नरा
परवशता तिखट सुरी लागली उरा. "

हीं वाक्यें त्यांच्या मनांत घोळूं लागलीं. नोकरीवर अकरा वाजल्यापासून पांच वाजेपर्यंत बसून तेथें त्यांच्या शरीराची यांत्रिक क्रिया होत असे. परंतु खरें चिंतन नाटकाचें असें. रसिक लोक

" कालीदास मुख कवि कृति पक्कान्नातें सेवुनि विटले "

होते असा जरी प्रकार नव्हता तरी—त्यांच्या



बापूसाहेब किर्लोस्कर यांचा मुलगा कृष्णा.     अण्णासाहेब व पत्नि सावित्रीबाई.

चि० शा० प्रेस, पुणें.

"पुनर्बुभुक्षा करणी तिखट"

ह्मणून रुचिवैचित्र्याकरितां नवी कृति अवश्य पाहिजे होती. **अण्णानीं** अनुकूल असलेल्या मंडळीकडे पाहून नवीन नाटकरचनेस स्वारींतच सुरुवात केली होती व **पुण्यास** आल्यावर त्या नाटकाच्या तालमीही मधून मधून चालत असत. शाकुंतल नाटकांतील स्त्री पात्राचीं कामें आजपर्यंत साध्या पात्राकडून करविण्यांत आलीं. आतां नवीन नाटकांत गायक स्त्रीपात्रें असणें अवश्य होतें, ह्मणून त्याकरतां शोध चालले होते. परंतु **अण्णा साहेबांनीं** नवीन नाटक रचण्यास सुरुवात करण्यापूर्वीच ईश्वरानें त्यांतील एक प्रमुख पात्र किती तरी दिवस अगोदर निर्माण करून त्यांच्याः

**"कन्येपूर्वी तिच्या पतीतें विधि निपजवितो भार्ये**
**ईशाज्ञेविण कांहीं न होतीं सृष्टींतिल तीं कार्यें**
**म्हणुनी स्वस्थ रहा। विधि घटनेची वाट पहा॥"**

या पद्यास सत्यता आणली होती.

शोध करतां करतां **बडोद्यास** एका हरदासाचीं दोन देखणीं व गाणारीं मुलें आहेत असें कळलें. त्याबरोबर **मोरोबा** तिकडे जाऊन तीं मुलें समक्ष पाहून आले. मुलें अप्रतिम आहेत असें त्यांनीं सांगितलें. पुढें त्या मुलांपैकीं थोरल्यास बोलावून आणलें. हीं मुलें श्रीमंत नव्हतीं तरी बालबोध घराण्यांतलीं, वडिलांच्या कथेवर व स्वतःच्या नोकरीवर खाऊन पिऊन सुखी असत. वडील वृद्ध असून अगदीं जुन्या समजुतीचे असत तरी कालमानाप्रमाणें मुलांच्या कलानें चालत.

**अण्णासाहेबांना** एकदां प्रत्यक्ष पाहिल्यावर व त्यांच्याशीं दोन गोष्टी झाल्यावर कसल्याही मनुष्याला त्यांचा शब्द मोडण्याचें धैर्य होत नसे. हा त्यांचा स्वाभाविक गुण होता. त्यांनीं थोरल्या मुलास ह्मणजे **अप्पाराव** यांस काय सांगितलें असेल याची कल्पना **अप्पाराव** यांचें **बडोद्यास** गेल्यावर जें पत्र आलें त्यावरूनच होईलः

वडोदें ता. १२।९।८२

"रा. रा. अण्णासाहेब

कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति. तारीख मजकूर पावेतों उत्तम. पत्र पावलें मा. समजला. इकडील मा. रा. रा. मोरोबा गेल्यानंतर दोन दिवसांनीं वडिलांची

मोकळीक मोठ्या मिनतवारीनें घेतली. ती बंधूकरतां. तेव्हां येत्या गुरुवारीं अगर शुक्रवारीं चिरंजीव रा. भाऊची रवानगी येथून करतों. माझेबद्दल मा। तोंडजवानी भाऊ सांगतां कळेलच......माल स्टेशनवर कोणी मनुष्य पाठविणें. कारण तो कोठें गेला नाहीं. याजकरितां लिहिलें. माझा बंधु तोच आपला समजून त्याजबद्दल सर्व-स्वीं काळजी बाळगणें हें आपल्यासारख्या लोकप्रिय मित्राकडे आहे. सुज्ञास विशेष लिहीत नाहीं. कळावें लोभांत अंतर नसावें.

आपला,

**रामचंद्र बापूजी.**

" ता। हेच पत्रीं रा. रा. मोरोबा यांस भाऊचा व माझा सा० नमस्कार. शनिवारीं रात्रौ निघेल. याचें कारण गणेश ४ र्थी ते दिवशीं आहे म्हणून लिहिलें. सारांश इतकाच कीं, खचित आमच्या बंधूस आपले कंपनीमध्यें तूर्त पाठविण्याचा बेत झाला आहे. कळावें.

**रामचंद्र.**"

त्याप्रमाणें ता० २२ सपटंबर रोजीं **भाऊ** नांवाचा एक मुलगा **मुंबईस** येऊन दाखल झाला. हाच मुलगा पुढें **"भाऊराव कोल्हटकर"** या नांवानें प्रसिद्ध झाला. तो इतिहास त्यांच्या चरित्रांत निराळा प्रसिद्ध आहेच.

या वेळेला **किर्लोस्कर मंडळी पुण्यांत**ले खेळ आटपून **मुंबईस** आली होती. मंडळीची येथें ही तिसरी खेप होय. मुंबईतले सर्वांत उत्तम असें **गेयटी** नाटकगृह मंडळीनें घेतलें होतें. येथील नेहमींची विद्वान् मंडळी साह्य करण्यास असत. लोकांचीही मंडळीवरील भक्ति अणुमात्र कमी झाली नव्हती. नाटकगृहांत लोकांच्या उड्यांवर उड्या पडत असत. एका शाकुंतल नाटकाच्या प्रयोगानें तीन वर्षें सारखी मंडळी झुलविली, असा नाटकाच्या इतिहासांत आमच्याकडे हा अपूर्व प्रकार झाला. **भाऊराव**सारखें मनाजोगें पात्र मिळाल्यानें **अण्णां**चे अंतःकरणाला अधिक उभारी आली व त्यांनीं पहिलें काम हें केलें कीं, सहा महिन्यांची रजा घेतली.

**मुंबईहून अण्णां**स मंडळीसुद्धां **बडोद्या**चे महाराजांनीं बोलावून नेऊन एक खेळ करविला. त्या वेळीं हे महाराज नुकतेच गादीवर आले होते. यांच्या विद्याव्यासंगाची व हुशारीची सर्वत्र ख्याती ऐकूं येत होती. त्यामुळें यांच्या दर्शनाचा अकल्पित योग आल्यामुळें मंडळीस

साहजिक आनंद झाला. **अण्णा**साहेबांना महाराजांच्या भेटीचा योग सांपडला. गांवांतही दोन खेळ झाले. सुमारें १६०० रुपयांची प्राप्ति झाली. संस्थानच्या पदरची **मौलाबक्ष, नासरखा**, भांडाचीं मुलें इत्यादि गाणें, वाजविणें, नाचणें वगैरे कसबांतील गुणी लोक ऐकावयास व पहावयास मिळाले, व मंडळी **पुण्या**स परत आली. ही गोष्ट आक्टोबरमध्यें घडली.

---

## संगीत सौभद्र.

शाकुंतल नाटकाच्या उपरांत नवीन नाटक रचण्याचें ठरलें. त्या वेळीं निरनिराळे कथाभाग **अण्णासाहेबां**च्या मनांत उभे राहिले. प्राचीन कवींचीं पुष्कळ नाटकें होतीं. परंतु तीं कांहीं पात्रांच्या अनुकूलते प्रतिकूलतेमुळें व कांहीं प्रयोगदृष्ट्या स्वभावतःच अनुपयोगी वाटल्यावरून पुराणांतील एखाद्या भागावर नाटक रचण्याचा त्यांनीं संकल्प केला. त्याप्रमाणें " अर्जुनसुभद्राविवाह " हा कथाभाग त्यांस योग्य वाटला. तेंच हें "संगीत सौभद्र" नाटक होय. महाराष्ट्र ग्रंथसंग्रहांत हें नाटक प्रयोगदृष्ट्या व ग्रंथदृष्ट्या उत्तमांत गणलें जात आहे. व या नाटकाची इतकी थोरवी व्हावयास **अण्णासाहेबां**ची कवित्वशक्ति व कल्पनाशक्ति जितकी कारण झाली तितकीच त्यांतील त्या वेळेचीं नाटकपात्रेंही कारण झालीं आहेत. शिवाय **अण्णासाहेब** स्वतः उत्तम नट असल्या कारणानें नाटकाची रचना प्रयोगदृष्ट्या हृदयंगम झाली आहे. **अण्णासाहेबां**नीं शाकुंतल नाटकाचें संगीतांत रूपांतर केलें तेव्हां त्यांस विशेष कांहीं कर्तव्य नव्हतें म्हटलें तरी चालेल. फक्त उत्तम भाषांतरानें स्वतःचें कवित्व दाखवावयाचें होतें. व त्यांत त्यांना चांगलें यशही आलें. परंतु या वेळेची गोष्ट अगदीं निराळी होती. या वेळेला त्यांना आपलें कवित्व, नाट्यरचनाचातुर्य, व कल्पनाशक्ति इत्यादि गुण दाखवावयाचे होते. यांच्या पूर्वीं कवि व नाटककारांत फक्त **कालिदास भवभूति**सारख्या प्राचीन कवींचींच नांवें पिढ्यानूपिढ्या ऐकू

येत होतीं.* तेव्हां अण्णासाहेबांना अनुकरण करण्याला त्यांच्याशिवाय नाटकें नव्हतीं. व त्या कवींचेंच त्यांनीं अनुकरण केलें यांत संदेह नाहीं. अर्जुन त्रिदंडी संन्यास वेषानें बलरामाच्या येथील पाहुणचार घेत असतां सुभद्रेला पाहतांच

" घाली घृतांत सैंधव, दुग्धीं जंबीर पायसीं कथिका "

अशी त्याची तारांबळ उडाली हा सर्वप्रसिद्ध कथाभाग वस्तुतः पाहतां अगदीं साधा होता. परंतु कालिदासानें ज्याप्रमाणें शकुंतला आख्यानांतील किंवा भवभूतीनें उत्तर रामायणांतर्गत लहुकुश आख्यानांतील पुराणप्रसिद्ध कथाभाग सोडून देऊन अनेक काल्पनिक प्रसंग व काल्पनिक पात्रें घालून आपापल्या नाटकांत रसवैचित्र्य आणलें, त्याचप्रमाणें अण्णासाहेबांनीं " अर्जुनसुभद्रा विवाह " आख्यान स्वतःच्या कल्पनासामर्थ्यानें पूर्वोक्त कवींच्या नाटकपद्धतीवर रचून " संगीत सौभद्र " नांवानें प्रसिद्ध केलें.

या नवीन नाटकरचनेसंबंधानें अण्णासाहेबांस मुंबईचे प्रख्यात महादेव चिमणाजी आपटे बी. ए. एलेल बी. हायकोर्ट वकील व किर्लोस्कर मंडळीचे पुरस्कर्त्यांपैकीं एक यांनीं पुढील पत्र पाठविलें होतें:

" रा. रा. अण्णासाहेब किर्लोस्कर प्रभृति मंडळी

स्वामीचे शेवेशीं.

साष्टांग नमस्कार वि. वि. आपलें पत्र ता० १९ चें आलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. आपण शनवाराकरितां याल न याल ही शंका होती म्हणूनच आगाऊ दोन तीन दिवस तार केली; व बाळकोबा हे बडोद्यास होते हेंही मला समजलें होतें; परंतु येथून पुण्यास जाण्याच्या पूर्वीं बोलावलें असतां येऊं असें आपण बोललां होतां व शेवटचे शनवारचे खेळाचे वेळीं मंडळीचे आग्रहास्तव आणखी एक खेळ करावा असें सांगितलें होतें. व त्यामुळें मंडळी वारंवार विचारपूस करीत होती. ह्मणून आपणांस तार केली होती. आपण आला नाहीं हेंही वावगें झालें नाहीं. आपण येथून गेल्यापासून येथें संगीत रत्नावली डोंगरे यांचें, संगीत मृच्छकटीक अण्णा जोशी यांचें, व शशिकला व रत्नपाल डोंगरे प्रभृतींचें अशी नाटकांची चंगळ उडाली. मृच्छकटीक नाटक मीं पाहिलें होतें. ते बऱ्याच रीतीनें

---

* सोकर बापूजी त्रिलोकेकर मुंबई हायकोर्टांतील दुसरे ट्रान्स्लेटर हे एक नाटककार १८७९ मध्यें उदयास आले. यांनीं वजाबा नेने यांच्या " सैरंध्री " नाटकाप्रमाणें गद्यपद्यात्मक नलदमयंती व हरिश्चंद्र हीं नाटकें लिहिलीं आहेत.

चांगलें करितात. त्यांतील पात्रें एक दोन चांगलीं असून व्यवस्थाही बरी आहे. इतर दोन नाटकें अतीच वाईट आहेत, असें मीं एक प्रत्यक्ष पाहिलें त्यावरून व दुसरें, दुसऱ्या गृहस्थांनीं पाहिलें त्यावरून कळलें. पैसे मिळविण्याकरितां म्यानेजरांच्या सह्या वगैरे सर्व कित्ता आपलाच त्यांणीं बहुधा घेतला होता. पैकीं मीं शशिकला व रत्नपाल नाटक पाहिलें. त्या नाटकास रुपये ५ व संगीत रत्नावलीस सुमारें ५०।७५ उत्पन्न झालें. हें इतकें लिहिण्याचें कारण त्या नाटकाची थट्टा करण्याचें नाहीं, परंतु आपल्यास पुढें जपण्याकरितां सुचविण्याचें आहे. आपण लिहितां कीं, दिपवाळीचे सुमारास संगीत सौभद्र घेऊन येणार; परंतु आपण इथें होतां तोंपर्यंत तें नाटक सर्व लिहूनही झालें नव्हतें. तेव्हां इतकी तयारी आपली कशी होणार हें समजत नाहीं. शिवाय तें नाटक आपण आपले मनानें तयार करून तसेंच करून दाखविणार किंवा चार लोकांस प्रथम दाखवून त्यांत कमी जास्त दिसल्यास तें करून मग करणार हेंही समजत नाहीं. संगिताला शाकुंतल नाटकासारखें दुसरें नाटक चांगलें नाहीं. शिवाय त्याचा मूळचा नांवलौकिक, कथा अप्रतीम व मनोवेधक व सर्वांस माहितीची. आपली त्यावरील कविता चांगली, पात्रें चांगलीं तयार झालेलीं व मंडळीचें साहाय्य उत्तम. या सगळ्या कारणांचें एकीकरण जाहलें ह्मणून त्याची इतकी कीर्ति झाली हें आपले लक्षांत असेलच. तेव्हां आपल्या नाटकाची गोडी एकवार येथील किंवा कोठीलही लोकांस लागली ह्मणजे त्याचे मागून दुसरें नाटक जें करणें तें विशेष विचारानें व विशेष तयारीनें झालें तरच उपयोग, नाहींपेक्षां वरील तीन नाटकांची हकीकत झाली त्याप्रमाणें होण्याचा संभव आहे. आपलेपाशीं पात्रें उत्तम आहेत हें खरें, पण तेवढ्यानेंच झालें नाहीं. आपली कविताही आपण उत्तम केली असेल पण तेवढीच गोष्ट बस्स नाहीं. कथा व कथेचें संविधानक चांगलें असलें पाहिजे. आपण मला त्याबद्दल जी हकीकत सांगितली तिजवरून तें संविधानक बरेंच चांगलें आहे इतकेंच मी ह्मणेन; परंतु त्यांत पुष्कळ फेरफार व कमजास्त केल्याखेरीज त्याची चहा व तीही संगीत शाकुंतलानंतर पडेल असें वाटत नाहीं. याचा विचार झाला पाहिजे. आपल्यास किंवा इतर मंडळीस या धंद्यावर पैसे मिळवावयाचे असा उद्देश नाहीं. तेव्हां कांहीं तरी चांगलेंच व्हावें हें बरें. नाटकास " आपेरा " चा आकारभाव आणावा ही आपली कल्पना पहिली होऊन त्याप्रमाणें तो बेत उत्तम सिद्धीस गेला हें श्रेय आपल्यास आलें हें तर उत्तमच झालें; परंतु पुण्यास संगीत शाकुंतल झालें म्हणून त्याचे मागून चार संगीत नाटकांची येथें चंगळ उडाली व इतर गांवींही उडेल. तशाच प्रकारचें एकादें संगीत कांहीं तरी पुण्यास व आपले हातून व्हावें यांत हसलि नाहीं. मग यापेक्षां झालेली टूम तेवढीच कायम राहिली तर बस्स आहे. कालीदासास शाकुंतल साधलें म्हणून त्यांनीं आणखी दहा वीस कांहीं तरी नाटकें करून ठेविलीं नाहींत. व त्याणें तेव्हां केलीं असलीं तरी त्यांचा लय तेव्हांच झाला असावा. उतरतांना फक्त तेवढेंच व दुसरें

एक अर्शी दोनच बाकी राहिलीं याजकडे आपण लक्ष दिलें पाहिजे. तसेंच कोणत्याही नाटकाचा प्रयोग मुंबईस किंवा इतर ठिकाणीं करण्यापूर्वी तो पुण्यास चांगला पक्का होऊन सगळ्यांनीं तेथें मान्य केल्याखेरीज येथें किंवा दुसरे कोठेंही होऊं नये हें इष्ट आहे. कोणत्याही प्रयोगाच्या चांगलेपणाची तेथें कीर्ति होऊन ती मुंबईस अगोदर आल्याखेरीज तेथून बाहेर पडूं नये हें बरें. मुंबईस रसज्ञ तर आहेतच; पण त्यांतून पुणेंकर व इतर दक्षिणी मंडळी गाळली असतां बाकीच्यांची संख्या करण्यास शेंकड्याच्या वर जावें लागणार नाहीं ही गोष्ट आपल्यास माहीत आहेच. तव्हां यंदां जी प्राप्ति झाली आहे ती बरीच झाली आहे. तिजवर स्वस्थ बसून संगीत सौभद्र किंवा दुसरा खेळ येथें न आणतां आठ चार महिन्यांनीं तो चांगला तयार करून यावें हें बरें. आतां संगीत शाकुंतलाबद्दल झालेल्या कीर्तीमुळें प्रथम कदाचित् पैसे मिळतील; पण दुसऱ्या प्रयोगास किंवा मग संगीत शाकुंतलास देखील पैसे मिळतील का नाहीं अशी शंका वाटते. शाकुंतलांत सारे रस आहेत. आपण मला जी सौभद्राची हकीकत सांगितलीत तिच्यांत फक्त स्त्रीपुरुषांचा एकमेकांबद्दल विरह याखेरीज दुसरें कांहींच दिसलें नाहीं. त्यांत विनोदरस तरी यावा ह्मणून मी आपल्यास कुमारांतील शंकरपार्वतीचा संवाद पुढें धरून त्याची नक्कल आणावी ह्मणून येथें असतां सूचना दिली होती ती यावी. व शिवायही आणखी काहीं गोष्टी याव्या. तर त्याची चहा पडेल. सारे पांच अंक नुसतीं पदें उत्तम असलीं व गाणारे उत्तम असले तर तेवढ्यानेंच, एकाच प्रकारचें असल्यास त्याचें तेज पडावयाचें नाहीं. आपल्यास नाटकाची चांगली अभिरुचि आहे सबब हें सर्व लिहिणें आहे. तेव्हां याचा विचार करून कांहीं मंडळीस मिळकत व्हावी व ती मुंबईस सहज होते आहे असें समजून येऊं नये असें माझें सांगणें आहे, याचा विचार करावा. लोभ आहेच हे विनंति. ता. २१ अक्टंबर सन १८८२.

आपला, **महादेव चिमणाजी आपटे वकील.** ”

वरील पत्रावरून **माधवरावजीं**ची पुण्याच्या प्रेक्षकांविषयीं किती आदरबुद्धि होती हें व्यक्त दिसून येतें. असो. नवीन नाटकाबद्दल त्यांस जी भीति वाटत होती ती व्यर्थ होती, असें पुढें **मुंबई**स त्यांच्या निदर्शनास आलें.

सौभद्र नाटक **अण्णा**साहेबांनीं रचलें त्या वेळीं आमच्या नाटककादंबऱ्यांसंबंधाच्या कल्पना फार आकुंचित होत्या. कादंबऱ्यांत ज्याप्रमाणें शृंगाररस प्रधान असला पाहिजे त्याप्रमाणें नाटकांतही तो असला पाहिजे या समजुतीचें विशेष प्राबल्य दिसून येत असे. संविधानकांत विचित्रपणा आणावयाचा ह्मणजे तो नायकनायिकेवर मोठालीं संकटें

आणून, असंभाव्य गोष्टी घालून आणि भाषेंत अतिशयोक्ति करून आ-णला जात असे.* इंग्रजी भाषेंतील बहुविध विषय व मनोवृत्तींनीं ओ-तप्रोत भरलेल्या नाटककादंबऱ्यांप्रमाणें महाराष्ट्र भाषेंत नाटकें व का-दंबऱ्या झाल्या नव्हत्या. **अण्णासाहेबांनीं** आपल्या सौभद्रांत शृंगाररसास जरी प्राधान्य दिलें आहे तरी आरंभापासून शेवटपर्यंत संविधानकांत चातुर्य खर्च केलें आहे. त्यांत ठिकठिकाणीं कल्पना व ओज दि-सत आहे. नाटकप्रयोगांत प्रेक्षकांचें चित्तरंजन होण्याचे दोन प्रसंग असतात. एक नट आपल्या बुद्धीनें गाण्यांत, भाषणांत, किंवा अभि-नयांत विशेष कांहीं कौशल्य दाखवून व प्रेक्षकांची चित्तवृत्ति जागृत करून त्यांचेकडून वाहवा मिळवितात ते प्रसंग,व दुसरें, स्वतः नाटकाच्या संविधा-नकचातुर्यानें, जेव्हां जेव्हां प्रेक्षकांची आनंदवृत्ति उचंबळून येते ते प्र-संग. सौभद्र नाटक दुसऱ्या प्रकारच्या प्रसंगांनीं परिप्लुत आहे—हें सौभद्र नाटकाचा प्रयोग चालला असतांना पुढील प्रसंग ज्यांचे लक्षांत असतील त्यांस कळून येईल. अंक दोन व तीनमधील कृष्ण व बल-राम यांचा संवाद; रुक्मिणी व सुभद्रा यांचा दुसऱ्या व चवथ्या अंकां-

---

*हा दोष अद्यापही बरेच नाटकांतून पाहण्यांत येतो. **जान्सननें** अशा नाटकाचें चांगलें वर्णन केलें आहे:

" Upon every other stage the universal agent is love, by whose power all good and evil is distributed, and every action quickened or retarded. To bring a lover, a lady, and a rival into the fable: to entangle them in contradictory obligations,perplex them with oppositions of interest & harass them with violence of desires inconsistent with each other; to make them meet in rapture, and part in agony; to fill their mouths with hyperbolical joy and outrageous sorrow; to distress them as nothing human ever was distressed; to deliver them as nothing human ever was delivered; is the business of a modern dramatist. For this probability is violated, life is misrepresented and language is depraved."

Preface to Shakspeare.

तील संवाद; रुक्मिणी व अर्जुन यांच्या भेटीचा प्रसंग; सुभद्रा व अर्जुन यांचा पांचव्या अंकांतील सबंध प्रवेश; व शेवटचा बलराम वैतागून संन्यासाची तयारी करण्यास सांगत असतां एकदम सेवकाचें अर्जुनानें ठेवलेल्या यतिवेषाचें गांठोडें घेऊन येणें, हे प्रसंग किर्लोस्करांचें खरें कवित्व व नाटकचातुर्य दाखवितात. नाटकाचे खरे गुण हेच आहेत कीं, तीं केव्हांही, कोणच्याही काळीं केलीं तरी त्यांचें स्वारस्य नाहींसें न झालें पाहिजे. जीं स्थानिक ह्मणजे एखाद्या विशिष्ट प्रसंगापुरतीं किंवा कांहीं काळापुरतीं मनोरंजनाचीं नाटकें असतात तीं गौण समजलीं जातात. *

---

* इंग्लंडांत इलिझाबेथच्या वेळीं जीं नाटकें झालीं तीं व "रिस्टोरेशन" च्या वेळीं झालीं तीं यांच्यामध्यें अंतर काढतांना एका ग्रंथकारानें आपलें असें मत दिलें आहे कीं, जीं नाटकें विशिष्ट कालींच उपयोगीं पडतात तीं ग्रंथदृष्ट्या निरुपयोगी आहेत. तो ग्रंथकार ह्मणतो कीं:

"The inferiority of the Restoration drama to the Elizabethan is one of the commonplaces of criticism, perhaps even one of its platitudes and cannot be admitted without some qualification. Yet as the broad general statement of a fact, it is undeniable, and the fact is a proof that the elements which preserve a play as literature for posterity are not those which fit it for the contemporary stage. In every play of serious purpose, there is, or should be, an earthly part and a spiritual, dramatic craftsmanship, and poetical inspiration. In the former perticular the Restoration dramatists compare not unfavourably with their predecessors, always excepting Shakespeare; they fail not as dramatists but as poets. The whole Elizabethan drama is steeped in an atmosphere of poetry. In the Elizabathan age, it is evident, men lived at such a height of heroic and romantic sentiment that the purveyors of public entertainments could not but be poets."

by dens' Age, by.

Dr. R. Garnett. C. B. L. L. D.

(टीप पुढें चालू).

सौभद्रनाटक लोकप्रिय होण्यास दुसरें कारण त्या नाटकाला मिळालेलीं योग्य पात्रें होय, हें मागें सांगितलें आहेच. प्रथमतः तीनच अंकांचा प्रयोग, **पुण्यां**तील **आप्पाबळवंतां**च्या वाड्या जवळ त्या वेळीं असलेल्या " पूर्णानंद " नाटकगृहांत ता. १८ नोव्हेंबर १८८२ रोजीं रात्रौ झाला. शाकुंतल नाटकांत गायक पात्राची योजना जशी यथोचित झाली होती तद्वतच याही नाटकांत झालेली होती. **अण्णासोहबां**कडे सूत्रधार व बलराम या दोन भूमिका होत्या. **मोरोबा** अर्जुन; **बाळकोबा** नारद व कृष्ण; व **भाऊरावा**कडे मुख्य नायिका म्हणजे सुभद्रेची भूमिका होती. या प्रत्येकानें आपापल्या भूमिका किती उत्तम केल्या व यांत तुलनेच्या दृष्टीनें कोणापेक्षां कोणाची भूमिका उत्तम झाली याचें वर्णन करणें शक्य नाहीं. सौभद्र नाटकाच्या लोकप्रियतेची कल्पना करावयाची ह्मणजे, या नाटकाचे पुढें ज्या ज्या प्रसंगीं तीन अंकांचेच प्रयोग होत आले त्या त्या प्रसंगीं जमत असलेल्या प्रेक्षकसमूहाच्या गर्दीवरून, नाटकांतील पद्यें आबालवृद्धांच्या तोंडीं झालीं होतीं त्यांवरून व हें नाटक पाहण्याविषयीं लोकांस वाटत असलेल्या उत्कंठेवरूनच व्हावयाची. सौभद्र नाटकाचा प्रथम प्रयोग होतांच लोक त्याविषयीं इतके लुब्ध झाले कीं; ज्याप्रमाणें **शेक्सपीयर**च्या नाटकांतील सुवर्ण वाक्यांचें चिंतन करण्याकरितां :

[ ' Men would shun their sleep in still dark night
To meditate upon his golden lines'. ]

---

( टीप मागील पृष्ठावरून. )

आमचे प्राचीन कवी अशाच योग्यतेचे होते ह्मणून त्यांचे ग्रंथ अजून तगले आहेत. भवभूतीनें तर आपल्या नाटकांबद्दल आपल्या वेळेच्या लोकांवर मुळींच भिस्त ठेवली नव्हती. त्याचा एक श्लोक सर्वप्रसिद्धच आहेः

**" ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम्**
**जानंतु ते किमपि तान्प्रति नैष यत्नः**
**उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा**
**कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी "**

यांत त्यानें ह्मटलें आहे कीं, " ज्यांना आमची कृति आवडत नाहीं त्यांच्या करितां आमचा प्रयत्नच नाहीं. या विस्तीर्ण पृथ्वीवर कालांतरानें माझ्यासारखा कोणी तरी निपजेल. "

लोक आपली मध्यरात्रीची गाढ झोंप सुद्धां अंतरीत असत, त्याप्रमाणें सौभद्र नाटकांतील पदांच्या लकेऱ्या ऐकून लोक आपली तहानभूक विसरत असत. पुण्यास सौभद्राचे व शाकुंतलाचे खेळ झाल्यावर डिसेंबरमध्यें मंडळी पुनः मुंबईस सौभद्राचे प्रयोग दाखविण्याकरितां गेली. तेथें पंधरा दिवस होती. मुंबईस असतांना शाकुंतल नाटकांत शकुंतलेच्या पात्राला आजपर्यंत गाणें नव्हतें, तें घालून गायनलोलुप जनांच्या कर्णांची तृषा भागविण्यांत आली.*

मुंबईंत गंगाधर वि. मोगरे ह्मणून एक आधुनिक प्रसिद्ध कवी आहेत. त्यांनीं अण्णासाहेबांस अनेक वृत्तात्मक एक पत्र पाठविलें होतें. यांतील विषय व रचनामाधुर्य वाचनीय आहे. हें पत्र विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध झालें होतेंः

मुंबई १९।१२।८२.

रा० रा० बळवंत पांडुरंग उर्फ अण्णासाहेब किर्लोस्कर मुक्काम मुंबई यांस—

शार्दूलविक्रीडित.

नेलीं लोकमनें हरोनि तुमच्या संगीतशाकुंतलें,
द्याया यास्तव पारितोषिक तुह्मां नाहीं दुजें राहिलें;
हें ठावें असतां तुह्मांस, मग ह्या संगीत सौभद्र का ॥
घेवोनी बळवंतराव ! इकडे आलां तुह्मीं आज कां ? ॥ १ ॥

स्रग्धरा.

या; या, संगीत रंगें रसिकजनमनोरंगभू रंगवा ही ! ॥
शृंगारायास हीला क्षम इतर तुह्मांवीण कोणीच नाहीं ॥
नाहीं युष्मत्कृतीला बघुनि निजशिरा हालवीलें जयानें ॥
त्या मूढातें ह्मणे जो रसिक रसिकता दूषवीली तयानें ॥ २ ॥

शिखरिणी.

करीं अत्युक्तीनें कथन तुमचें मी, गुण अशा ॥
अवस्त्वारोपातें मजवरि करायास शतशा ॥

---

* शकुंतलेच्या तोंडांत जीं पद्यें घातलीं आहेत, त्याचे कर्ते गोविंद बल्लाळ देवल आहेत. हे अण्णासाहेबांस गुरुस्थानीं मानीत असतात. यांच्या प्रत्येक नाटकांतील नमनाच्या पद्यांत अण्णासाहेबांचें नांव असतें.

जरी आले, त्यातें न, गणुनि तरी मी वदतसें ॥
तुह्मां झाले अन्या वश रसिक होतील न तसे ॥ ३ ॥

पृथ्वी.

रसज्ञ असुनी, रसप्रिय तुह्मीं स्वभावें असां ॥
उठे रसिक हृत्पटीं तुमचिया कृतीचा ठसा ॥
ह्मणून; नसतां स्वयें रसिक तूमची योग्यता ॥
करूं वघति त्यांकडे रसिकता श्रमें पाहतां ॥ ४ ॥

शार्दूलविक्रीडित.

जातां विक्रम मुंज भोज विलया आधार येथें नसे ॥
ऐसें पाहुनि गौरकायभुवनीं जी नाट्यविद्या वसे ॥
तीला आर्य महींत आणुनि पुन्हां विद्वज्जनाच्या मना ॥
जो आनंद तुह्मीं दिला न करवे त्याची मला कल्पना ॥ ५ ॥

हरिणी.

अभिनयकला वाटे कोणा अति प्रिय तूमची ॥
कवण ह्मणती युष्मद्गानीं अपूर्व असे रुची ॥
परि रसिकता विद्वानांच्या तुह्मीं दिधली करीं ॥
मुदित बहु ही मच्चित्तातें कृती तुमची करी ॥ ६ ॥

शार्दूलविक्रीडित.

होवो नष्ट न आर्य नाटककला संगीत विद्या तसी ॥
इच्छा वागवितां निरंतर तुह्मी ही आपल्या मानसीं ॥
आहे योग्यचि हें; परंतु करितों जी एक विज्ञापना ॥
तीचा हो उपयोग हीच तुमच्या पाशीं असे याचना ॥ ७ ॥

स्रग्धरा.

ज्यांनीं दिल्लीश्वराचें हतबल करुनी संगरीं शूर वीर ॥
झेंडे अस्मद्यशाचे उभवुनि सगळें झांकिलें सिंधुतीर ॥
त्या श्रीबाजी शिवाजी प्रभृति शुभयशःसागरांचीं चरित्रें ॥
आणोनी रंगभूमीवर मुदित करा एकदां लोकनेत्रें ॥ ८ ॥

मालिनी.

सहज घडुनि येणें देशसेवा तुह्मांला ॥
वसतिल जनचित्तीं पूर्वजांच्या हि लीला ॥
जड जन इतिहास ग्रंथ घेतील हातीं ॥
रसिकहि नवलाभे तोषतील स्वचित्तीं ॥ ९ ॥

शिखरिणी.

जरी त्या दावाया उचित असती उत्तम पथा ॥
तरी आतां लोकां रुचति नच पौराणिक कथा ॥
प्रयोगाला त्यांच्या बघुनि सुख पावोत नयनें ॥
परी बोधाया त्या शकतिल न आतां जनमनें ॥ १० ॥

स्रग्धरा.

आणा तो रंगभूमीवर यवनवनज्वालमाली शिवाजी ॥
येऊंद्या तोहि बाजी निशिदिनिं विजयश्री जया होय राजी ॥
पाहूंद्या एकदां ते भट अटक नदी लंघितां राघवाचे ॥
रंगीं तो कां न नाचे टिपुस रगडितां जो रणीं फार नाचे ॥११॥

वसंततिलका.

केली असे विनति मान्य करा नका वा ॥
ग्यां काय आग्रह तुह्मांस वृथा करावा ॥
आली असेल करुणा जरि ह्या महीची ॥
सेवा तुह्मीं तरि करालचि सत्य हीची ॥१२॥

**श्री० शिवाजीराव बाळासाहेब होळकर** यांचा लाभ मंडळीस याच खेपेस **मुंबई** मुक्कामीं झाला. हे त्या वेळीं फिरत फिरत तेथें आले होते. यांच्याकरितां मुद्दाम **ग्रांटरोड** बादशाही नाटकगृहांत शाकुंतल नाटकाचे पांच अंक करून दाखविण्यांत आले. हे त्या वेळीं युवराज होते. हे फार मार्मिक व रसिक आहेत. नाटक पाहून हे फार खूष झाले व त्याबद्दल **अण्णासाहेबांस** एक मोठी जरीकांठी शालजोडी यांनीं बक्षिस दिली होती. या नाटकापासून **अण्णासाहेबांचा महाराजांशीं** निकट संबंध घडून येऊन त्यांच्या चरित्रांत यांचा एक महत्त्वाचा भाग आला आहे, तो प्रसंगानुसार कळून येईलच.

---

## चरित्रांतील कांहीं पात्रें.

" साग्र संगीत शाकुंतल " प्रकरणांत प्रस्तुत चरित्रांत निरनिराळीं पात्रें येतील ह्मणून सांगितलें आहे. त्यांपैकीं कांहीं पात्रांचें वर्णन येथेंच दिलें असतां, पुढें त्यांचे प्रसंगविशेषीं नांव आलें तर वाचकांस अडचण पडणार नाहीं. ज्यांच्या संबंधानें बरे वाईट उ-

द्गार या चरित्रांतून निघणार आहेत त्यांपैकीं बरींच पात्रें दुर्दैवानें आज मित्तीस नाहीं आहेत. त्यामुळें त्यांचे पश्चात् त्यांचे संबंधानें वाईट उद्गार काढणें एक प्रकारचें भेकडपणाचें काम आहे. परंतु सुदैवानें आज मित्तीस हें चरित्र वाचण्यास विद्यमान असलेल्या पात्रांचें वर्णन देण्यांत त्यांच्या इच्छेविरुद्ध किंवा त्यांना न आवडतील असे उद्गार जर चुकून निघत असतील तर ते त्यांकडे क्षमा दृष्टीनें पाहोंत. चरित्रनायक असतात त्यांच्या सभोंवतीं कांहीं परिवार असतो व प्रसंगानुरोधानें त्यासही बरें वाईट महत्त्व येतें. **श्री समर्थ रामदास** यांच्या चरित्रांत त्यांचे शिष्य **कल्याण** व **सुंदराबाई** व **वेणुबाई** शिष्यिणी यांचें वर्णन यावयाचेंच. **संभाजी**च्या इतिहासांत **कलुषा** ब्राह्मणाचें नांव आलेंच पाहिजे, **नारायणराव पेशव्या**च्या मृत्यूची हकीकत देतांना त्यांचा एकनिष्ठ सेवक **चापाजी टिळेकर** याची गोष्ट सांगितलीच पाहिजे; दुसरे **बाजीराव पेशवे** आले ह्मणजे त्रिंबक डेंगळे यावयाचेच; अशा सगळ्यांनींच कांहीं विशेष कामगिरी केली असते असा प्रकार नाहीं; परंतु कांहीं—

**" वस्तु स्थळ वैभवें करुनिया मोठेपणा पावतीं. "**

या उक्तीप्रमाणें प्रस्तुत चरित्रांत कांहीं पात्रांचा चरित्रनायकाशीं संबंध आल्यामुळें त्यांचा नामनिर्देश यांत अवश्य आहे.

**बाळू हणमंता घोरपडे.**—हा जातीचा मराठा, पण लिहिणें वाचणें शिकल्या कारणानें चांगला हुशार होता. **अण्णासाहेबां**च्या कुटुंबाच्या संबंधानें प्रथम याचें येणें मंडळींत झालें. परंतु पुढें हा मंडळींतच कायमचा नोकर झाला. प्रथमतः हा गड्याचीं कामें करीत असे. परंतु पुढें प्राम्टर, शिवणकाम, नाटकाच्या नकला उतरणें इत्यादि कामें करीत असे. **अण्णासाहेबां**च्या हा अगदीं विश्वासांतला असे; त्यामुळें प्रथम प्रथम हा जरी गरिब होता तरी शेवटीं याची वृत्ति बरीच पालटली होती. १८८२ सालीं हा प्रथम मंडळींत आला तों १८९४ सालीं मरेपर्यंत मंडळींत होता.

**विसू न्हावी.**—पुण्यांत नाटकगृहांचे कायदे होण्यापूर्वीं नाटकगृहांच्या दरवाजांत नाटकाच्या दिवशीं एक मशालजी असे. नाटक संपवून मंडळीस घरीं पोंचविलें कीं, मशालजीचें काम संपलें, अशी पूर्वीची

पद्धत होती. हें मशालजीचें काम हा न्हावी करीत असे. व त्यासंबंधानें अगदीं पहिलें नाटक झाल्यापासून **अण्णासाहेबां**कडे याचें येणें पडलें होतें. हा न्हावी धोरणी, हुशार व मोठा नकल्या होता. नाटकांतील पदें, लावण्या वगैरे याला फार येत असल्या कारणानें त्यांवर चार मंडळींची तो चांगली करमणूक करीत असे. हजामतीच्या वेळीं डोकें चोळतां चोळतां यजमानाच्या डोक्यांतून गोड गोड थापा मारून व आर्जव करून स्वतःचा मतलब चट्कन काढून घ्यावयाची हातोटी त्याला चांगली साधली असे. एखादी चुकी झाली तर आपल्याबरोबर दुसऱ्यालाही घेऊन पडावयाचें असली ही स्वारी मोठी वस्ताद असे. " याला संगीत न्हावी " ह्मणत असत. हा मंडळींत आठ नऊ वर्षें होता.

**गांवठी साहेब.—दिनकर बल्लाळ नेने** उर्फ " गांवठी साहेब. " हा एक गरीब पण भारी हुषार मनुष्य असे. **पुण्यांत** सुमारें वीस वर्षांपूर्वी मिशनरी व बाटे लोकांचें रस्त्यांतून उभे राहून हिंदुधर्माविरुद्ध उपदेश करण्याचें फार बंड चालत असे. त्यांच्याविरुद्ध गांवठी साहेब ह्मणजे चांगली मात्रा होती. त्यांचें प्रत्येक मत ही स्वारी खोडून टाकीत असे. यावरून व देशी बूट, पाटलोण, कोट वगैरे विक्षिप्तपणाच्या पोषाखावरून स्वारीस वरील नांव पडलें होतें. यांचा स्वभाव फार थट्टेखोर, व पाहिजे त्याच्या नकला करण्यांत यांचा हातखंडा असे. एकदां डेक्कन कालेजमध्यें संगीत शाकुंतलाची तालीम झाली, त्या प्रसंगीं हेही बरोबर होते. दुसरे दिवशीं मंडळीस मेजवानी झाल्यावर लायब्ररी हालमध्यें यांनीं व वरील **विसू न्हाव्यानें** अनेक नकला करून दोन तास जमलेल्या शें दोनशें मंडळीस पोट धरून हासविलें. **पुणें** शहरांत गांवठी साहेब ज्याला माहित नाहीं असा कोणी नव्हता. यांचीं तिन्ही अक्षरें उत्तम. व इंग्रजी चांगलें होतें. महिना पांच पंचवीस रुपये कोठें शिकवणीवर, कोठें **बाबा गोखले** वकील यांच्या खटल्याच्या कांहीं नकला करून सहज मिळवीत असत. चार महिन्यांच्या बेगमीची प्राप्ति झाली कीं, पुनः उद्योग सोडून रिकामें हिंडण्याचा यांनीं क्रम ठेवला असे. **किर्लोस्कर मंडळी**चें तिकीट विक्रीचें काम यांच्याकडे असे व तें त्यांनीं फार चोख रीतीनें बजावलें होतें. **किर्लोस्कर** मंडळींत जीं अवांतर माणसें येत त्यांत निरुपद्रवी, पंचाईत न करणारा व उपयोगी

असा हा एक गृहस्थ असे. अण्णासाहेब इंदुराकडे गेले तेव्हां त्यांनीं यांना बरोबर नेलें होतें. गणपतराव किर्लोस्कर हायकोर्टचे वकील यांचाही यांवर फार लोभ होता. परंतु पुढें हे फारच व्यसनाधीन होऊन त्यांचे सर्व गुण लोपून गेले. व शेवटीं प्लेगमध्यें पुण्यास बळी पडले.

कृष्णापा.—हा एक किर्लोस्कर मंडळीचा वीस बावीस वर्षांचा जुना सेवक आहे. अण्णासाहेबांनीं प्रथम याला कोल्हापुराहून आणलें. याची घरची स्थिति बरी असून केवळ नादानें हे गृहस्थ मंडळींत दिवस काढीत आहेत. मनुष्य अतिशय कष्टाळू, सहनशील व व्यवस्थित असा आहे. धन्याची मर्जी प्रसन्न ठेवण्याविषयीं सदां दक्ष. परंतु मोठा हिकमती व हजरजबाबी. स्वतःकडून एखादी चुकी झाली तर ती दुसऱ्याच्या गळ्यांत घालून आपण अचूक निसटून जाण्याच्या कामांत पटाईत अशी ही मूर्ति आहे. निरनिराळ्या प्रकृतीच्या व स्वभावाच्या माणसांच्या हाताखालीं वागावयाचें ह्मणजे करामतीनें कसें वागावें लागतें यांत ही स्वारी फारच हुशार आहे. अशा हुशारीनें यांनीं काळ्याचे पांढरे केस मंडळींत केले आहेत. अण्णासाहेब व त्यांच्या पश्चात् सर्व मालकांसही हे हवे असतात. ह्मणूनच तीन चार वेळां हे रुसून गेले होते, तरी यांना समजूत करून आणावें लागलें. हे हरकामी आहेत.

बुचके.—बाळकोबा नाटेकर मंडळींत यावयाचें झालें म्हणजे त्यांच्याबरोबर त्यांच्या भक्तांचा एक दहा बारा असामींचा तांडा येत असे. त्यांपैकीं हे एक असत. प्रथम कांहीं दिवस हे गृहस्थ अगदीं मुग्धपणानें वागत. बाळकोबाबरोबर यावयाचें व ते निघाले कीं परत जावयाचें हा त्यांचा क्रम; परंतु पुढें जसजशी मंडळीशीं यांची जास्ती घसट होऊं लागली तसे तसे ह्यांच्यांतील वक्तृत्व, मुत्सद्दीपणा हे गुण दृष्टीस पडूं लागले. हे फार आर्जवी, मेहेनती, चांगले म्हणवून घेण्याविषयीं अति दक्ष आहेत. परंतु हे गुण दाखवितांना कधीं कधीं निष्कारण दैन्य, आशा व असमाधान हीं व्यंगें वाजवीपेक्षां फाजील दाखवीत असत. ज्यांच्याशीं यांचें विशेष संघटन पडेल त्याला हे आपल्या हिताची अति काळजी घेतात असें वाटे. कोणाच्या तंत्रानें वागलें असतां आपला फायदा आहे हें समजून मग कोणाशीं कसें वागावयाचें ते हे वा-

गत असत. **अण्णा**साहेबांपासून मंडळींचीं **पुण्यां**तील बहुतेक कामें हे करीत असत. त्यामुळें यांना मंडळींच्या " गुडकान्डक्ट " फंडांतून बक्षीस मिळत असे. हे सरकारी नोकर आहेत.

**शिवरामपंत.**—हेही **बाळकोबा**च्या तांड्यापैकीं एक होते. परंतु कसल्या भानगडींत न पडणारे, सर्वांशीं हंसून खेळून थट्टामस्करींत वेळ घालविणारे, गाणें बजावणें वगैरे चमन असली म्हणजे हे आनंदांत असावयाचे. हे निरिच्छ असे असत. **बुचके** व हे एकाच खात्यांतले नोकर, मंडळींत बहुतेक त्यांच्याबरोबर येत असल्यामुळें विनोदानें शाकुंतल नाटकांतील " वृक्ष वेल या दोहींची जोडी शोभते " या पदांत त्यांच्या मित्रमंडळीनें " शिवराम बुचक्यांची जोडी शोभते पहा कशी ही " हा पाठभेद केला होता. दुर्दैवानें हे दोन वर्षांपूर्वीं वारले.

**झावरे माळी.**—मंडळीला फुलें पुरवणारा हा माळी असे. याला **अण्णा**साहेबांचा फार अभिमान. मंडळी कोठेंही असली व आगगाडीनें वेळेला फुलें पोंचतील अशी सोय असेपर्यंत नाटकाकरितां फुलें **पुण्या**-हून याच्याकडून जायचीं; व तीं त्यानें कधींही चुकवून दिलीं नाहींत. कोणच्या मंडळीस कसें खूष करावें हें हा चांगलें जाणत असे. यामुळें व कोणत्या वेळीं व कसलेंही काम सांगितलें तरी कुरकूर न करितां करावयाचें वगैरे गुणांमुळें तो **अण्णासाहेबां**स व त्यांच्या पश्चात्‌ही स-र्वांचा फार प्रिय होता. यानेंही आपल्यास **संगीत माळी** हें नांव घेतलें होतें. हा प्लेगमध्यें सहा वर्षांपूर्वीं वारला.

**मोत्या कुत्रा.**—नाशिक येथील फौजदार यांनीं हा **अण्णासाहेब** यांस नजर केला होता. हा एक लहानसा वाघच होता म्हटलें तरी चा. लेल. **अण्णासाहेबां**च्या योगानें याचेंही नशीब उदयास आलें होतें- **किर्लोस्कर** मंडळींतील कुत्रा ह्मणजे प्रसिद्ध होता. स्टेशनवर वगैरे कोठें गेला तरी युरोपियन लोक याच्याकडे पाहत राहत असत. यालाही खाण्यापिण्याकरितां स्वतंत्र तनखा असे. **अण्णासाहेबां**च्या पश्चात्‌ हा सात वर्षें होता.

या चरित्ररूपी रंगभूमीवरचीं एका प्रवेशांतलीं हीं पात्रें आहेत. ख-ऱ्या रंगभूमीवर जशीं केव्हां केव्हां प्रेक्षकांस खरा आनंद देणारीं पात्रें

येतात व केव्हां केव्हां अगदीं तिरस्कार उत्पन्न करणारींही येतात. त्याप्रमाणें या चरित्रांतही अशीं पात्रें येऊन गेलेलीं आहेत. रंगभूमीवरच्या पात्रांची कृति कितीही उत्तम असली तरी, किंवा वाईट असली तरी ती जशी तात्कालीक काय आनंद किंवा दुःख देईल तेवढीच; परतु शेवटीं पाण्याच्या लाटेप्रमाणें ती नाहींशीच व्हावयाची. त्याप्रमाणें याही पात्रांच्या कृतींची अवस्था असल्याकारणानें फक्त स्वभाववर्णनापुरतीच त्यांच्यासंबंधानें येथें माहिति दिली आहे.

---

## बाहेर गांवीं सफर.

सौभद्र नाटकाचे पुढचे दोन अंक जरा दिरंगाईनें तयार झाले. सन १८८२ च्या नोवेंबरमध्यें पाहिल्या तीन अंकांचा जो प्रथम प्रयोग झाला, त्यावर १८८३ मार्चमध्यें पांच अंकांचा प्रयोग झाला. कांहीं दिवस पुढील दोन अंकांच्या रचनेचें काम अगदींच थांबलें होतें. परतु एके दिवशीं **मुंबईच्या** बाजारांत एक कांचेच्या गणपतीची मूर्ति **अण्णासाहेबांच्या** दृष्टीस पडून ती त्यांस घ्यावीशी वाटली, व ती घेतल्यापासून पुढील दोन अंक लवकर तयार करण्यास त्यांस स्फूर्ति झाली, असा या अंकांचा इतिहास आहे. सौभद्र नाटकाची लोकप्रियता **पुणें** व **मुंबईस** कायम झाल्यावर आतां देशपर्यटन करून यावें हे विचार **अण्णासाहेबांच्या** मनांत घोळूं लागले. प्रथम जी सहा महिन्यांची रजा घेतली होती त्या रजेंत कांहीं शहरें फिरून यावीं व त्या फिरण्यांत आपल्यास यश आलें तर मग नोकरी सोडून नाटकाचा कायमचा धंदा करावा असा त्यांनीं विचार केला. त्याप्रमाणें अगदीं आरंभापासून यांत जी मंडळी होती त्यांस हा उद्देश श्रुत केला. आरंभाच्या वेळचे **मोरोबा, बाळकोबा नाटेकर, गोपाळराव दाते** व **मुजुमदार** हे मंडळींत होते. पैकीं पहिल्या दोघांच्या संबंधाची माहिती पूर्वीं येऊन गेली आहेच. बाकी दोन इसमांच्या संबंधानें माहिती सांगणें अवश्य आहे. **दाते** हे **अण्णासाहेबांचे** पूर्वाश्रमांतले स्नेही—शिवाय **बेळगांवास** असतांना या दोघांच्या वरचेवर गांठी पडत असल्यानें तो स्नेह थोडा दाट ज-

मला होता. त्यामुळें शाकुंतल नाटकांत **अण्णा** कोठें कोठें त्यांचा उपयोग करून घेत असत. **दाते** हे एक हास्यरसाचें उत्तम पात्र होतें. नाटकाच्या कामाला जी एक उपजत बुद्धि लागते ती यांच्यांत पूर्ण होती. हे केव्हांही कसल्याही वेषांत आले तरी लोकांना आनंदवीत असत. परंतु स्वहिताकडे फाजील लक्ष हा एक दुर्गुण यांच्यांत असल्यानें हे कोणत्याही नाटकांत पुष्कळ दिवस टिकले नाहींत. यामुळें नाट्यकलेंत एक उत्तमांतलें पात्र असून या नाटकांतून त्या नाटकांत अशा फिरण्यानें त्यांनीं स्वतःला कमीपणा आणून घेतला होता.

**मुजूमदार** यांची व **अण्णासाहेबांची** नाटकासंबंधानें **बेळगांवास** आळख झाली होती. पुढें **अण्णासाहेब पुण्यास** आल्यावर संगीत नाटकाची कल्पना त्यांच्या डोक्यांत आली तेव्हां त्यांनीं जीं जीं पात्रें हेरून ठेवलीं त्यांत त्यांनाही घेतलें. हे त्यावेळीं विद्यार्थी असत. संगीत नाटकाला **मोरोबा** व **बाळकोबा** सारख्या माणसांची जितकी अवश्यकता होती तितकी यांची नव्हती; यांच्या जागीं त्यावेळीं कोणीही मिळतें तरी काम भागलें असतें. परंतु शाकुंतल नाटकाचा आरंभ यांच्यावरच होण्याचा योग होता. पुढें दोन वर्षें जेव्हां जेव्हां प्रयोग होत तेव्हां तेव्हां **पणें मुंबई** वगैरे ठिकाणीं हे बरोबर असत. शाकुंतल नाटकांत जसा यांचा थोडासा उपयोग झाला तसा सौभद्रांतही अंशतः झाला. संगीताच्या दृष्टीनें **दाते** व हे दोन्ही प्रायः निरुपयोगीच होते. परंतु सौभद्र नाटकापासून विदूषकाच्या कामाकरितां **दाते** यांची विशेष जरूर लागली. **अण्णासाहेबांचा** बाहेरगांवीं फिरून येण्याचा विचार झाला तेव्हां यांची अवश्यकता होतीच. **मुजूमदारासंबंधानें** तसा प्रकार विशेष नव्हता. व जरी यांचा त्यावेळीं कांहीं उपयोग असला तरी आणखी थोड्याच अवधीनें यांना " औट " ( out ) झालें पाहिजे होतें. कारण मुलांचा स्वाभाविक उपयोग होण्याची जी कांहीं मर्यादा असते तिचें अतिक्रमण होण्याची संधि जवळ जवळ येत चालली होती व ती पाहून **मुजूमदार** यांनींही आपला पाय काढतां घेण्यास अगोदरच सुरुवात केली होती. गाणारें पात्र मिळतांच शाकुंतल नाटकांतील आपली भूमिका त्यांनीं त्यावर सोपविली. तरी **अण्णासाहेबांनीं** आपल्या विचारांत त्यांनीं असावें ह्मणून त्यांस पुढील पत्र पाठविलें:

**मुंबई** तारीख २२ जानेवारी १८८३.

" चिरंजीव राजेश्री शंकरराव मुजुमदार यांसी प्रीतिपूर्वक अण्णा किर्लोस्कर यांचे कृतानेक आशीर्वाद विशेष. आतां आम्हीं पुन्हां मोठ्या स्वारीस निघणार. तुम्हीं आह्मांमध्यें आरंभापासून असल्यानें तुह्मांस वगळण्यास आह्मांस फार वाईट वाटतें. याजकरितां जर तुह्मी रिकामे असाल तर आम्हांबरोबर तुह्मीं आलेंच पाहिजे असें आमचें मत आहे. तुह्मांस देण्याघेण्याचे संबंधानें आह्मीं नाखुष कधीं केलें नाहीं, व पुढेंही करणार नाहीं. व यांत तुमची संमति असावी असें आह्मांस वाटतें. तेव्हां तुह्मी जर रिकामे असाल ह्मणजे तुह्मांस जी नोकरी मिळणार होती ती मिळाली नसल्यास तुह्मीं येण्यास अनमान करूं नये. बहुशा कांहीं खेळ पुण्यांत व कांहीं मुंबईत होतील तेवढ्या पुरते तरी निदान मदत कराल किंवा नाहीं हें लिहून कळवावें. आतां हें पत्र पावतांच एकंदर विचार करून तुमचें काय ह्मणणें आहे तें लिहून पाठवावें. आतां काय तें तुह्मांकडूनच कळावयाचें उरलें आहे. कळावें लोभ करावा हे आशीर्वाद.

**अण्णा किर्लोस्कर.** "

दूरच्या स्वारीबरोबर न येतां **मुजूमदारांनीं** फक्त **पुणें मुंबईपर्यंत** येण्याचें कबूल केलें. तरी पुढें **इंदुराहून** स्वारी फिरून आल्यावर मंडळीची अडचण संभाळण्याकरितां त्यांस **अहंमदनगरास** एकवार जाऊन यावें लागलें.

**पुण्यास** १८८३ मार्चमध्यें कांहीं खेळ केल्यावर मंडळीचा **सोलापुरास** जाण्याचा विचार झाला. **सोलापुरास** या वेळीं **नाना शेवडे** नोकर होते. त्यांनीं पुढील पत्र मंडळीच्या येण्यासंबंधानें **अण्णांस** लिहिलें:

**सोलापूर** ता. १३ मार्च सन १८८३.

" मित्रवर्य रा. रा. अण्णासाहेब किर्लोस्कर मुक्काम पुणें मित्राचे सेवेसीं. साष्टांग नमस्कार वि. वि. आपले हुकुमानें बुचक्यांनीं पत्र पाठविलें तें पावलें. मजकूर सर्व समजला. बहुत आनंद झाला. इचलकरंजीकर मंडळी येथें आहे. त्यांचें थिएटर तयार असून आपल्यास ते देण्यास तयार आहेत. करितां संकेताप्रमाणें तारीख १७ रोजीं खेळ करून रविवारीं सकाळचे गाडीनें येण्याचें करावें. पैशाचे संबंधानें जरी कांहीं नक्की कळवितां येत नाहीं, तथापि नुकसान होणें नाहीं असें आपले लौकिकावरून मान आहे. येथें दर ठेवणें ते खुर्चीस २, बाकास १, व इतर ८८ आणे. नायकिणीस १ रुपाया व कुलीन स्त्रियांस ८८ आणे याप्रमाणें असावेत. आपण बरोबर मंडळी बेतापुरती आणावी, ह्मणजे भाडेंखर्च फाजील होणार नाहीं. कपडे

भांडीं आदिकरून सामान मात्र बरोबर आणावें, तें देखील जरूरी पुरतें आणावें. कारण येथें थोडके मुदतीकरितां सर्व प्रकारची जमाजम करण्यास फार त्रास पडणार आहे. त्यासंबंधानें कांहीं भाडेंखर्च येईल. परंतु हरकत नाहीं. आपण खास येथें कोणते दिवशीं येणार तें आम्हांस एक दोन दिवस पूर्वीं समजलें पाहिजे. म्हणजे त्याप्रमाणें रहाण्याकरितां घराची तजवीज करण्यास ठीक पडेल. रा. बाळकृष्णपंत तांबे येथेंच आहेत. व आपल्याकरितां मुद्दाम रहाणार आहेत. थिएटरचे संबंधानें इचलकरंजीकर मंडळी असल्यामुळें बिलकुल काळजी नाहीं. सर्व प्रकारची तयारी आहे. त्यासंबंधानें आपल्यास बहुशा लाईटचा खर्च पडेल असें वाटतें. खेळ करण्याचे दिवस आपण येथें आल्यावर ठरविण्यांत येतील. आपण तेथें जाहिराती मात्र चांगल्या छापून व कांहीं हँडबिल प्रूफच छापून आणावें. आमचा विचार असा आहे कीं, येथून कलबुर्ग्यापावेतों हैद्राबादरस्त्याकडे व दुसरे बार्शीपावेतों प्रत्येक स्टेशनावर हँडबिलें, जाहिराती पाठविण्याचा विचार आहे. करितां त्या बेतानें अधिक छापून आणावीं. तिकिटेंही तेथूनच छापून आणावीं. अगर येथें कळविल्यास तयार करतां येतील. आपले येण्याची हकीकत इकडील कांहीं कामदारमंडळी बाहेरगांवीं असल्यामुळें त्यांस मदतीस येण्याबद्दल आम्हीं पत्रें लिहिलीं आहेत. आपण कधीं येणार तें कळवावें. कळावें ही विनंति.

आपला, **नाना शेवडे.** ”

मंडळी **सोलापुरास** गेली. हें शहर व्यापाराचें असल्यानें येथें नाटक मंडळ्या वरचेवर जात असत. तरी नाटकगृहांची सोय येथें बिलकूल नव्हती. त्यामुळें कोणी नाटकमंडळी आली ह्मणजे एखाद्या वखळींत मांडव घालून सोय करावी लागत असे.* **किर्लोस्कर** मंडळीची सोय त्या वेळेला तेथें इचलकरंजीकर मंडळी असल्यामुळें अनायासानें झाली. तेथें चार खेळ करून मंडळी **मुंबईस** गेली व **अण्णासाहेब** एकटे इचलकरंजीकर मंडळीबरोबर **बार्शीस** गेले.

**अण्णा**साहेबांच्या मनांत एखादी गोष्ट करावयाची आली ह्मणजे ती ते मनासारखी करून घेत; व बहुतकरून तिच्यांत त्यांना यश येत गेलें. **नारायणबोवा फलटणकर** नांवाचे एक प्रसिद्ध हरदास **श्री० फलटणकर** यांच्या पदरीं आहेत त्यांना आपल्या मंडळींत घ्यावें अशी त्यांची फार इच्छा होती. **बाळकोबा, मोरोबा**

---

* हल्लीं येथें दोन नाटकगृहें आहेत. पैकीं नवें नाटकगृह याच वर्षांत हिराचंदशेट गांधी यांनीं शहरच्या तोंडाशीं फार भव्य व उत्तम बांधलें आहे.

प्रमाणेंच ह्यांचेंही कंठमाधुर्य अप्रतिम आहे. **पुणें** शहरांत मोकळ्या जागेंत यांचीं कीर्तनें होत असत, तेव्हां हे दोन हजार लोकांना आपल्या गाण्यानें झुलवीत असत. **वांईस** कृष्णाबाईच्या उत्सवाकरितां हे दर वर्षी जातात. **अण्णा**साहेब मुद्दाम या उत्सवाकरितां **वांईस** गेले. त्यांच्या यांच्या गांठीही झाल्या. मी रिकामा असतों तर आलों असतों, परंतु संस्थानची नोकरी असल्यानें येतां येत नाहीं असें **बोवानें** सांगितलें. या कामांत मात्र **अण्णा**साहेबांस यश आलें नाहीं. व जी **गोष्ट** व्हावयाला पाहिजे असें त्यांस मनापासून वाटत होतें अशी **गोष्ट** हीच राहिली असें ते वरचेवर ह्मणत असत.

चांगली मंडळी किंवा आपल्यास आवडतील ती मंडळी आपल्या जवळ असावी ही त्यांना फार हौस असे. **सोलापुराहून बारशीस** जाण्याचा असाच उद्देश होता. इचलकरंजीकर मंडळींपैकीं उपयोगी मंडळी आपल्यांत घेण्याचा त्यांचा उद्देश होता. त्या मंडळीस पुढें रजा व्हावयाची होती. व यांनाही कांहीं मंडळीची अवश्यकता होती; ह्मणून त्यांतलीं स्त्रीपात्राला उपयोगीं पडतील अशीं दोन मुलें; व इतर माणसें त्यांनीं आणण्याचें ठरविलें. **बारशीहून** त्यांनीं **मोरोबास** एक पत्र पाठविलें त्यांत याबद्दलचा उल्लेख आहेः

**बार्शी**, ता. ७।४।१८८३

" नमस्कार वि. वि. लिहिण्यास कारण कीं, आम्ही आमची प्रकृति बरी नसल्यामुळें एक दोन दिवस येथें राहिलों. सोमवारपर्यंत मुंबईस येतों. थिएटर ठरवून ठेवावें. पक्कें करूं नये. बुधवारीं बहुतकरून खेळ करण्याचें ठरेल. हल्लीं किंचित् वारीक ताप आला होता. आतां बरें आहे. राघोपंताच्या मंडळीचाही आजच शनिवारीं शेवटला खेळ आहे. त्यांचें येण्याचें ठरत आहे. कांहीं मंडळीस मी बरोबर घेऊन येतों. तुम्हीं तेथें गेल्यावर तपशीलवार व्यवस्थेचें पत्र पाठवावयाचें त्याप्रमाणें कां पाठविलें नाहीं म्हणून काळजी लागली आहे. असो. मी तेथें सोमवारीं अगर मंगळवारीं येऊन दाखल होतों. बहुशा नाटेकर व आम्ही मिळून येऊं. सर्वंत मंडळीस आशीर्वाद, नमस्कार अनुक्रमें कळवावे. कळावें, बहुत काय लिहिणें लोभ करावा ही विनंति.

**अण्णा किर्लोस्कर.** "

लोकांस हा विचार फारसा प्रशंसनीय वाटत नव्हता. **अण्णासाहेब** करीत होते तें नाटकच व इचलकरंजीकर मंडळी करीत होती तेंही

नाटकच. परंतु लोकदृष्टया दोघांच्या धंद्यांत अंतर होतें. तें नाहींसें होऊं नये असें लोकांस वाटत होतें. **पुणें** येथील, त्या वेळीं असलेले **आर्यभूषण छापखान्याचे** म्यानेजर **गणपतराव सोवनी** यांनीं या संबंधानें **अण्णासाहेबांस** पुढील पत्र लिहीलें होतें:

तारीख ८।४।१८८३

"रा.रा. अण्णा किर्लोस्कर यांस साष्टांग नमस्कार वि.वि. माझ्या ऐकण्यांत असें आलें आहे कीं, आपली कंपनी व ( आतां म्हणणें जरूर आहे. ) श्रीमंत राघोपंत यांची कंपनी एक होणार व आनंदानें मुंबईचे जवळचे एका बागेंत वनभोजन होणार. हा आनंदाचा समारंभ जाहल्यावर दोन्ही मंडळीपैकीं कचरामंडळीस नारळ मिळणार. ही बातमी खरी मानण्यास कारण आहे. परंतु पहिल्यानें तुमचेकडून काय हकीकत येते ती पाहून नंतर त्यावद्दल मला पुष्कळ ल्याहावें असें आज वाटत आहे. पुढें उमेद राहिल्यास पुढील पत्रीं लिहीन. अशा योगानें आपल्या हातून लोकोपयोगीं कामें घडतील अशी आपणांस आशा आहे कां? तंटे होतील, तुम्हांस फार त्रास होईल. दुसरी मंडळी कांहीं हलकटपणा करतील व दोषाचे अधिकारी आपण व्हाल—हें चांगलें नाहीं. घाई करून उपयोग काय? तुमची मंडळी कांहीं वाईट नाहीं. दुसरी मंडळी जवळ करून अधिक काय कराल तें जगापुढें येईलच. आपण मला वाईट म्हणाल तर सुखानें म्हणा, परंतु ह्या गोष्टीनें हल्लींची महती उरणार नाहीं. आपली कंपनी हलकट या सदराखालीं मोडेल यांत मला तिलप्राय संशय नाहीं. स्नेहसंबंधानें लिहिल्याची माफी असावी. कळावें ही विनंति.

आपला,

**गणेश मोरेश्वर सोवनी.**

"हेंच पत्रीं रा. मोरोबा, बाळकोबा, बुचके, भाऊ वगैरे सर्वांस नमस्कार. लिहिण्यास कारण कीं,

**उत्कृष्ट भाग्यकाळीं भक्षीतिल काग काय मोत्यातें ।**
**हंस न उच्छिष्ट खाती आला जरि काळही विपत्त्यातें ॥**

[ मोरोपंत. ]

"तुमच्या कंपनींत जरी एका माणसाची उणीव आहे तरी कालेंकरून भरती होईल. व उणीव असली तरी आपली मान्यता कांहीं कमी झाली नाहीं. हल्लीं नवी मंडळी आंत घेऊन कष्टानें संपादन केलेल्या यशास भागीदार कां करितां? ह्यांत तुमचा नफा नाहीं. परंतु नुकसान होईल. तर अण्णा भोळा मनुष्य आहे त्यांस समजून सांगून हा बेत अगदीं रहित करावा असें वाटतें. सविस्तर हकीकतीच्या पत्राची अगदीं वाट पहात आहे. तेव्हां रा. गणपतराव किर्लोस्कर आहेत त्यांस सां-

गूनही ह्याबद्दल मोडता घालवावा. उत्तर मात्र यावें. कळावें हे विनंति. हें सर्व मंडळीस माझें सप्रेम सांगणें सांगून कुशल कळवावें.

**ग. मो. सो.** "

परंतु स्वतःला आवडलें ह्मणजे झालें. मग त्याबद्दल लोक कांहीं ह्मणाले तरी त्याची फारशी पर्वा करावयाची नाहीं अशापैकीं **अण्णा**-साहेबांचा स्वभाव असे. त्यांतून नाटक व नाटकमंडळी ह्मटली ह्मणजे त्यांना अतिप्रिय. "नाटकवाला महार असला तरी माझा स्नेही" असे नेहमीं त्यांचे उद्गार निघत व ते त्याप्रमाणें वागतही असत. शेवटीं **इचलकरंजी**कर मंडळीपैकीं माणसें आपल्यांत घ्यावयाचीं हा जो त्यांचा विचार होता तो त्यांनीं अमलांत आणून त्या मंडळींतलीं **विष्णू** व **पांडू** नांवाचीं चांगलीं कामें करणारीं स्त्रीपात्रें व इतर कामाचीं दोन माणसें आपल्या मंडळींत घेतलीं.

बाहेरगांवीं सफर करून येण्याचें ठरल्याप्रमाणें **किर्लोस्कर मंडळी** पुन्हां **मुंबई** व **पुणें** व इंदुर, **देवासें** व **अहमदनर** इतक्या शहरांतून फिरून आली. **इंदुरास** मंडळीची ही पाहिलीच खेप होती. त्या वेळीं **श्रीमंत तुकोजी महाराज** यांची कारकीर्द होती. महाराजांचे दोनी राजपुत्र ऐन तारुण्यांत आले होते. व संस्थानांतील जुनेनवे अनुभविक व तरतरीत मुत्सद्दी व कामगार आपल्या कामावर स्थायिक होते. त्यामुळें इंदूरची राजधानी सौभाग्यालंकारांनीं मंडित अशा एखाद्या पुत्रवतीप्रमाणें सुशोभित दिसत असे. या शहरीं मंडळीची फारच वाहवा झाली. शहरांतील लोकांकरितां "गौराकुंडा"वर स्वतंत्र मांडव घालून नाटकगृह उभारलें होतें. व राजवाड्यांत दसरा कचेरींतील भव्य दिवाणखान्यांत, राजघराण्यांतील मंडळी व सरदार दरकदार यांच्याकरितां मुद्दाम प्रयोगाची सोय करविली होती. सुमारें अडीच तीन महिने मंडळीचा मुक्काम **इंदूर** येथें होता. तोंपर्यंत मंडळीला, महाराजांच्या पदरचीं—ज्यांचा लौकिक पखवाज वाजविण्याच्या कामांत हिंदुस्थानांत गाजत होता असे **नानासाहेब पानसे, बंदे अल्ली** बीनकार, **चुन्ना** गाणारीण अशीं अद्वितीय गुणी माणसें, त्यांच्या गाण्यावाजविण्याच्या करमणुकी ऐकण्यास मिळाल्या. इंदूरच्याही लोकांना मंडळीनें चांगलें वेड लावलें होतें. मंडळी **इंदुराहून देवाशास** गेल्यावर **अण्णा**-

**साहेबांस महाराजां**च्या पदरीं असलेले **बाबा** वकील यांचें एक पत्र आलें होतें. त्यावरून इंदूरची मंडळी **किर्लोस्करां**स किती चहात होती हें समजून येतें:

" रा. रा. अण्णासाहेब स्वामीचे सेवेशीं—

कृतानेक साष्टांग नमस्कार. येथील कुशल तागाईत ता. १७ माहे सप्टेंबर सन १८८३ इसवी पावेतों मुक्काम इंदूर येथें यथास्थित आहे. मी देवासाहून आल्यापासून आपणाकडील पत्र किंवा वर्तमान कांहींच समजलें नाहीं. मीं एक पत्र येथून पाठविलें त्याचेंही उत्तर आलें नाहीं. तर असें न होतां पत्रद्वारें अथवा निरोपानीं वर्तमान कळवीत असावें. आपली व भाऊराव यांची प्रकृति चांगली झाल्याचें कळवावें. आणि आतां पुढें कसा काय विचार, देवासास नाटक होण्याचा अगर इंदुरास येण्याचा, किंवा उज्जनीस जाण्याबद्दल असेल तसा कळवितील. म्हणजे त्याप्रमाणें तजवीज ठेवण्यांत येईल. आपल्या भेटीची फार लालसा लागली आहे आणि येथील सर्व मंडळीसही आपण कधीं याल असें झालें आहे. आपली मर्जी असेल तर भाऊराव याजला एक रोजाकरितां पाठवितील. म्हणजे परस्परें सर्व मजकूर कळवून पुढें त्याप्रमाणें करण्याम ठीक. लष्करची गाणारीण येथें चांगली आली आहे. आपलें वारंवार स्मरण येत आहे. रा. बाळकोबाही आपले कडील वर्तमान विचारीत असतात. रा. भाऊराव, मोरोबा, गोपाळराव दाते वगैरे मंडळीस नमस्कार. मेहेरबानी असावी. कळावें. लोभ असावा ही विनंति.

**बाबाजी कृष्ण ऊर्फ बाबा वकील.**"

**देवासास बाळकोबा** कांहीं दिवस नसल्यानें मंडळी बसून होती. ती ते आल्यावर **नगरास** आली. **नगरास** त्या वेळीं नाटकगृह नव्हतें म्हणून लष्करांत युरोपियन लोकांचें जें " ग्यारिसन थिएटर " आहे त्यामध्यें पांच खेळ केले. हें नाटकगृह चार मैल लांब होतें तरी लोकांची गर्दी तेथें अतोनात जमत असे. तेथील त्या वेळचे असि० कलेक्टर **बाळासाहेब पानसे, हेडमास्तर गणेश जनार्दन आगाशे** बी. ए. **बापूसाहेब काथवटे** मुनसफ व **काशिनाथ बळवंत लिमये जगदादर्श** पत्राचे कर्ते इत्यादि मंडळीचें त्या वेळीं फार साहाय्य मिळालें. याप्रमाणें **किर्लोस्कर मंडळी** फिरत फिरत येऊन तिनें आपली पहिली सफर १८८३ च्या आक्टोबरच्या अखेरीस **नगरास** थांबवली. **किर्लोस्करांच्या** चरित्राचा येथें द्वितीय चरण संपला.

---

## अंतःस्थिति.

**अण्णासाहेबांस** जशी द्रव्यदृष्टि फार असे, तसा त्यांचा पैसे खर्चण्याच्या कामांत हातही फार सढळ असे; त्यांनीं खर्चाची व्यवस्था केवळ बादशाही थाटावर ठेवली होती. त्यामुळें तीन वर्षांत फक्त चार महिने मधून मधून खेळ होत होते, तरी कमींत कमी वीस हजार रुपये प्राप्ति झाली असेल, परंतु त्या मानानें मंडळीस मुळींच फायदा झाला नव्हता. त्यामुळें मंडळी जरा असंतुष्ट असे. **बाळकोबा** तर केव्हां केव्हां रुसून स्वस्थ बसत असत. व त्यामुळें मंडळीस ते येईपर्यंत खर्च खात पडावें लागे. **अण्णासाहेब** जितके खर्च करण्याच्या कामांत नेमस्तपणा सोडीत असत तितकाच कंजूषपणा दाखविण्याच्या कामांत **बाळकोबाही** नेमस्तपणा सोडीत असत. **अण्णासाहेबांना** जितकी चार मंडळी आपल्याकडे यावी, चैन करावी, मजा मारावी, आनंद करावा अशी अधिक हौस वाटत असे, तितकीच **बाळकोबाची** दृष्टि मंडळीच्यासंबंधानें केवळ, पलटणीच्या लोकांस जसा ठरीव शिधा ( Ration ) देऊन त्यांचा खर्च चालविण्याची पद्धत असते त्या पद्धतीवर काटकसरीची असे. सारांश खर्चाच्या बाबतींत दोघांचीं तोंडें भिन्न दिशेला असल्या कारणानें दोघांच्या विचारानें सर्व खर्च चालवयाचा असें जरी ठरलें होतें तरी ती व्यवस्था फारशी अमलांत येत नसे. **बाळकोबांचें** मग घरीं रुसूनबसणें हें शस्त्र तयार असे. त्यांनीं रुसून बसावें व मंडळींनीं मध्यस्ती करून त्यांना समजून आणावे असे प्रकार चालावयाचे. इंदुराहून मंडळी **देवाशास** गेल्यावर **बाळकोबा** मागें राहिले ही त्यांची रुसण्याची तिसरी खेप होती. **बाळकोबाच्या** स्वभावांत दोष एवढाच असे कीं, ते कांहींसें दुसऱ्याच्या तंत्रानें चालत. दुसरीं माणसें नेहमीं दूर असल्याकारणानें एकाच दिशेनें पहात असत. तेव्हां **बाळकोबांस** जी सल्ला मिळत असे ती अशा माणसांपासूनच मिळे. त्यामुळें **बाळकोबाच्या** नुकसानीला व मंडळीच्या नुकसानीला तीं कारण होत असत. **बाळकोबाचीं** पुढें जीं दोन पत्रें दिलीं आहेत त्यांवरून त्यांचें ह्मणणें काय असे हें स्पष्ट कळून येईल.

**पहिलें पत्र अण्णासाहेबांचा स्वारी काढण्याचा विचार झाला तेव्हां त्यांच्या पत्रास उत्तर ह्मणून आहेः**

" प्रियमित्र राजमान्य राजश्री अण्णासाहेब किर्लोस्कर—
मुक्काम मुंबई यांसी.

बाळकृष्ण नारायण नाटेकर याचा नमस्कार. आह्मी तारीख ८ माहे एप्रील सन १८८३ ईसवी रोजीं पुणें मुक्कामीं येऊन पोहोंचलों. आपण तार केलीत ती पोहोंचली होती; परंतु आमचे खासगी कामामुळें आमचें येणें तार आल्याप्रमाणें झालें नाहीं याबद्दलची माफी असावी. आपल्या मंडळीच्या सफरीचा विचार अमलांत आणण्याकरितां जीं जीं साधनें पाहिजेत तीं तीं आपण मिळविण्यांत इतकी खटपट चालविली आहे ही पाहून फार आनंद होत आहे. परंतु ही खटपट केवळ बाह्यस्थितीस अनुसरून मात्र चालविली आहे हें पाहून आह्मांस फार वाईट वाटतें. मंडळीची अंतःस्थिति चांगली आहे, पैशाची व्यवस्था नीट चालली आहे, असें असतां तींत सुधारणा करणेचें किंवा व्यवस्था करणेचें कारण दिसत नाहीं, असा कदाचित् आपला समज असेल; परंतु आपणांस मीं स्पष्टपणें आणखी एकवार कळवितों कीं माझा समज तसा नाहीं व मागेंही तसा कधीं नव्हता; व असा माझा समज फिरेतोंपर्यंत दुसऱ्या कोणतेही कामास लागणें हें मला प्रशस्त दिसत नाहीं. खर्च करणें तो माझ्या व आपल्या अभिप्रायानुरूप करणें असें बहुत वेळां निरनिराळ्या शब्दांनीं आपणांस दर्शविलें होतें व आपणही तसें करणेंस कबूल केलें होतें. असें असून तशी वागणूक आपणांकडून झाली नाहीं; आणि अशीच जर वागणूक राहील तर सफरीपासून फायदा होण्याचें चिन्ह मुळींच दिसत नाहीं. सफर जवळ येऊन ठेपली आहे व मीही योग्य वेळीं आपणांस कळवितों कीं, पैशासंबंधीं व मंडळीच्या संबंधीं योग्य तजवीज राहत असल्यास, पैशाची व्यवस्था आमच्या व आपल्या अभिप्रायानुरूप होण्याचा ठराव पक्का होत असल्यास सफरीस जाण्याचा विचार करावा. याजप्रमाणें पुणें व सोलापूर येथें आलीकडे खेळ होऊन जी रक्कम मिळाली, तिचा जमाखर्च आपण ठेविला आहे. खर्च करण्यांत माझें मत आपण घेतलें आहे असें मला आठवत नाहीं; व तो जमाखर्च बरोबर आहे कीं नाहीं हें पहाण्यास मला सवड मिळाली नाहीं. तर हें पत्र पावतांच जमाखर्चाच्या वह्या इकडे पाठवून याव्या. असें केल्यानें कदाचित् आपली सफर लांबणीवर जाईल व तेणेंकरून कांहीं दिवस रिकामे जातील हें खरें; परंतु केलेला जमाखर्च पाहून घेऊन पुढें योग्य नियम ठरवून अमलांत आणणें हें काम सर्व कामांत मला फार महत्वाचें वाटतें. तर त्वरा करून हिशोबाचे कागद इकडे रवाना करण्यांत यावे व मंडळीच्या स्थितीसंबंधीं व पैशाच्यासंबंधीं मी ह्मणतों त्याप्रमाणें व्यवस्था ठेवणार किंवा नाहीं हें कळवावें. आह्मांकडील पत्र येईल त्याप्रमाणें खेळाचा दिवस ठरवावा अगोदर ठरवूं नये. कळावें.

आपला,
**बाळकृष्णबोवा नाटेकर.** "

दुसरें पत्र मंडळी देवाशास गेल्यावर **बाळकोबा इंदुरास** राहिले होते तेथून पाठविलें आहेः

" रा० रा० अण्णासाहेब किर्लोस्कर यांसी. नमस्कार वि० वि० आपलें पत्र आलें तें पोंचलें व या पत्राबरोबर श्रीमंत दादासाहेब यांस विदागीबद्दल लिहिलें तें पत्र त्यांना दिलें. परंतु माझी प्रकृति बरी नाहीं. अगदीं शक्तिहीन जहालों आहे व डोकें फिरत असून चित्त स्थिर होत नाहीं. इतकेंही असून आपणांस आमचे रुपयांबद्दल राजमान्य राजश्री बापूराव यांनीं रजिस्टर पत्र पाठविलें आहे. व माझेंहि पत्रांत रुपयांबद्दल लिहिलें होतें व तें देणें योग्य आहे. तर रुपये लिहिल्याप्रमाणें पाठवून देण्याची व्यवस्था जर आपण करीत नाहीं तर खर्चाच्या संबंधानें नुकसानीचा दोष आह्मांवर येणार नाहीं हें आपणांस कळावें.

आ.

**बाळकृष्णबोवा नाटेकर.**

हेच पत्रीं सर्वत्र लहान थोर मंडळीस माझा आशीर्वाद व नमस्कार."

**सोलापूर, मुंबई, इंदूर, देवासें, नगर** वगैरे ठिकाणीं मुबलक पैसा मिळूनही कोणास प्राप्ति विशेष झाली नाहीं. याचें कारण मंडळीस दरमहा पगाराची वगैरे व्यवस्था ठरलेली नव्हती व खर्चाचीही व्यवस्था ठरलेली नव्हती. येईल ती जमा, होईल तो खर्च, ज्याला मिळेल त्याला मिळेल, नाहीं त्याला नाहीं, असाच प्रकार चालला होता म्हटलें तरी हरकत नाहीं. **अण्णा**साहेबांचें लक्ष खर्चाच्या बाबींकडे मुळींच नसे. एखादी गोष्ट मनांत आली कीं, ती झाली ह्मणजे झालें. एखाद्याला कांहीं द्यायचें मनांत आलें कीं, मग त्याच्या योग्यतेपेक्षांही जास्ती देत असत. अशामुळें स्वार्थसाधु व पुढें पुढें करणारांचा मात्र फायदा होत असे. **इंदुरास** एक "सत्यनारायण" केला होता तर त्याला सुमारें दोनशें रुपये खर्च केले. **मोरोपंत अभ्यंकर** ह्मणून **बाळको**च्या वशिल्यानें एक गृहस्थ मंडळींत येत जात असत. ते पुढें कोठें 'स्टेज म्यानेजर' ह्मणून नुसती पडद्याची व्यवस्था पाहूं लागले तर सुमारें महिन्याच्या अवकाशांत पन्नास पाऊणशें रुपये घेऊन गेले. **रामगीरबोवा** ह्मणून एक गृहस्थ **अण्णा**साहेबांच्या पुढें पुढें करीत असत. तेवढ्यावरच पन्नास रुपये उसनवार नेऊन दाबून बसले. शेवटीं त्या रुपयांची आशा सोडावी लागली. **पुण्यांतील शुक्रवार** पेठेंतील **वाळेकरांची** हवेली मंडळीकरितां भाड्यानें घेतलेली होती. तिचें भाडें या **रामगीरबोवांच्या** मा-

र्फत पोंचलें होतें; परंतु त्या वाड्याच्या गुमास्त्यानें भाड्याबद्दल दोनशें रुपयांची फिर्याद अण्णासाहेबांवर लावली. दोनशें रुपयांकरितां कोडताची पायरी कोठें चढायला जा ह्मणून अण्णासाहेबांनीं पुनः भाड्याबद्दल दोनशें रुपये भरले; तिकीटविक्रीच्या कामावर असलेल्या गांवठीसाहेबांस शेंकडा दोन रुपये कमिशन असे. एक खेळ झाला कीं, तो सहज पंधरा सोळा रुपये घेऊन बसे. अशा तऱ्हेची खर्चाची अचाट व्यवस्था असे. त्यामुळें मंडळींत श्रम करणाराला जसा मोबदला मिळावा तसा मिळाला नव्हता. मोरोबा एकमार्गी असत. त्यांचें पैशाकडे तादृश पाहणें नसे. अण्णासाहेब करतील तें खरें, असें त्यांचें पाहणें असे. परंतु या अव्यवस्थेनें त्यांचेंही मन या खेपेस विटलें होतें. भाऊरावांस प्रथमच पांचशें रुपये देऊन आणलें होतें व त्यांस येऊन नुकतें वर्षच झालें होतें; तरी त्यांच्या घरचीं पत्रें अण्णासाहेबांकडे भाऊरावांस धाडून देण्याबद्दल येऊं लागलीं. त्यांपैकीं एक पत्र पुढें दिलें आहे.

" **बडोदें**, ता. ६।९।८३

राजमान्य राजश्री अण्णासाहेब किर्लोस्कर

स्वा०

कृतानेक सा०नमस्कार. वि०वि० ता०म० पावेतों सर्वत्र सुखरूप. आपल्याकडील कुशल वर्तमान चि. भाऊचे पत्रांत वरचेवर लिहून येत असतें त्यावरून समजतें. हल्लीं त्याचें पत्र आलें आहे. त्यांत त्यानें प्रकृति बिघडली आहे ह्मणून लिहिलें. त्यावरून काळजी लागली आहे. व त्यास इकडे येण्याबद्दल वडिलांच्या सूचनेवरून पत्र लिहिलें आहे; व आपल्यासही त्यांचे सांगण्यावरून लिहीत आहे. आह्मीं पूर्वी आपलें पत्र आलेवरून उभयतांतून कोणी आपल्या कंपनीमध्यें येऊं असें मूलस्वभावानें व पुरता विचार न करितां कबूल करून थोडे दिवसांत परत येण्याचे बोलीनें उभयतांचे विचार ठरून भाऊ तिकडे आला. आजपर्यंत वडिलांनीं त्याची मार्गप्रतीक्षा करून हल्लीं त्यास येण्याविषयीं फारच आग्रह धरिला आहे. ज्या कामाकरितां रवाना केला त्या कामाचा उपयोग जसा आपल्या मनांत होता त्याप्रमाणें ईश्वरेच्छेनें घडून आला आहे. आतां यापुढें त्यास ठेवण्याची इच्छा वडिलांचीही नाहीं. करितां हें पत्र पावतांच उत्तराबरोबर त्याची रवानगी मेहेरबानीनें होईल अशी आशा आहे.

संकेताप्रमाणें थोडे दिवसांत अमुक रक्कम देऊं अशाबद्दल मुंबईमुक्कामीं बोलणें झाल्यावरून मीं आपल्याच मुकत्यारीनें त्यास तिकडे आपले सेवेंत ठेवण्याचें ठरवून आजदिवसपावेतों पांचशें रुपये येण्याबद्दल वाट पाहिली. अद्यापि त्याजकडून खुलासाही आला नाहीं. केवळ तो स्वतंत्रपणें एकटाच आहे असें समजून खुशाल आहे. अशा स्थितींत असल्याचें त्याचे वर्तनावरून समजतें. असो. आह्मांस एकंदर आपल्याकडील एक वर्षांत मिळकत सुमारें ६५० रुपये आले. आमचेकडून कार्यभाग जर चांगला झाला असून त्याजबद्दल पैदास्त झाले मुदतींत पाहतां मिळकतीच्या मानानें फारच थोडी. इतकी सर्वांचीच मिळकत असेल असें वाटत नाहीं. असो. आह्मी मिळकतीवर लक्ष देतच नाहीं. व मीं तर आपल्या सुस्वभावाकडेच वळून इतके मुदतीपर्यंत त्यास तिकडे ठेवला. आतां कांहीं ठेवण्याची सोय नाहीं. तरी मेहेरबानीनें त्यास इकडे पाठवून द्यावें. किती मुदत हें त्यास आज पत्र लिहिलें आहे त्याजवरून ध्यानीं येईल. विचार केला असतां आह्मांस आपल्या पंचायतनांत भागाप्रमाणें असावें असा अजमास होता. परंतु पैदास्त झाल्यावरून असें अनुमान होतें कीं, त्याचा एक दशांश सुद्धां आह्मांला मिळाला नाहीं, असा अदमास वाटतो. इतउत्तर आपण आह्मांवर असाच लोभ ठेवून आपण त्याची रवानगी कराल अशी उमेद धरून हें पत्र लिहिलें आहे. मात्र ५०० रुपयांबद्दल ध्यानीं येऊन तजविजीसह पाठविण्याचें करावें. नाहीं तर इतके दिवसांत मीं आपला स्नेहसंबंध संपादला त्याचें चीज होणार नाहीं. वडिलांना आह्मीं जें सांगितलें होतें त्याप्रमाणें रक्कम १००० पर्यंत वर्षांत येईल असें त्यांचे मनांत आह्मीं भरवून दिलें होतें. तें आपणांस कळण्याकरितां आतां लिहिणें भाग पडलें. शेवेशीं श्रुत होय हे विनंति.

आ० **रामभाऊ** "

मंडळी **नगराहून** घरोघर गेली ती बहुतेक बेदील होऊनच गेली होती; व कदाचित् **किर्लोस्कर** संगीत मंडळीची इतिश्री येथेंच होते कीं काय अशीं चिन्हें भासूं लागलीं होतीं. परंतु **अण्णासाहेब** धीराचे असल्यानें त्यांनीं न डगमगतां पुढची योजना चालविली होती. ती क्रमानें कळून येईलच.

---

## पुनः नवीन तयारी.

अण्णासाहेब **नगराहून** आल्यावर पुनः **इंदुरास** गेले. तेथें **श्रीमंत बाळासाहेब** यांच्या मेहेरबानीनें त्यांस साठ रुपये दरमहाची व्हाईस प्रिन्सिपाल ट्रेनिंग कालेज ह्मणून व **भाऊराव** यांस कारकुनी-

ची पसतीस रुपये दरमहाची नोकरी लागली—किंवा तैनात सुरू झाली म्हटलें तरी चालेल. कारण या दोघांनाही जी नोकरी म्हणून लागली होती ती जाऊन करण्याचा प्रसंग कधींच आला नाहीं. इंदुरास मंडळी गेली होती तेव्हांपासूनच श्रीमंतांची या उभयतांवर फार मेहेरबानी होती. तिचा असा चांगला उपयोग झाला. तरी **अण्णां**ची नाटकासंबंधाची हौस पुरी झाली नव्हती. पुनः मंडळी जमवून नाटक उभारण्याची त्यांची उमेद होतीच. कदाचित् **बाळकोबा** आले नाहींत, तरी नडूं नये म्हणून त्यांच्या जागीं एखादा गाणारा मनुष्य मिळविण्याची त्यांनीं खटपट चालविली होती. सुदैवानें त्यांच्या मनाप्रमाणें गोष्टी घडून येत गेल्या. **मोरोबा** व **पनवेली**चे सावकार **विठोबा खंडाप्पा गुळवे** हे **काशी, कलकत्ता** इकडे फिरण्यास निघाले होते. त्यांची व **अण्णा**साहेबांची गांठ पडून पुनः नाटक जुळविण्यास त्यांनीं **अण्णास** उत्तेजन दिलें, व पैशासंबंधाची व व्यवस्थेसंबंधाची सर्व जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. हा योग केवळ **गुळवे** यांचा **मोरोबा**वर विशेष लोभ होता म्हणून जुळून आला. याच संधीस **रामभाऊ** नांवाचे गृहस्थ **अण्णा**साहेबांस मिळाले. हे वयानें तरुण असून यांचा आवाज चांगला होता. त्यामुळें **बाळकोबा**च्या जागीं उपयोगीं पडतील म्हणून **अण्णा**नीं यांस ठेवून घेतलें. *

**अण्णासाहेब, भाऊराव, रामभाऊ, गांवठीसाहेब** वगैरे मंडळीला घेऊन **इंदुरास** स्वस्थ बसून होते, ते **कलकत्त्याचें** प्रदर्शन पाहून एकटेच **मुंबईस** आले व मंडळी जमविण्याचें ठरल्यावर त्यानीं **मोरोबा** व **भाऊराव** यांस पुढील पत्रें लिहिलीं:

---

* हे गृहस्थ रामचंद्र विठ्ठल उर्फ रामभाऊ किंजवडेकर हे होत. **अण्णासाहेबां**च्या योगानें ज्यांचा उदयकाळ आला त्यांपैकीं हे एक आहेत. हे मूळचे **गोंवें** प्रांतांतील **साखळी** गांवचे राहणारे. हे बरेच काव्य पढले होते. पुढें कांहीं उद्योग पहावा म्हणून घर सोडून मुंबईस आले, बरोबर त्यांची बहीण होती. तिच्या नवऱ्याचा वरींच वर्षे पत्ता लागत नव्हता तो लागल्यावर तिलाही त्याच्याकडे पोंचविण्याकरितां बरोबर घेतलें होतें. आणखी मणेरीकर नांवाचे त्यांचे एक नातेवाईक, हेही उद्योग पहाण्याच्या निमित्तानें निघाले होते. तिघांना घरून निघतांना एका

( टीप पुढें चालू )

" मुक्काम मुंबई ता. १३ मार्च १८८४

" परमप्रियकर राजमान्य राजश्री मोरोबा वाघोलीकर यांस विनंति विशेष. तुमचें पत्र हरिभक्तपरायण रा. मार्तंडबावा वाघोलीकर यांजबरोबरील अत्तांच पावलें. पत्र लिहिल्याप्रमाणें तजवीज करण्यास अवकाश उरला नाहीं. कारण बहुत दिवस मुंबईस राहिल्यानें मीं आजच इंदुरास जाण्याची तयारी केली आहे. मी सुमारें पंधरा वीस दिवसांत इंदुराहून तिकडील मंडळीसह येतों. तुह्मीं तेथून येतांना विसू, मार्तंडा, रघुनाथ व आल्यास शंकर यांस घेऊन पनवेलीस जावें. पनवेलीस जातांच घराची व सर्वप्रकारची तजवीज करून ठेवावी. तिकडून ती मंडळी आणण्यास सुमारें दहा एक रुपये खर्चास लागतील तेवढे कोठूनही तजवीज करून त्यांस बरोबर घेऊन यावें. येथें नागुबावा एकटे आहेत. त्यांस पनवेलीस जाण्यास सांगितलें आहे. तो तुह्मांस पनवेलीस भेटेल. सारांश आतां हुशारीनें सर्व कामें तुह्मांसच बजाविलीं पाहिजेत. मुलाबद्दल **अप्पासाहेबांनीं** लिहिलें आहे त्याप्रमाणें तुह्मीं पनवेलीस जातांच स्वतः मुलगा पाहून ठरवून घ्यावें. मुलगा कोणच्या प्रकारचा आपणास उपयोगी आहे हें ठाऊकच आहे. गोपाळराव दाते यांस सांगावें कीं, आह्मीं गेल्यावर पत्र पाठवूं त्याप्रमाणें करावें. तुह्मीं पनवेलीहून मुंबईस आलांच तर आमच्या घरीं भेटत आहां. मी सडा गेलों आहें. मंडळी येथेंच आहेत. गणपतराव किर्लोस्कर यांनीं बिऱ्हाड बदलून कांदेवाडींत पालेकर यांचे घरीं आले आहेत. कळावें बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति.

**अण्णा किर्लोस्कर."**

---

( टीप मागील पृष्ठावरून )

ज्योतिष्यानें एक मुहूर्त काढून याच मुहूर्तावर निघाल्यास तुमची कार्यसिद्धि हटकून होईल ह्मणून सांगितलें होतें. त्याप्रमाणें तिघांचेंही नशीब पुढें चांगलें उघडलें. तो मुहूर्त शके १८०४ सालच्या अश्विन महिन्यांतील वद्य सप्तमी होता. पुण्यांत संगीत सौभद्र नाटकाचा पहिला खेळ झाला. त्या दिवशीं तिकिटें मिळण्याची मारामार पडूं लागली. रामभाऊ व मणेरीकर ह्यावेळीं तेथें गेले होते. त्यांस तो खेळ मोठ्या मिनतवारीनें पाहण्यास सांपडला. तेच रामभाऊ पुढें थोड्याच वर्षांनीं किर्लोस्कर मंडळीचे एक प्रमुख बनले. व हल्लीं ते मंडळीचा प्रतिपाळ करून आनंदांत आहेत. किर्लोस्कर मंडळीचा प्रयोग प्रथम पाहत असतांना, या मंडळीचें चालकत्व माझ्याकडे येईल व मी नाटकविषयांत लोकरंजन करीन ही त्यांच्या मनांत कल्पनाही नसेल. मणेरीकर हे धारवाड हायस्कुलांत ७० रुपयांवर ड्राइंगमास्तर आहेत. व रामभाऊंच्या बहिणीस नंतर संतति होऊन ती पतिसमवेत आनंदांत कालक्रमणा करीत आहे. त्या ज्योतिष्यानें निघतांना रामभाऊस एक अधेली व मणेरीकर यांस एक रुपाया आपलें प्रसादचिन्ह ह्मणून दिलें होतें. तें या उभयतांनीं मोठ्या भक्तिपूर्वक जतन करून ठेवलें आहे.

मंडळीच्या तयारीचें मुख्य ठिकाण आजपर्यंत पुण्यांत असे. परंतु अपासाहेब गुळवे यांनीं पुढाकार घेतल्यापासून तें पनवेलीस करावयाचें ठरलें व त्याप्रमाणें अण्णासाहेबांनीं भाऊरावास पुढील पत्र लिहिलें:

"मुक्काम मुंबई ता. २८ मार्च १८८४.

चिरंजीव राजश्री भाऊराव कोल्हटकर यांस अनेक आशीर्वाद विशेष. मी पुण्यास गेल्यावर वुचके यांजकडून पत्र लिहिवलेलें पोंचलेंच असेल. मुंबईहून पनवेलीस जाऊन आलों. नाटक तयार करण्याची जागा पनवेल ठरली आहे. मोरोबा घरीं जाऊन लवकरच येणार. ते येतांना पुण्याची मंडळी घेऊन येणार. तुह्मांस इकडे येण्याबद्दल मी पत्रच लिहिणार होतों. परंतु श्रीधर विठ्ठलच्या कामासंबंधानें मलाच इंदुरास आलें पाहिजे. सबब तसें लिहिलें नाहीं. मी पाडवा होतांच रा. बाळाभाऊसहवर्तमान निघून येतों. बाळाभाऊ खुशाल आहेत. लवकरच घेऊन येतों; ह्मणून तीर्थस्वरूप नानासाहेब व सौ० मातोश्री आईसाहेब यांस समक्ष जाऊन अगत्य कळवावें. रा. रा. कुंटे सो० यांस कळवावें कीं, दाते यांचे कामासंबंधें ए. पासून जी. पर्यंत अस्सल कागद मी घेऊन येतों. व लेले यांस माझा नमस्कार प्रविष्ट करून कळवावें कीं, आमचा जुना छापखाना मी येतांना आणतों. सरकारांत फरोक्त करून देऊन टाकण्याची तजवीज असावी. अद्याप बाळकोबाच्या जाग्यावरच्या मनुष्याची योजना होईना. बाकी सर्व मंडळी मिळण्यासारखी आहेत. तरी तुह्मी रा. केशवबोवाबद्दल लेले व कुंटे यांचे विचारें त्यांस भीड घालून ठरवून घेतल्यास बरें पडेल, त्यांस आह्मीं दरमहा पन्नास रुपये पर्यंत देऊं. तुह्मी दुसरा लावणी ह्मणणारा कोण आहे ह्मणत होता. त्याचाही ठराव करून ठेवावा. मी तेथें आल्यावर दोन चार रोजांत निघण्याचें होईल. लेले यांचे द्वारें श्रीमंतांचे कानावर हा मजकूर घालून तुमचीही मोकळीक करून ठेवावी. वरकड मजकूर मी समक्ष आल्यावर कळेल. कळावें बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद. हेंच पत्रीं रा. गोविंदराव व रामभाऊ यांस नमस्कार. वरतीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. लोभ करावा ही विनंति.

अण्णा किर्लोस्कर"

पनवेलीस मंडळी जमल्यावर नवीन नियम वगैरे करून व्यवस्था ठरली. त्या व्यवस्थेंत अण्णासाहेब, मोरोबा, भाऊराव, रामभाऊ हे हिस्सेदार झाले; व अपासाहेब गुळवे हे जनरल म्यानेजर झाले. विशेष खर्च व्हावयाचा तो त्यांच्या मंजुरीनें व्हावयाचा. नाटक बसविण्यासंबंधाची सर्व व्यवस्था व मंडळींतील कोणास पगार वाढविणें, दंड

करणें यासंबंधानें सर्व मुक्त्यारी अण्णासाहेबांकडे असे. नाटकगृहाकडची व्यवस्था पाहण्याकरितां निपाणीकर यांस स्टेज म्यानेजर नेमलें. व एकंदर व्यवस्था पाहण्याकरितां सेक्रेटरीची एक स्वतंत्र जागा काढून आपासाहेब यांच्या वशिल्याचे एक गृहस्थ त्रिंबक नारायण साठे यांस त्या जागेवर नेमलें. बाकीची मंडळी पगारावर ठेवली. पनवेलीस याप्रमाणें तयारी चालत असतां खर्चाचा बोजा वाढूं नये ह्मणून सवडीसवडीनें तेथल्या तेथेंच कांहीं खेळ करण्याचें ठरलें. त्याप्रमाणें दोन खेळ झाले. त्याची हकीकत पुढील पत्रांत आहेः

" पनवेल ता. १०।५।८४

चिरंजीव राजश्री शंकरराव मुजुमदार यांस आशीर्वाद विशेष. पनवेल मुक्कामीं झालेले दोन खेळ एक दोन वेळां करून खर्चापुरते रुपये काढून घ्यावे असा राजमान्य राजश्री अप्पासाहेब गुळवे यांचा विचार ठरला आहे. त्याप्रमाणें आठ दहा रोजांत पहिला ह्मणजे शाकुंतल चार अंक हा खेळ व्हावयाचा. यास्तव तुह्मीं पत्र पोंचतांच इकडे निघून येण्याचें करावें. तुह्मी याल ते मुंबईस येऊन दुसरे दिवशीं सकाळीं सात वाजतां पनवेलच्या आगबोटींत बसून इकडे यावें. येतांना अप्पासाहेब गुळवे यांच्या आदितवार पेठेंतील वाड्यांत आमचा तंबोरा आहे तो नारायण गडी याजकडून मागून घेऊन सुरक्षित घेऊन यावें. तह्मीं येथें याल तें कोणासही कळवूं नये. लोभ करावा हे विनंति.

ता॥ कलम. येण्यास हरकत करूं नये. खानदेशांत जावयाचें असेल तर येथील चार खेळ संपल्यावर पाहिजे तर जावें. लोभ करावा हे विनंति.

अण्णा किर्लोस्कर."

सदरहू .... यांचा तादृश उपयोग पुढें फार दिवस होण्यासारखा नव्हता हें पूर्वीं सांगितलेंच आहे. नाटकांतला मुलगा आपल्या पूर्वस्वरूपांतून निरुपयोगी होऊं लागला ह्मणजे त्याची जी अपेक्षा होते तें समजण्यापुरतें तारतम्य त्यांस होतें, त्यामुळें पूर्वीं ज्या पेशानें ते मंडळींत होते त्याच पेशानें पुढें राहण्याची त्यांची इच्छा नव्हती. अण्णासाहेबांनीं त्यांस त्या पेशांतून काढून सेक्रेटरीच्या जागेवर नेमण्याचें आश्वासन देऊन ठेवलें होतें. परंतु गुळवे यांनीं मंडळीचें पुरस्कर्तृत्व घेतल्यामुळें अण्णासाहेबांकडे एक प्रकारचा अंकितपणा आला होता. त्या कारणानें त्यांनीं शिफारस केलेल्या गृहस्थाची त्या जागेवर नेमणूक झाली हें स्वाभाविकच झालें. तरी पण अण्णासाहेबांची

इच्छा....यांनीं मंडळींत असल्याबद्दल फार होती; ह्मणून त्यांनीं एक पत्र लिहिलें तें खालीलप्रमाणें:

" पनवेल ता. २५ मे १८८४.

राजमान्य राजश्री शंकर बापूजी मुजूमदार मुक्काम पुणें यांसी—

स्ने० अण्णा किर्लोस्कर यांचे शिरसाष्टांग नमस्कार. विनंति विशेष तुह्मांकडून दोन पत्रें आलीं तीं पोंचलीं. त्याप्रमाणें तुह्मीं कां येत नाहीं तें कळत नाहीं. तर पत्र पावतांच निघून यावें. येथें येऊन राहणें न राहणें तुमचे मर्जीवर आहे. परंतु एकवार येऊन निदान भेटून जाणें. तुह्मीं यावें अशी मोरोबांचीही इच्छा फार आहे. ती पूर्ण करावी. येथें शाकुंतल चार अंक व सौभद्र तीन अंक असे दोन प्रयोग झाले, मजा फार उत्तम झाली. दोन्हीही खेळांसुद्धां सुमारें चारशें रुपयांची प्राप्ति झाली. लहान गांवाच्या मानानें पुष्कळ पैसा झाला असें आह्मांस वाटतें. शिवाय नाटकगृहाची जागा फार लहान, सुमारें दोन तीनशें माणसें शिकस्तीनें बसण्यासारखी आहे. येण्यास अनमान करूं नये. कळावें. वहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति.

अण्णा किर्लोस्कर. *

रा० शंकरराव यांस भाऊ कोल्हटकर यांचा शिरसाष्टांग नमस्कार पत्र पावतांच यावें. "

याप्रमाणें प्रथम ... पनवेलीस गेले. मंडळीची व्यवस्था बरी चालली होती. पण....यांचें तेथें इतर काम असलेलें दिसलें नाहीं ह्मणून जरूर लागलीच तर येईन असें अण्णासाहेबांस सांगून ते परत आले. मंडळीनें मग नवीन नाटक तयार होईपर्यंत कल्याणास कांहीं खेळ करून येण्याचा विचार केला. त्याप्रमाणें त्यांचा बेत ठरल्यावर पुन्हां.... यांस पत्र आलें. त्यामुळें ते कल्याणास मंडळीची वेळ भागविण्याकरितां गेले. अण्णासाहेबांस त्यांच्या संबंधानें एक प्रकारचें कोडें पडल्यासारखें झालें होतें. पूर्वीच्या कामावरच....यांनीं रहावें असा अण्णांचा रोख दिसला. तेव्हां .... यांनीं त्यांची तेवढी वेळ भागविली व पूर्वीच्याच कामावर मीं रहावें अशी आपली इच्छा असेल तर....रुपये पगार मिळाला ह्मणजे मी येईन असें स्टेशनवरून सांगून पाठवून मंडळींचा

* सदरहू पत्र दुसऱ्यानें लिहून अण्णासाहेबांची फक्त त्यावर सही होती. ह्मणून नेहमींची " चिरंजीव " या शब्दानें लिहिण्याची पद्धत चुकून त्या ठिकाणीं " रा० रा० " हे शब्द आहेत.

निरोप घेतला. या निरोपाचा जबाब सुमारें पंधरा दिवसांनीं आला तो पुढें लिहिल्याप्रमाणें होताः---

" मुक्काम पनवेल ता. २२ जून १८८४.

राजेश्री शंकरराव मुजूमदार मुक्काम पुणें यांसी अण्णा किर्लोस्कर यांचें अनेक शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. तुमचा निरोप पोंचला. त्याजबद्दल आह्मीं व श्रीमंत अप्पासाहेब गुळवे मिळून विचार करितां ... रुपये पगार फारच जास्त होतो. तरी उभयतांचे विचाराअंतीं असें ठरलें कीं, तुह्मांस .... पासून ... रुपये पर्यंत पगार द्यावा. तर तुह्मीं निघून यावें. अधिकोत्तर नाहीं. कळावें. बहुत काय लिहिणें लोभ करावा ही विनंति.

अण्णा किर्लोस्कर. "

या पत्रांत **अण्णासाहेब व गुळवे** यांचे विचारें जो पगार देण्याचें योजलेलें होतें तो .... यांनीं मागितलेल्या दरमहापेक्षां निम्यांनीं कमी होता. या पगारावर ... गेले नाहींत व मंडळीचें अडून राहिलें नाहीं. व अशा रीतीनें .... संबंधाचा भाग सलोख्यानें मिटला.

याप्रमाणें नवीन तयारींत मंडळींतील **बाळकोबा** व .... हीं दोन पात्रें कमी झालीं. **अण्णासाहेबांनीं** हा धंदा ह्मणून पुन्हां सुरू केला तेव्हां त्यांनीं धंद्याच्या दृष्टीनें येणाऱ्या अडचणी होतील तितक्या कमी केल्या हें योग्यच केलें. परंतु **बाळकोबा** हें पात्र केव्हांही लोकांस व मंडळीस हवें असणारें होतें. तेव्हां तें नसल्याबद्दल हळहळ उत्पन्न होणें स्वाभाविक होतें. तथापि ते गवई पेशानें असल्याकारणानें त्यांच्या गुणाचा फायदा लोकांस अन्य तऱ्हेनें मिळण्यासारखा होता. व त्यामुळें त्यांचा नाटकाशीं संबंध सुटला तरी त्यांची विशेषशी नुकसान होण्यासारखी नव्हती. इतकेंच नव्हे, तर नाटकाच्या योगानें त्यांची प्रसिद्धि अधिक झाल्याकारणानें पर्यायानें त्यांच्या गुणाची अधिक चहा होण्यास एक प्रकारचा नवीनच मार्ग उत्पन्न झाला होता म्हटलें तरी चालेल. परंतु दुसऱ्या पात्रासंबंधानें मात्र उलट प्रकार झाला. नाटककलेच्या संबंधानें प्रतिकूल ग्रह पूर्वीपासून आहेत, ह्याला जीं कारणें आहेत त्यांत नाटकाच्या एकंदर परिस्थितीमुळें होतकरू मुलांचा जन्म अल्प वयांतच वाया जातो हें एक आहे. या परिस्थितीचा अम्मल प्रस्तुत पात्रावर होण्यास संगीत, नाटकापासूनच सुरुवात झाली होती व तिच

परिणाम असा झाला कीं, या पात्राचा भावी चारित्रक्रम एकदम निराळा झाला. असो.

**बाळकोबा**ची शाकुंतल मधली कण्वाची भूमिका स्वतःला करतां येण्याकरतां **अण्णा**साहेबांनीं पुनः नवीन पद्यरचना केली. ही रचनाही फारच रसभरित झाली आहे. **पनवेल** व **कल्याण** मुक्कामीं त्यांनीं ही भूमिका घेतली होती. कृष्णाचें काम **मोरोबा**च करीत असत. पुढें **रामभाऊ** करूं लागले. **कल्याणा**स चार खेळ करून मंडळी पुनः **पनवेलीस** आली; व **अण्णा**साहेब नवीन तिसऱ्या नाटकाच्या तयारीला लागले.

---

## रामराज्यवियोग.

नवीन नाटक करतांना **अण्णा**साहेबांस, पार्वतिपरिणय, उत्तररामचरित्र, मालतिमाधव, हीं संस्कृत जुनीं नाटकें, व हरिश्चंद्र, श्रियाळचरित्र हीं पौराणिक कथानकें सुचविण्यांत आलीं होतीं. मालतिमाधव नाटक संगितांत करावें अशी **श्रीमंत बाळासाहेब होळकर** यांची इच्छा होती. म्हणून **अण्णा**साहेबांनीं आपल्या वडिलांकडे तें भाषांतर करण्याकरितां पाठविलें. परंतु वस्तुतः त्यांचा कल वरील कोणत्याही नाटकाकडे नव्हता. “ मालतिमाधव तर माझ्या दृष्टीसमोर नको. ” असें ते म्हणत. त्यांनीं या खेपेस जें नवीन नाटक हातीं घेतलें होतें तें नाटक व तें रचण्यास सुरुवात करण्यापूर्वी **इंदूर** येथें ते ज्या दरजाच्या परिस्थितींत मिसळत होते, ती परिस्थिति या दोन्ही गोष्टी एकदम ध्यानांत घेतल्या म्हणजे अशी कल्पना होते कीं, त्या नाटकाची कल्पना **अण्णा**साहेबांच्या मनांत येण्यांस **इंदूर** येथें त्यांचें वास्तव्य व **श्री० बाळासाहेब** यांचा निकट सहवास हीं कारण झालीं असावीं. या वेळेस **श्री० तुकोजी महाराज** आपल्यावरील राज्यभार हळू हळू हलका करण्यास योग्य अशा स्थितीप्रत आले होते. व श्री० **बाळासाहेब** हे यौवराज्यपदास पूर्णपणें योग्य झाले होते. **अण्णा**साहेबांनीं रचलेल्या रामराज्यवियोग नाटकाच्या तिसऱ्या अंकांतील दशरथ सिंहासनोत्सर्गाचा प्रवेश वाचला म्हणजे हीच कल्पना दृढ होते.

**दशरथाचे** भाषणांतः

"गुरुजी पुत्र कर्ते झाले असतां त्यांस एकीकडे ठेवून लोभानें आपण राज्यासक्त होणें, हें मोठें लाजीरवाणें आहे. कारण, त्याप्रासून अनर्थ मोठे होतात, तशा राजकुमारांना मग—

[ दिंडी. ]

**निरुद्योगें आलस्य शिरे वेगें ॥ दुष्टसंगें दुर्व्यसन त्यासि लागे ॥ तरुणपणीं ते संपत्तिमदबलानें ॥ नीच कामीं रत होति कीं सुखानें ॥**

याकरितां त्यांचें मन अन्य विषयाकडे फारसें गुतलें नाहीं, तोंच त्यांना या राज्यरूप गाड्याच्या धुरीला जुंपून टाकलें म्हणजे त्यांस कमीजास्त चेष्टा करण्यास फुरसतच राहत नाहीं. शिवाय, या राज्यलक्ष्मीला वारवधूप्रमाणें जसा तरुण राजा प्रिय होतो, तसा वृद्ध आवडत नाहीं."

इत्यादि जो प्रसंग घातला आहे त्यास स्फूर्ति तेथील त्या वेळच्या परिस्थितीवरूनच झाली असली पाहिजे असें स्वाभाविक वाटतें. याशिवाय नवीन नाटक रचतांना लोकमतांत जे नवीन विचारांचे अंकुर त्यावेळीं उद्भवूं लागले होते, त्यांचेंही प्रसंगानुसार दिग्दर्शन करावें हा त्यांचा प्रयत्न असावा असें मधून मधून जे त्यांनीं प्रसंग घातले आहेत त्यांवरून स्पष्ट होतें.

आरंभीं नटीचें:

**व्यर्थ आह्मीं अबला ॥ खचित बाई ॥ व्यर्थ० ॥ धृ०**
**वागविती नर पशुसम आह्मां ॥ मान नसे कसला**
**स्वातंत्र्याचा लेश नसे कधीं ॥ बंदिवास ठरला**
**नरनारीसम शास्त्र ह्मणे परि ॥ अनुभव नच आला**

हें पद व सूत्रधाराचें:

[ साकी ]

**तिळहि नसे स्वातंत्र्य तुह्मां तो इतका अनर्थ लोकीं**
**असतें तें तरि काय घडत तें वदवेना तें मज कीं**
**आहे तेंच बरें ॥ भरलें तव मन अविचारें**

हें उत्तर वाचलें असतां त्या वेळीं लोकमतांत कोणत्या विचाराची झुंज चालली होती याची कल्पना होण्यासारखी आहे.

त्याप्रमाणेंच त्या वेळेस ब्राह्मणवर्णाविरुद्ध एका वर्गानीं जी टवाळकी सुरू केली होती तिचें; व अन्य वर्गाचें मन कलुषित करण्याविषयीं इतरत्र जे त्यावेळीं प्रयत्न करण्यांत येत होते त्याचें शंबूकाच्या भाषणांत मूर्तिमंत चित्र आहे हें प्रत्यक्षच वाचण्यासारखें आहेः

" शंबूक ( आपल्याशीं ) आग लागो या ब्राह्मणांच्या जात्यभिमानाला. त्यांना वाटतें कीं, सर्वांवर वर्चस्व आपलें असावें. असा हा आपमतलबी स्वभाव हरामखोरपणा नव्हे काय ? आह्मी सर्व एका ईश्वराचीं लेंकरें असून, आम्हांस कळत नव्हतें अशा दिवसांत ज्यांस कांहीं अधिक ज्ञान अशा त्या ब्राह्मण म्हणविणाऱ्या बंधूंनीं आमचा गळा कापावा ह्मणजे हें कृत्य खाटिकापेक्षां देखील क्रूर नव्हे काय? गुलामांनीं थोतांड कसें रचून ठेवलें आहे पहा? परमेश्वराच्या कृपेनें आरंभीं जे प्राणी निर्माण झाले ते ईश्वराच्या दयेस सारखे पात्र असतां या ब्राह्मणांनीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य शूद्र असे चार वर्ग करून विराट पुरुषाच्या शरीराच्या कोणत्या भागापासून कोण उत्पन्न झाले याजबद्दल वेदांत लटकेंच एक प्रमाण घालून ठेवलें आहे तें असें:

[ पद ]

[ सुवर्ण केतकीपरि जो दिसतो या चा० ]

**विराटवदना पासुनि झाले जे नर त्या ब्राह्मण ह्मणती**
**तद्बाहूपासुनि जे झाले त्या क्षत्रिय ऐसे वदती**
**ऊरु पासुनि जन्म पावले त्यांची वैश्यामध्यें गणती**
**तच्चरणीं उत्पन्न जाहले ते नर शूद्रचि कीं होती**
**वेदामाजीं गडबड ऐसि करुनि आह्मां नागविती**
**निर्णय कधिं होईल तो होवो पण सांप्रत ही ऐसी गति**

एवढा घात करूनही त्यांची तृप्ति झाली नाहीं. आणखी आम्हास कसें बांधून ठेवलें आहे. परशत्रु आला असतां प्राण देण्यास म्हणें क्षत्रियांनीं पुढें व्हावें. उद्योग व्यापार करून द्रव्य संपादन वैश्यांनीं करावें, आणि आम्हीं शूद्रांनीं तर त्यांची नि-

रंतर सेवाच करावी. व या अधमांनीं मात्र निष्काळजीपणानें स्नानसंध्येचें ढोंग माजवून आम्हां तिन्ही वर्गांवर वर्चस्व ठेवून खुशाल निरुद्योगी होऊन बसावें. हर हर! काय जुलूम तरी हा! आणखी आपलें कपट कधींच उघडकीस येऊं नये म्हणून काय त्यांनीं खुबी करून ठेवली आहे पहा. काय तें त्यांचें शस्त्र वेद. तें आपल्याच्र हातीं ठेवून घेऊन आम्हां तिन्ही वर्गांस त्यांत एवढा काय बाऊ आहे हें कळूनच देत नसल्यामुळें आजपर्यंत त्यांची लबाडी उघडकीस आली नाहीं. पण खचित सांगून ठेवतों कीं, या असंख्य पातकांचें प्रायश्चित भोगण्याचा त्यांना कधींना कधीं प्रसंग येणारच. यांत संशय नाहीं. "

पौराणिक कथानकाची अभिरुचि लोकांत त्या वेळीं जागृत होती, म्हणून " रामराज्यवियोग " हें रामायणांतील सर्वांत सुरस कथानक योजून **अण्णासाहेबांनीं** वर निर्दिष्ट केलेल्या गोष्टी त्यांत प्रसंगोपात आणल्या. त्या योगानें **किर्लोस्करांच्या** या नाटकाची योग्यता सर्वांत अधिक ठरण्याचा मोठा योग होता. परंतु दुर्दैवानें तें अर्धेंच राहिलें. तरी कवित्वदृष्ट्या या नाटकाची योग्यता त्यांच्या दोन्ही नाटकांपेक्षां अधिक आहे. या नाटकाचे **किर्लोस्कर** मंडळीकडून प्रयोग होत असत, तेव्हां ज्या ज्या प्रसंगीं पुढील पद्यें ह्मटलीं जात ते ते प्रसंग प्रेक्षकांना तद्रूप करून सोडीत असत. या नाटकांतील कांहीं कांहीं पद्यें केव्हांही वाचलीं तरी अंतःकरणांत प्रेम उत्पन्न करतात. पुढें ज्यांत स्वारस्य ओतप्रोत भरलेलें आहे अशीं कांहीं पद्यें दिलीं आहेत त्यांवरून **अण्णांच्या** कवित्वाची योग्यता कळून येते.

**कैकयीचें रामा**विषयीं निस्सीम प्रेम किती होतें याचें या पद्यांत वर्णन केलें आहे:

**पद.** ( नांदे कैलासाच्या शिखरीं या चा० )

**जो मम नयनचकोरा इंदु । नाहीं ज्याला मत्सरबिंदु ।**
**दुर्भाग्यें तूं नच त्या निंदूं । माझ्या रामा । १ ।**
**कौसल्येहुनि ममता करी । करुणासागर तो मजवरी ।**
**तरेल पातकी जरि उच्चारी । त्याच्या नामा । २ ।**
**प्राणप्रिय ज्या सर्वहि बंधू । गुणरत्नांचा निर्मल सिंधू ।**

आपपरतेचा नाहीं गंधू । मुनिविश्रामा । ३ ।
रामा भरता भेदचि नाहीं । दोनी मूर्ति एकचि पाही ।
ही मी आण नृपाची वाही । नढळे नेमा । ४ ।

वसिष्ठानें रामाच्या पराक्रमाचें वर्णन केलें तें पदः

पद.

निजमख रक्षाया कौशिक नेई । सौमित्र रघुराया । एक शरें पथि वधुनि टाकियली । रामें राक्षसि विक्राळ वदनकाया । नि० । धृ० । रघुकुलमुगुट-मणी । शूराग्रणी । बसतां क्रतुरक्षणीं । बहु रक्षोगण वक्ष विदारुनि । उद्धरिली गौतममुनिवरजाया । नि० । १ । राजीवनयनकरीं चकित सारी । जाऊनि जनकपुरीं । शिवधनु भंगुनि जानकी वरिली । परशुधरा लावी शिर नमवाया । निज० ।२।

दशरथ राजा सिंहासनापासून विराम पावत असतां वैतालिकांनीं त्यांची स्तुति गायली तीं गद्यें:—

गर्वबलोन्मत्तरिपुवर्ग मर्दुनि, सकलसामंत चक्रवर्ति भूपालशिरपदिं नमविलें । प्रखररात्रिंचरस्तोम सर्व संहरुनि मनुजदुष्प्राप्य अमरसिंहासनार्ध साधियलें । जितसुरसुंदरी सौंदर्यसौभाग्यरमणी कैकयीसह नंदनवनविहरण तूंचि केलें । सकल भोगोपभोगा सारुनि सांप्रत बहुत शोभतो सिंहासनापासुनि विराम तूझा । १ ।

दुसरें गद्यः

याचकजन याचित पूर्ण करुनि कल्पतरुसहि लाजविलें । परसुखोत्पादनिं ब्रह्मदेवास, साधुपालनिं विष्णुस, शत्रूसह रणिं कालरुद्रासहि दिपविलें । विमल राज्यनीतिस अनुसरुनि पुत्रापरि निजप्रजापालन अमित दिन तूंचि केलें । आत्मसदृश आत्मारामीं सकलाभिरामि राज्य अर्पुनि, सांप्रत बहुत शोभतो सिंहासनापासुनि विराम तूझा । २ ।

रामाला वनवासाला पाठविण्याचा कैकयी आपला हट्ट सोडीत नाहीं हें पाहून दशरथानें आत्मनिर्भर्त्सना करून घेतली तें पदः—

पद. [ बघुनि सुभद्रेला या चा० ]

निर्मल कुल कसलें । निपजुनि दूषण मीं आणिलें । ध्रु० ।
अश्वमेध शत कोणी केले । स्वर्धुनितें भूवरि कुणि आणिलें ।
सुकीर्तिचे झेंडे नाचविले । कांहीं न मीं केलें । स्त्रीवश
होउनि यश हरिलें । निर्म० । १ ।

तसेंच रामाच्या गुणवर्णनाचें पद्यः

[ पद. ]

सुखचिद्घन गुणनिःसीमा । अनुतापित सीतारामा । स-
कलांच्या अंतर्यामा । दवडिशि कां आत्मारामा । सुख० ।
। ध्रु० । मुनिमानसनेत्रविरामा । नवनीरदवर्णःशामा ।
वसुधा सौभाग्यललामा । दवडि० । १ । जननयन सुधा-
मय सोमा । निःशेषित रक्षस्तोमा । रिपुदुःसह बलवद्भी-
मा । दवडि० । २ ।

इत्यादि पद्यें किर्लोस्करांच्या कवितांतील मोहक गुण दाखवितात हीं पद्यें ऐकून व वाचून ज्यांचें हृदय द्रवणार नाहीं असा मनुष्य विरळा सांपडेल.

अण्णांनीं उत्तर रामचरित्र नाटकांत असलेली शंबूकाची भूमिका प्रस्तुत नाटकांत आणल्याबद्दल बरेच आक्षेप त्या वेळीं घेण्यांत आले होते. परंतु ती भूमिका केवळ नामसादृश्यापुरतीच अण्णासाहेबांनीं घेतलेली होती. शाकुंतलमध्यें जसें दुर्वासाचें पात्र, किंवा सौभद्र नाटकांत घटोत्कच राक्षसाचें पात्र आणलेलें आहे त्याप्रमाणेंच शंबूक पात्राची योजना प्रासंगिक आहे. उत्तररामचरित्रांतल्या शंबूकाचा संबंध रामराज्यवियोग नाटकांतल्या शंबूकाशीं वास्तविक नाहीं. सदर्हू नाटक श्री० बाळासाहेबांस अर्पण करून त्यांचें द्वारें प्रसिद्ध करण्याचा अण्णासाहेबांचा मानस होता; परंतु वर सांगितल्याप्रमाणें श्रीमंताची इच्छा मालतीमाधवाबद्दल विशेष असल्या कारणानें अण्णासाहेबांचा हेतु सफल झाला नाहीं. यासंबंधानें अण्णासाहेबांस आलेलें एक पत्र पुढें दिलें आहे.

" Indore city
21st Sept 1884

My dear Anna

Your letter and the packet of book sent the other day

of the 15th safely to hand in time. Being otherwise engaged with the Maharaja I did not find time to go to the Prince who was staying in the hill-house I saw him and showed the work. His Highness said that he did not care much for the रामराज्यवियोग he will see it leisurely in five or six days. He said he had asked you to prepare the मालतिमाधव in sangita and that it was not right for you not to have done it so long.

You get your work printed at Bombay or Poona so as to be ready for the Dewali Representations. I shall try my utmost to get some pecuniary help for this purpose from the Prince in a few days. The copy sent here must remain with me for some days atleast. If you have no spare fair copy I will get this work copied here and sent to you act by act.

Nothing further particular for the present.

You may send the servicebook here for a time.

I read the new work and find it very touching and superior indeed. I should like to see the performance if I can. When is it to come off? I mean to come down to Bombay some time between the Dasara and Diwali.

We are all doing quite well and hope you do the same.

Compliments to Bhau. His services begin from the day he received his first pay. I think it is from December last.

Your &c.

M. V. LELE. *

सुमारें चार महिने मंडळीस तयारी करण्याकरितां पनवेलीस मुक्काम करावा लागला होता. तेवढ्या वेळांत मंडळीनें तेथील लोकांचें मन कसें आकर्षण करून घेतलें होतें तें पुढील पद्यात्मक उद्गारांवरून समजून येणार आहे.

---

* महादेव व्यंकटेश लेले बी. ए. एल.सी.ई. हे त्यावेळीं महाराजांच्या पदरीं नोकर होते. हे उत्तम लेखक आहेत. हें ज्यांनीं त्यांचे विविधज्ञानविस्तार मासिक पुस्तकांतील संस्कृत नाटकांवरील " सारविचार " वाचले असतील त्यांस माहीत असेलच. हल्लीं हे सिंधहैद्राबादेस म्युनिसिपल सेक्रेटरी आहेत.

## बलवत्प्रशंसा.

### साकी.

**बलवत्कविचा** जन्म शोभवी बहु **किरलोसकराचा** ॥ थोर वंश तो कमलवन जसा उदय सीत किरणाचा ॥ यास्तव त्या कवितें ॥ सद्भावें मन हें स्तवितें ॥ १ ॥

### पद.

( बलसागर तुह्मी या चा० )

कालिदासकृत संस्कृत नाटक शाकुंतल रचिलें ॥ देशभाषणीं संगीतानें मृदुशब्दें खचिलें ॥ धृ० ॥ परम रम्य सौभद्र रसिक मत नूतन निर्मियलें ॥ जें करुणा संगीत गर्तांनीं हृद्रावक झालें ॥ १ ॥ भगवन्नामीं भक्तजनांचें चित्त जणों गढलें ॥ ऐसें या उभयग्रंथांवरी जनमानस जडलें ॥२॥ बलवत्कवि नाटकप्रयोगीं लोक किती रमले ॥ कीं धन—वनिता भोगसौख्यातें तुच्छ तयां गमलें ॥ ३ ॥

### कामदा.

सर्वही जना सहज पयसिता ॥ मिश्र लागतें मधुर सेवितां ॥ गद्यपद्यित ग्रंथ हे महा ॥ रसिक जनमना तोषविति पहा ॥ १ ॥

[ कवीच्या प्रयोगपात्रांविषयीं ]

### पद.

( नाहीं झाले षण्मास० या चा० )

वेषधारी ते लोक फार कुशल वाटती ॥ ज्यांसि पाहुनि परकीय गर्वसिंधु आटती ॥ धृ० ॥ रम्य पात्रांचे अभिनय ते योग्य पाहुनी ॥ रम्य भाषण अवसानयुक्त शुद्ध ऐकुनी ॥ रम्य काव्याच्या करुणापर मधुर गायनीं ॥ रसिककंठ दाटती ॥ वेषधारी ते० ॥ १ ॥

### दिंडी.

तोषवीले पनवेलपुर निवासी ॥ दावुनी निजसंगीत नाटकांसी ॥ अतुर होते अवलोकना सदा ते ॥ जणो सोत्कंठ मयूर पयोदातें ॥ १ ॥

### पृथ्वी छंद.

सदैव बलवत्कविप्रति सुखांत ठेवो हरी ॥ दयांबुनिधि ईश जो सकल विश्व दुःखा हरी ॥ तदीय अनुयायिही जन अभेद राहो सदा ॥ धृतेच्छनत **राम** हा नमितसे हरीच्या पदा ॥ १ ॥

### आर्या.

निर्विघ पापरूपी राम स्पर्शित सदोषही कविता ॥ सरिता शुद्धयर्थ मिळे विद्वत्तीर्थमय सिंधु **बलवंता** ॥ १ ॥

---

## पुनः सफर.

रामराज्यवियोग नाटक पनवेलीस बसविल्यावर मंडळी पुनः सफरीस निघाली. ती मुंबईस आली. परंतु पुणें हें मंडळीची मूळ गादी असल्यामुळें रामराज्यवियोग नाटकाचा पहिला प्रयोग येथेंच झाला पाहिजे असा पुण्यांतील मंडळीचा आग्रह पडल्यामुळें मंडळी पुण्यांत येऊन तिनें रामराज्याचा पहिला प्रयोग ता. २० आक्टोबर १८८४ रोजीं केला. त्या दिवशीं नाटकगृह प्रेक्षकांनीं तुडुंब भरलें होतें. **अण्णासाहेबांकडे** सूत्रधाराची व दशरथाची भूमिका होती. **भाऊरावाकडे** मंथरेची, **मोरोबा** वशिष्ट, **भास्कर*** नांवाचा एक मुलगा होता त्याच्याकडे कैकयीची अशा भूमिका होत्या. प्रयोगदृष्टीनें या नाटकांतील गुणांत स्वतां **अण्णासाहेब, भाऊराव** इत्यादि पात्रांच्या संगीत व अभिनयादि गुणांची अधिक भर पडल्या कारणानें हेंही नाटक पहिल्या दोन नाटकांप्रमाणें लोकांच्या हृत्पटावर अद्याप कोरलेलें राहिलें आहे.

**पुण्यांत** आठ दिवस राहून मंडळी पुनः **मुंबईस** गेली. **बाळकोबा**-शिवाय **पुण्या, मुंबई**सारख्या शहरांत खेळ करण्याची ही पहिलीच वेळ होती. तरी दोन्ही शहरीं लोकाश्रय पूर्ववत् मिळत गेला. **बाळकोबा**-सारखें रंगेल पात्र **किर्लोस्करां**च्या नाटकांत नसणें ह्मणजे उत्तम भोजनपात्रांत एक पक्वान्न कमी असण्यासारखें होतें. **पुण्यांत** ते नसल्याबद्दल विशेष कांहीं वाटल्याचें दिसलें नाहीं; परंतु **मुंबईच्या** प्रेक्षकांचा मात्र थोडा विरस झाला. म्हणून त्यांनीं **अण्णासाहेबांस** त्यांना आणण्याबद्दल एक लांबलचक विनंतिपत्र पाठविलें होतें. तें पत्र हें:

"**मुंबई** ता० १६ माहे आक्टोबर १८८४.

रा. रा. **बळवंत पांडुरंग किर्लोस्कर** यांसः—

वि. वि॰ नाटक हें संसारांत मनाची करमणूक करणारें आणि सन्मार्गोपदेशक आहें यांत संशय नाहीं, आणि तेंच जर संगीत आहे तर त्यापासून अंतःकरणाला आल्हाद झालाच पाहि-

---

* हे हल्लीं भास्करबोवा बखले या नांवानें गवयांत नामांकित गवई झाले आहेत.

जे हें उघड आहे. या जगांत ज्यांस गायन अगदींच आवडत नाहीं असे फारच थोडे निघतील. किंबहुना मुळींच नाहींत असें ह्मटलें तरी चालेल. आपलें नाटक गायनयुक्त असल्यामुळें आणि बहुतेक पात्रें आपआपलीं कामें लक्षपूर्वक काळजीनें करीत असल्यामुळें चांगलें वठतें व तें सर्वतोमुखीं झालें आहे. **किर्लोस्करांचें** नाटक आज सर्व हिंदुस्थानांत गाजत आहे आणि ते ज्या दिवशीं असेल त्या दिवशीं पाहण्याकरतां लोकांच्या उड्या पडत आहेत, याचें कारण आपली बिनचुक धूर्तता, जनसमूहास आकर्षण करून त्यांचें मन वेधण्याची आपलयास साधलेली अवर्णनीय हातोटी, प्रेक्षकजन रंजविण्याची आपली अति उत्तम शैली, पात्रें तयार करण्यांत अनिवार श्रम आणि सर्वांत आपली प्रासादिक गायनकलाकुशलता. संगीत देवीची आपल्यावर पूर्ण कृपा असल्यामुळें आपण आपल्या ज्ञानमंदिरांतून जीं जीं अमोल्य रत्नें जन्मास आणतां त्यांचें तेज पाडण्यास आणि लोकांचे नयन दिपवून टाकण्यास पात्रांच्या अंगीं सामर्थ्यही तसेंच पाहिजे आहे. ज्याला बंदूक उचलण्याचें सामर्थ्य नाहीं आणि तरवार कशी धरावी हें माहीत नाहीं तो पलटणीबरोबर टिकेल कीं नाहीं याचा विचार करणें नकोच. लढाईकरतां निवडून काढलेल्या कवाइती गृहस्थांच्या हातून जशी फत्ते होण्याची खात्री असते आणि ते जसे कसोटीस उतरलेले असतात तसें काम आणि तसें कसोटीस उतरणें बाजारबुणग्यांच्या हातून कधींही होणार नाहीं. कोणतीही गोष्ट एक वेळ चांगली साधली ह्मणजे त्यांत विशेष महत्त्वाचा फेरफार झाल्याशिवाय तिच्यांत बदल होत नाहीं. आपलीं आजपर्यंत सर्व पात्रें निवडक आणि बावनकशी सुवर्णाप्रमाणें उतरलीं असतां व आपल्या नाटकाची प्रख्याति सर्व ठिकाणीं झाली असतां आज हे वरील विचार सुचण्याचें कारण आपला परवां झालेला संगीत सौभद्र नाटकाचा प्रयोग आणि त्या योगें झालेली निराशा! आपल्या प्रयोगावर टीका करण्याचा आमचा उद्देश नाहीं व तशा हेतूनें हें पत्र आपणास लिहिलेंही नाहीं; पण

ह्याच नाटकाचा प्रयोग आपण प्रथमतः **मुंबईत** करून दाखविलात त्याबरोबर परवांच्या प्रयोगाची तुलना करून पाहण्याचा आहे. इतकें आपणांस आह्मी खात्रीनें सांगू शकूं कीं, त्या प्रयोगाच्या वेळीं जी बहार उडाली आणि जो रंग भरला होता तो कालच्या प्रयोगांत नव्हता. याचें कारण ढळढळीत दिसत आहे कीं, दोनतीन मुख्य मुख्य पात्रांचें काम करणारे बदललें. आतां नायकपात्रें जरी कायम आहेत इतकेंच नाहीं, पण त्यांच्यांत पुष्कळ सुधारणा झाली आहे आणि आपल्या कसबांत पूर्वींच्यापेक्षां कमाल करतात तरी गुलाबाचें फूल त्याचे पत्त्यासुद्धां जसें शोभा देतें, तसें पत्त्याविरहित देत नाहीं; पण उलटें कमीपणा आणतें. याकरितां तें नेहमीं सुशोभित पानानें वेष्टितच पाहिजे. त्याप्रमाणें वरील पात्रांचा ज्या पात्रांशीं संबंध आहे त्यांनीं आपलें काम चांगलें बजावलें पाहिजे होतें. ह्या नवीन पात्रांनीं जें काम काल बजावलें तेंच जर प्रथम प्रयोगाच्या वेळीं झालेलें असतें म्हणजे अशी कल्पना करायची कीं, हींच पात्रें पूर्वीपासून तुमच्यांत काम करीत आहेत, तर पूर्वीच्या पात्रांनीं जसा आपल्या मार्मिक खुब्यांचा प्रादुर्भाव आमच्या दृष्टीस पाडला आणि आम्हास गारेगार करून सोडलें तसा कधीं तरी ह्यांच्या हातून दृष्टीस पडतां काय? त्या खुब्या आणि त्या नक्कली आह्मी जाणत असून जर आम्हांस कालच्या प्रयोगांत त्या दृष्टीस पडत नाहींत तर तें नाटक आम्हांस आळणी कसें बरें वाटणार नाहीं! **बाळा नाटेकर** ज्यावेळीं कृष्णाचें आणि नारदाचें काम करीत होते त्यावेळीं ते जसें प्रेक्षकांस खुलवून सोडीत असत आणि त्यांच्या अंतःकरणास प्रेमाचे उमाळे फोडीत, तशी शैली, तुम्ही कांहीं म्हणा, पण काल ज्या गृहस्थांनीं नारदाचें व कृष्णाचें काम केलें, त्यांना साधली नाहीं. त्यांत ह्या गृहस्थांची निंदा करण्याचा किंवा त्यांचा मान कमी करण्याचा आमचा उद्देश नाहीं, हें आपल्या समजुतींत आलेंच असेल, आणि ह्यांत त्यांचाही कांहीं वांक नाहीं. कारण जो तो आपापल्या परीं प्रेक्षकांचें मन संतो-

षित करण्याचाच प्रयत्न करीत असतो. पण हें कितीएकांस स्वभावतःच असतें. कितीएक अभ्यासानें साधून घेतात. आणि कितीएकांस अभ्यास करूनही साधत नाहीं. त्याचप्रमाणें रुक्मिणीच्या पात्राविषयींही विचार करूं पाहतां बरीच निराशा होते. जें काम........यांनीं गेल्या वर्षी मुंबईत बजावलें त्यांत त्यांचा नखरा आणि अभिनय, स्त्रीजातीस सुद्धां शरमवून टाकण्याची शिताफी हें सर्व जर अजून आमच्या डोळ्यांपुढून गेलें नाहीं. तर कालच्या पात्राचें काम आम्हांस कितपत रुचेल बरें! तसें काम कालच्या गृहस्थाच्या हातून वठलें नाहीं इतकेंच नाहीं, पण पुढें तरी तें त्याला सुधारून घेऊन........यांची बरोबरी करतां येईल कीं नाहीं ह्याविषयीं बराच संशय आहे.

आपणांस हें लिहिण्याचा आमचा हेतु इतकाच कीं, **बाळा नाटेकर** आणि........यांस आपणापासून दूर करूं नये व त्यांस आपल्या नाटकांतून निघण्यास कारण काय झालें हें जरी आह्मांस माहीत नाहीं तरी त्यांस आपल्या नाटकांत परत आणण्याचा प्रयत्न कांहीं तरी तडजोड करून करावा. आपणा सर्वांत एकी असावी अशीच आमची सर्वांची इच्छा आहे. आपल्या कामास ज्याप्रमाणें योग्य योग्य पात्रें एकत्र झालीं आहेत त्याप्रमाणें दुसऱ्या कोणत्या तरी नाटक मंडळींत मिळतील असा संभव दिसत नाहीं. ह्मणून आपण त्या दोघांस आपल्या मेळ्यांत ओढून घ्यावें आणि त्यांच्यासह मुंबईत रंगभूमीवर उभे राहून ह्याच नाटकाचा प्रयोग आपण आठ दहा दिवसांत करून दाखवावा अशी आपणांस आमची सप्रेम सूचना आहे. आणि जर असें होईल तरच आपण आजपर्यंत मिळविलेली कीर्ति कायम राहील व आपलें नाटक मनोहर होईल आणि उत्तरोत्तर सुधारत जाईल. कालच्या प्रसंगीं कांहीं मंडळी "पूर्वींची मजा नाहीं," असें ह्मणून एक दोन अंक झाले नाहीं तोंच नाटक अपुर्तेंच टाकून उठून गेली हें आपल्या शुभ्र कीर्तीस उणेपणा आणणारें नव्हे काय? फार विस्तार आमच्यानें करवत नाहीं ह्मणून तसदी दिल्याबद्दल माफी मागून हें पत्र पुरें करतों.

**ताजाकलमः**–ह्या पत्राचा जबाब मेहरबानी करून **रा० रा० गणपत राघोबा विजयकर** यांच्या नांवें कोटींत **मेसर्स ग्याडम बीधल कंपनी**च्या कचेरींत करावा."

या पत्राखालीं सुमारें पन्नास गृहस्थांच्या सह्या होत्या. **मुंबईच्या** लोकांनीं चांगल्या बुद्धीनें वरील पत्र पाठविलें होतें. परंतु त्याचा उपयोग होण्यासारखा नव्हता. कारण **बाळकोबा** ह्मणजे गुलाबाच्या फुलांप्रमाणें वास घेण्यापुरतेच सुखावह आहेत अशी **अण्णासाहेबांची** खात्री झाली होती. तेव्हां त्यांच्या संबंधांत पुन्हां आपण खटपट करावयाची नाहीं असा त्यांनीं निश्चय केला होता. दुसऱ्या पात्राचा जो संबंध सुटला होता तो निसर्गतः केव्हां तरी सुटावयाचाच होता हें पूर्वीं सांगितलें आहेच. तेव्हां **अण्णासाहेबांनीं** वरील पत्रास जें उत्तर पाठविलें तें एका पात्रासंबंधापुरतेंच विशेषतः आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. तें उत्तर येणेंप्रमाणें:—

"मुंबई ता. २८ आक्टोबर सन १८८४

वि. वि. आमच्या संगीत सौभद्र नाटकाचा प्रयोग पाहून त्यांतील खऱ्या उणेपणाबद्दल वास्तविक विचार करून केवळ आमच्या प्रसिद्धीचा लोप न व्हावा या बुद्धीनें आपण कळविलें याबद्दल आह्मीं फार आभारी आहोंत. प्रेक्षकांमध्यें मी स्वतः जर असतों तर आपणांस जें वाटलें त्याप्रमाणें मलाही वाटलें असतें. तद्वतच या संगीत नाटकांतल्या मंडळींत तुह्मी आजमासें ५० सह्या केलेल्या मनुष्यांतून एक जर असता तर त्याला मात्र तुह्मी जे विचार प्रदर्शित करतां तसें वाटलें नसतें. जी इमारत कलाकौशल्याचे कमालीनें उभारली तिचा एखादा मजेदार भाग अपघातानें पडला असतां ती सारी ढासळून टाकावी असें कोणीही विचारी मनुष्य ठरविणार नाहीं. जरी पडलेला भाग तसा बनवितां येणार नाहीं तरी उरलेल्या इमारतीची होईल तशी डागडुजी करून तशीच कायम ठेवावी असेंच सिद्ध होईल. आपल्या पत्रांतील मतलबाचा झोंक जीं स्टेजवर मात्र गुणी पात्रें तीं इतर रीतीनें कितीही अनर्थकारक

असलीं तरी कोणत्याही प्रकारें आपल्या मेळांत वळवून घ्यावीं असा दिसतो; पण हें अगदीं अशक्य आहे. त्या कामीं आमच्या खटपटींची बेहद्द होऊन निरुपायामुळें ही अशी योजना करून तुह्मांसमोर येणें आह्मांस भाग पडलें. अशी कल्पना करावी कीं, ज्या पात्रांची तुह्मास उणीव दिसत आहे तींच पात्रें यदा कदाचित् या मृत्युभूमींतून नाहींशीं जाहलीं असतीं तर आपण आह्मांस मुळींच नाटक बंद करण्यास सांगतां किंवा आहेत तीं पात्रें घेऊन त्यांच्याबद्दल सरासरी जुळवाजुळव करून पुनः ती मौज दाखवा ह्मणाला असतां, याचा विचार आपणच करावा. जीं पात्रें तुह्मांस दिसत नाहींत तीं आमच्या वांटणीस तशींच जाहलीं आहेत, त्याबद्दलची खात्री पत्रोपत्रीं तर व्हावयाचीच नाहीं; पण तुह्मां पन्नासांपैकीं कोणी तरी एक मनुष्य आह्मांस समक्ष येऊन भेटेल, तर दस्तऐवजीं पुराव्यानिशीं करून देऊं. शिवाय आपण ज्या मंडळीविषयीं लिहितां त्या मंडळीचा पुनः आमच्याशीं एकपणा करण्याकरितां जर तजवीज केली तर आह्मीं ते रीतीप्रमाणें वागण्यास कबूल झालें असतां त्यांस पुनः आपल्या मंडळींत घेण्यास नाकबूल आहोंत असें समजूं नये. आपल्या मार्फत कां होईना !! जर रीतीप्रमाणें व्यवस्था होईल तर आह्मांस तें मान्य आहे. विशेष काय ल्याहावें सारांश आपल्या लक्षांत येईलच लोभ करावा ही वि.

ताजा कलम—

आणखी एक गोष्ट आपणांस कळवितों ती ही कीं, ज्या पात्रांबद्दल आपल्यास पूर्वींच्या तुलनेंत कमतरता दिसते, तींच पात्रें कांहीं दिवस त्याच कामावर निभावून राहिल्यास आपणापासून वाहवा मिळविल्यावांचून कधींही राहणार नाहींत ही आमची उमेद अगदीं सत्य होणारी आहे. व ज्या पात्रांच्या हानीविषयीं आपण दर्शवितां तींच पात्रें आरंभीं किती बुचकळ्या खात होतीं व त्यांच्या तरवारी व बंदुका कशा लटपटत होत्या हें पुण्यांतील पहिला खेळ बघणारा जर तुह्मां पन्नासांमध्यें असतां

तर तो हें पत्र तुम्हांस लिहिण्यास सल्ला देतांच ना. असो. लोभ करावा ही विनंति.*

अण्णा किर्लोस्कर."

मुंबईच्या सफरींत किर्लोस्कर मंडळीनें केरूनाना छत्रे यांच्या स्मारककृत्यास मदत करण्याकरितां शाकुंतल नाटकाचा प्रयोग करून चारशें रुपये सदर कार्यास दिले.

गोपाळराव दाते यांचा संबंध या मंडळीशीं कायमचा सफरींत सुटला. हे मंडळींत आरंभापासून होते. तसेंच पुढें राहिले असते तर यांचा फार फायदा झाला असता. परंतु एका मंडळींत टिकून राहण्याची त्यांना संवय नसल्याकारणानें चांगल्या प्रतिष्ठित मंडळींत राहून नांव मिळविण्याची संधि त्यांनीं फुकट घालविली. यांचीं सर्व कामें मग काशीनाथपंत परचुरे नांवाच्या एका गृहस्थाकडे आलीं. गोविंदराव देवल यांच्या शिक्षणाखालीं हे दाते यांचेकडे जीं कामें असत त्यांत चांगले प्रवीण झाले व हल्लीं तेच हीं कामें करीत आहेत.

या सुमारास अण्णासाहेबांनीं आपल्या शाकुंतल व सौभद्र पुस्तकांचा सर्व हक्क आर्यभूषण छापखान्यास देऊन एक मोठें स्वार्थत्यागाचें कृत्य केलें. सदर छापखाना त्यावेळीं टिळक, आगरकर, आपटे प्रभृति देशहितार्थ झटणाऱ्या मंडळीच्या मालकीचा होता. सदर गृहस्थाविषयीं पूज्यबुद्धि व त्यांच्या निरनिराळ्या संस्थांविषयीं कळकळ त्या वेळीं सर्वत्र होती. याच वेळीं कोल्हापुरकर बर्वे प्रकरणांत ही मंडळी बरीच खर्चाच्या पेंचांत आली होती. त्यामुळें अशा सत्कार्यीं वाहून घेणाऱ्या मंडळीस आपलीही कांहीं मदत असावी ह्मणून दोन्ही पुस्तकांचे कायमचे हक्क अण्णासाहेबांनीं अवघ्या १५०० रुपयांस देऊन टाकले. "हीं पुस्तकें सदर मंडळीस मीं शेत ह्मणून दिलीं आहेत." असें अण्णासाहेब ह्मणत. त्या प्रत्येक पुस्तकांच्या आजपर्यंत आठदहा आवृत्त्या निघाल्या आहेत; व त्यांवर हजारों रुपये मिळविले आहेत. यावरून त्यांचे शब्द कसे खरे झाले तें दिसून येत आहे. परंतु ज्या परो-

---

* पुढें कांहीं दिवसांनीं बाळकोबा पुन्हां मंडळींत येऊन बरींच वर्षे लोकरंजन करीत होते. त्यांस दोनशें रुपये दरमहा मंडळीकडून मिळत असे.

पकारबुद्धीनें त्यांनीं हा स्वार्थत्याग केला, तिचें मात्र चीज झालें नाहीं. कारण पुढें सदरहू मंडळींत बेबनाव होऊन **आर्यभूषण** छापखान्याची व त्याबरोबर ह्या दोन्हीही पुस्तकांची मालकी व्यक्तिविषयक होऊन ती हल्लीं दिवाणींत वादांत पडली आहे.

मंडळी मुंबईहून डिसेंबर १८८४ सुमारास **नाशकास** गेली. तेथें हल्लीं जेथें मुनसिपाल कमिटी आहे, त्या **राजे बहादरांचे** वाड्यांत मुद्दाम नाटकगृह बनवून त्यांत खेळ केले. यावेळीं **कृष्णानंद सरस्वति** नांवाचे एक विद्वान् स्वामी तेथें होते. त्यांच्या पुढें, त्यांचे अनुयायी स्वामी बोलावून **अण्णासाहेबांनीं** आपली कृति दाखविली. ती पाहून स्वामी फार संतुष्ट झाले व त्यांनीं **अण्णासाहेबांस** पुढें दिलेली "आनंदोद्गारपत्रिका" पाठविली.

**" जय सच्चिदानंद.**

**श्रीमत् परमहंस कृष्णानंद सरस्वतीप्रणित नारायणस्मरण,**

**प्रियशिष्यांतरगणप्रिय राजश्री बळवंतराव अण्णा किर्लोस्कर यांशीं उत्तरोत्तर आनंदाभिवृद्धि मनोरथसिद्धिपूर्वक करोत. शके १८०६ तारणनाम संवत्सरे माहे पौष वद्य ३ रोज मंदवासर. आपलें स्वकृत संगीत शाकुंतल, संगीत सौभद्र, व संगीत रामायण हे तीन प्रयोग पाहून अत्यंत संतुष्ट होऊन तुह्मांस 'रसमूर्ति अभिनव कालिदास' अशी पदवी दिली आहे. आजपासून जेव्हां आह्मीं तुह्मास पत्र लिहूं तेव्हां हल्लीं दिलेलें अभिधानपूर्वक पत्र लिहूं. आणि ज्या तुह्मीं रसिक गुणज्ञ जनांस हें विदित झाल्यानें ही गोष्ट मान्य करून तेही असेच व्यवहार ठेवतील, व तुमच्या जवळच्या मंडळीपैकीं रा० मोरोपंत देव (वाघुलीकर) व रा० भाऊराव कोल्हटकर या उभयतांस प्रकृत रसपोषक संगीतकुशल अशी पदवी दिली आहे. हेंही पाहून गुणीजन अवश्य संतुष्ट होऊन असेच या शब्दाचा व्यवहार करतील. ही आनंदोद्गारपत्रिका दिली आहे कळावें.**

**इति नारायण स्मरण. "**

**नाशकास बळवंत खंडूजी पारख** ह्मणून एक मराठी जातीचे गृहस्थ असत. हे फार रसिक असून मोठे शीघ्र कवि होते. यांनीं

* हे या वर्षींच वारले. हे मोठे वक्तेही असत. पुण्याच्या वक्तृत्व समारंभांत यांनीं तीन वेळां बक्षीस मिळविलें होतें. नाशकास भेटण्यासारखीं जीं पूर्वीं गुणी माणसें असत त्यांत हे एक होते. यांच्या जवळ मराठी पुस्तकांचा फारच मोठा संग्रह होता.

अण्णासाहेबांवर व मंडळीवर एक कविताबद्ध रचना करून ती प्रेक्षकांपुढें वाचून दाखविली ती ही.

" विद्वद्वर्य शिरोभूषण राजमान्य राजश्री **बळवंतराव पांडुरंग** ऊर्फ **अण्णासाहेब किर्लोस्कर** महाराष्ट्र भाषेंतील संगीत नाट्यकलेचे जनक स्वामीचे सेवेशीं, **नाशीक** येथील आज्ञांकित मित्रानें केलेली कविता:

श्लोक. शार्दूलविक्रीडित.

संगीतामधिं अग्रगण्य वरवी प्रख्यात जी मंडळी ॥
अण्णांच्या स्वकरें विराजुनि जनीं जी वंद्य हो जाहली ॥
होतों ऐकत ती परंतु मजला आली प्रचीती स्वतां ॥
यासाठींच तिच्यांतले बहुगुणी होतों स्वयें सांगता ॥१॥

श्लोक. वसंततिलका.

ज्यांच्या कवित्वकमला बुधभृंग घाले ॥
ऐकूनिया बहुत मानसिं दंग झाले ॥
ज्यांचें सुनाम बरवें बळवंतराय ॥
त्यांच्या गुणावरुनि हा उतरीन काय ॥ २ ॥

श्लोक. द्रुतविलंबित.

बहु नया विनयांतहि साजती ॥
मति धृतींत कृतींत विराजती ॥
करिति भाषण अस्खलित स्वता ॥
बहुत लुब्ध करी वरपंडिता ॥ ३ ॥

श्लोक. स्रग्धरा.

ज्याच्या शाकुंतलातें तदुपरि दुसऱ्या त्याच सौभद्रखेळा ॥
पाहूनी सेवुनी श्रीरघुवरविरहा प्राण राहे भुकेला ॥
जो कालीदास पूर्वी विबुधवर असे हीच त्याची विभूती ॥
आली या नाशिकातें, चतुर सुवलवद्भाषणें तोषवीती ॥ ४ ॥

साकी.

भव्य आकृती नसे विकृती तमोगुणाची ज्यांना ॥
त्यांचें यश तें वृद्धि पावुनी रक्षो श्री शिव त्यांना ॥
बलवत् कविवर्या ॥ तव गुणिं मम हें मन आर्या ॥५॥

श्लोक. पृथ्वी.

सुलक्ष्मणहि भाउची कृति बघूनिया वायका ॥
स्वकीय कृति धिःकृती करिती सूज्ञ हो आयका ॥
वनांत रव कोकिला करितसे जशी त्यापरी ॥
जनांत करितीच ते चतुर हाव भावांतरी ॥ ६ ॥

श्लोक. अमृतध्वनि.

अंगांत जो सतत शृंगार तो बहुत रंगांत तें उघडिती ॥
रंगास आणिति अनंगासही असुखभंगाप्रती दवडिती ॥
कंगाल तेहिजन दंगा तधीं त्यजुन भृंगापरी वचरसें ॥
शृंगारुनी उदर तो गातसे म्हणुनि संगा स्वकाम विलसे ॥७॥

दिंडी.

गुणी मोरोबा देव वाघुलीचे ॥
करिति गानासह काम नायकाचें ॥
असे गायन तें रम्य आणि गोड ॥
प्रेक्षकांचें ऐकूनि पुरे कोड ॥ ८ ॥

आर्या

शाकुंतलाख्य नाटकिं ज्यांना त पात्र थोर दुष्यंत ॥
तद्गुण दावुनि वरवे रसिकांतें तोषवी सुगुणवंत ॥ ९ ॥

श्लोक. शार्दूल०

जैसा दाशरथीस राज्य करण्यासाठीं सुमंत कृती ॥
तैसें त्र्यंबकराव यांतचि जया साठे उपाख्याहि ती ॥
ऐशी सर्वाहि मंडळी सुगुणवान् सत्पूज्यविद्वज्जनीं ॥
तीतें रक्षुनि भर्ग तो सबलवान् ठेवो सदां ह्या जनीं ॥ १० ॥

श्लोक.

अरे भास्करा बालकांनो तुह्मांतें ॥
बघूनीच प्रेमा बहू ये आह्मातें ॥
गुणांची करा वृद्धि ती सर्वकाल ॥
अशा साह्यतेमाजि कांहीं शिकाल ॥ ११ ॥
अशीं पद्यपुष्पें गुणीं गुंफिलीं हीं ॥
गुणी मंडळीला समर्पी तसाही ॥
स्वयें तीं तुम्ही सुज्ञ हो पारखाची ॥
विनंती असे आपणा पारखाची ॥ १२ ॥

मंडळी नाशकाहून उमरावतीस गेली. परंतु तेथें जाऊन पोंचते न पोंचते तोंच इंदुराहून श्री. महाराज यांच्याकडून मंडळी सुद्धां निघून येण्याबद्दल तारेनें बोलावणें आल्या कारणानें १८८९ च्या जानेवारींत तेथें गेली. इंदुरास या वेळीं सर लिपेल ग्रिफीन हे गवर्नर जनरल-चे एजंट होते; व लार्ड रांडालफ चर्चिल पार्लमेंटचे सभासद हे तुकोजी महाराजांचे येथें पाहुणे आले होते. त्यांच्या सन्मानार्थ खेळ करावहाचे होते म्हणून मंडळीस मुद्दाम बोलावून नेलें. रेसिडेन्सीमध्यें तयारी करून शाकुंतल नाटकाच्या चार व पांच अंकाचा प्रयोग करून दाखविण्यांत आला. साहेबमजकुरांस, नाटकाचें सार समजावें म्हणून सदर अंकांचें इंग्रजींत भाषांतर करवून त्यांचीं पुस्तकें छापविलीं होतीं. अनायासें या कारणानें मंडळी इंदुरास गेली होती म्हणून पुनः कांहीं सार्वजानिक नाटकें तेथें करून श्रीमंत धार सरकार यांच्या बोलावण्यावरून धारेस गेली. धारच्या महाराजांनीं मंडळीचा फारच आदरसत्कार ठेवला होता. चार खेळ करून मंडळीस महाराजांनीं निरोप दिला व मंडळी पुनः उमरावतीस मार्चमध्यें परत आली. अण्णासाहेबांनीं इंदूरचे व धारचे महाराज यांजवर पद्यें केलीं होतीं तीं हीं:

**श्रीमंत महाराज तुकोजीराव बाबासाहेब होळकर**

यांजवर

**पद.** ( सुंदर मुख या चा० )

कैलासनाथ वंदुनि तुज हेंचि मागतों ॥
व्याधिमुक्त करुनि रक्षि नृप **तुकोजि** तो ॥ धृ० ॥
निजराज्यदक्षतेंत जयें आयु खर्चिलें ॥
नवयौवनिंही स्वात्मसुखा नाहिं पाहिलें ॥
अतिसंकटसमयींहि शुद्ध धैर्य राखिलें ॥
यद्गुणगण आंग्लमृपासीहि दिपवितो ॥ १ ॥ कै० ॥
हें राज्यसूत्र ज्या दिनिं निजकरीं घेतलें ॥
प्राचीन सर्व दुःस्थितितें स्वयें मोडिलें ॥
ऋण फेडुनि अगणित धन भरुनि सोडिलें ॥
ज्या बघुनी यक्षराज मनीं लाजतो ॥ २ ॥ कै० ॥
अति गुणवान् रविशशिपरि ज्या पुत्र शोभती ॥
त्या पुत्राचिहि पाहतसे विमल संतती ॥

इंद्राहुनि ज्या भाग्यशालि थोर मानिती ॥
तद्वर्णनिं **बलवंत**हि थकुनि जात तो ॥ ३ ॥ ३ ॥ कै० ॥

## धारचे महाराज आनंदराव पवार

यांजवर

**पद.** ( अर्ध तनु वारुळीं या चा० )

आनंदाचा कंद असा **आनंदराय** नरपती ॥ **धारा**नगरींत नांदे कृती ॥ १ ॥ **कृष्णराज**देवाच्या वंशीं **भोज मुंज** वाक्पती ॥ तसा हा **पवार**कुलीं सन्मती ॥ गंगेच्या डोहासम ज्याचा स्वभाव निर्मल अती ॥ नाहीं गर्वलेश ज्याप्रती ॥ चाल ॥ ज्या स्थानिं एकदां सार्वभौमपद वसे ॥ ज्या स्थानिं सुविद्यासागर भरला दिसे ॥ ज्या स्थानीं लक्ष्मी पाणी वाहत असे ॥ चाल ॥ कलाकुशलता मूर्तिमान ज्या स्फुरणानें नाचती ॥ त्या पदीं योग्यचि हा क्षितिपती ॥ आनंदाचा० ॥१॥ शरत्कालिंच्या पूर्ण शशीला वघुनि नेत्र तोषती ॥ तसें या बघुनी होते मती ॥ सरल वाणि समसमान बुद्धि माया ममता किती ॥ क्षमेचा सागर निर्मल धृती ॥ चाल ॥ नियमानें ज्याचें सर्वकाल वागणें ॥ अति मर्यादेचें सकलांसी वोलणें ॥ निजराज्यदक्षतेमाजि जपुनि चालणें ॥ चाल ॥ सकलभोगभोगेच्छा असुनी आसक्ति न दाविती ॥ करी जो नित्य साधुसंगती ॥ आनंदाचा० ॥ २ ॥ **भोज** सभेमाझारि एकदां नवरत्नें शोभती ॥ तसे याजवळी गुणि राहती ॥ सर्व कौशलांमधें जयाची अव्याहत ती गती ॥ निज नामापरि ज्याची कृती ॥ चाल ॥ भो गिरिजाकांता कर जोडुनि मागतों ॥ या भूपा देई औरस सुत शीघ्र तो ॥ इतुकेंचि न्यून तें पूर्ण करी सांगतों ॥ **कालिदास** जरि असता तरि तो थकतां करितां स्तुती ॥ मग हा **बलवत्कवि** तो किती ॥ आनंदाचा० ॥ ३ ॥

नाटकमंडळीस धंद्याच्यासंबंधानें बराच गोतावळा असतो. त्यांत वर्तमानपत्रें, पोलीस, व रेलवे नोकर, हे निकटसंबंधाचे गोतावळे होत. यांच्याशीं सलोखा यांच्या इच्छेप्रमाणें कायम राहिला तर नाटक मंडळीची व्यवस्था मग सुरळीत चालते; परंतु थोडें कां यांचे व मंडळीचें बिनसलें कीं, हेच उलट मंडळीचे शत्रु बनतात. मग पहिले मंडळी विरुद्ध आपली लेखणी चालवून, दुसरे कांहीं तरी कुरापत काढून व तिसरे मंडळीची गैरसोय होतां होईल तितकी करून आपला सूड उगवून

घेतात. **अण्णासाहेबांनीं** या तिन्ही वर्गाच्या मित्रांपैकीं वर्तमानपत्रांशीं मित्रत्व फारच थोडें ठेवलें होतें. त्यामुळें केव्हां केव्हां त्यांस वर्तमानपत्रकाराच्या लेखणीची धार आपणावर चालविलेली पाहण्यास मिळत असे. **अण्णासाहेब**ही मग अशा मित्रमंडळीचा समाचार कधीं प्रत्यक्ष व कधीं पर्यायानें घेत असत. असा एक प्रसंग **नागपुरास** आला. तेथील "नागपूर समाचार" नांवाच्या पत्रांत मंडळीविरुद्ध बरीच टीका आली होती. तिचें उत्तर म्हणून पुढील मजकूर शेवटच्या प्रयोगाच्या वेळीं प्रेक्षकांपुढें वाचविण्यांत आला होता:

'आह्मीं ता० २५ एप्रीलपासून आज ता० ३० मेपर्यंत शनिवार, बुधवार असे सुमारें नऊ प्रयोग करून दाखविले. या शहराच्या मानानें पाहिलें असतां आमच्या अदमासापेक्षां जास्ती पैसा आह्मांस मिळाला. याबद्दल नागपूरस्थ रसिक विद्वानांचे आम्ही भारी आभारी आहोंत. आमच्या संगीत सौभद्र, संगीत शाकुंतल व संगीत रामराज्य वियोग या प्रयोगांच्या संबंधानें येथील "नागपूरसमाचार" पत्रकर्त्यांनीं बऱ्याच टीका केल्या आहेत, तथापि सदरहू प्रयोगांबद्दल या पत्रकर्त्यांपेक्षां अकलेनें, विद्वत्तेनें, व व्यावहारिक ज्ञानानें शतपट जास्त असणाऱ्या विद्वानांकडून पुणें व मुंबई या ठिकाणीं अभिप्राय प्रगट झाले असल्यानें केवळ मात्सर्यबुद्धीनें परिस्फुट केलेल्या लेखांकडे लक्ष देणें म्हणजे त्या लेखांस अधिक महत्त्व दिल्यासारखें होतें. यास्तव त्याबद्दल आह्मी कांहींच उत्तर देत नाहीं, त्याबद्दल निर्णय करण्याचें काम ज्यांनीं आमचे प्रयोग पाहिले आहेत अशा निःपक्षपाती रसिकांवरच सोंपवितों. आतां कदाचित् इतकें खरें असेल कीं, आमचे प्रयोग गायनरसप्रधान असल्यानें एखाद्या प्रयोगांत एखाद्या प्रमुख पात्राचा आवाज व शरीरप्रकृति निरनिराळ्या हवापाण्याच्या अदलादलीनें बिघडून तो प्रयोग जसा जुळून यावा तसा आला नसेल तर त्याबद्दल कडक लेख कांहीं खाजगी द्वेष असल्यावांचून, ज्यानें निःपक्षपाततेचा बाणा उचलला आहे असा पत्रकर्ता कधींही प्रगट करणार नाहीं. पुनः हा प्रश्न येतो कीं, असें निष्कारण वैर या पत्रकर्त्यांचें आह्मांविषयीं कां असावें? तर याबद्दल पुढें आह्मी थोडेंसें लिहीत आहों त्यांत स्पष्ट होईल."

नागपूरसमाचार पत्रकर्त्यांनीं आपल्या ता० २५ मे १८८५च्या अंकांत जे आपल्या अकलेचे तारे तोडले आहेत त्याबद्दल थोडेंसें कळविल्यावांचून आह्मांस राहवत नाहीं. ते ह्मणतात कीं, आह्मांमधील एक दोन उत्तम पात्रें वजा केलीं असतां आमच्या नाटकाला पन्नास रुपये देखील योग्यता राहणार नाहीं. आमचें म्हणणें तशीं एक दोन पात्रें वजा झालीं असतां पन्नास रुपये पण काय? तर पांच कवड्या देखील किंमत राहणार नाहीं. हें आह्मी लहानशा उदाहरणावरून सिद्ध करून दाखवितों. या शरीराच्या मानानें "नाक" हा भाग केवढा बरें आहे? आह्मांस

वाटतें या सर्व शरीराच्या तुलनेच्या मानानें तो हजारावा किंवा दोन हजारावाही भाग होऊं शकेल. वरें तेवढा लहानसा भाग नाहींसा केला तर या शरीराला व्यंगता कां येते ? नुसती व्यंगता येते इतकेंच नव्हे तर तो मनुष्य इतका विद्रूप होतो कीं, त्याला मग त्याचे आईवाप किंवा नेहमीं निकट सहवासांत असणारी त्याची धर्मपत्नीही ओळखणार नाहीं. हें आमचें म्हणणें निराधार वाटत असल्यास त्यांनीं पाहिजे तर अनुभव घेऊन पाहावा; ह्मणजे खात्री होईल. असो. आतां सदर्हू अंकांतील लेखांत सदर पत्रकर्त्यांनीं आह्मांस " योग्यतेपेक्षां फाजील घमेंडी बाळगणारे नाटककार " असें विशेषण दिलें आहे. हें विशेषण देतांना, असें विशेषण आह्मांस न मिळण्याकरितां आम्हीं कसें वागलें पाहिजे होतें, हें कळविलें असतें तर फार चांगलें झालें असतें. त्यांच्या मतें हातांत तिकीटांचें बिंडोळें घेऊन व बरोबर नाटकांतील सुरेख एक दोन मुलें अगर असल्यास स्त्रिया यांसह नगरवासी रावसाहेब, रावबहादूर व मुख्यत्वेंकरून पत्रकर्ते यांच्या घरीं जाऊन हंजी हंजी करीत बसावें; म्हणजे फाजील घमेंडी न करणारे असे झालों असतों, असें वाटतें. परंतु त्यांनीं पक्कें समजावें कीं, मडक्यावर चुन्याचे ठिपके लावून मनुष्याच्या कृती करून उभारलेल्या शेतांतील बुजगावण्यास पांखरें, तींही पण प्रथम एक दोन प्रसंगीं भितील; ज्यांस हें बुजगावणें आहे असें पक्कें ठाऊक आहे असा मनुष्य कधींही भीति पावणार नाहीं. ज्यांच्यापाशीं सर्व संगीत तयारी नाहीं, असे नाटककार, आपल्या जाहिराती व हँडबिलें वेळेवर मिळावींत म्हणून त्याबद्दल योग्य किंमत देऊनही शिवाय फुकट तिकीटें वगैरे देऊन हंजी हंजी करतील; पण ज्यापाशीं सर्व तयारी, अडचण न पडण्यासारखी आहे असे नाटककार, आपल्या आवाक्याबाहेरील विषयांस झेप घालणाऱ्या पोटभरू वर्तमानपत्राच्या कशाही लेखाला न जुमानतां आपला वर्तनक्रम यथान्याय ठेवून आपल्या आर्यबंधूला संतोष देत फिरत राहतील. या शहरीं काळोख्या रात्रीं प्रकाश नसल्यानें रस्त्यांत ज्यापाशीं प्रकाशसंग्रह नाहीं अशा प्रवाशांस **धोंड्या**पासून त्रास होतो, पण ज्याच्या पुढें मशालजी आपली लखलखीत मशाल घेऊन चालला आहे त्यांस अशा **धोंड्या**पासून कांहीं त्रास न होतां, जर ते त्याच्या चालण्याच्या आड येतील तर त्यांस ते लाथेनें बाजूस ढकलल्यावांचून कधींही राहणार नाहींत.

आतां शेवटीं इतकेंच सांगणें आहे कीं, आह्मी या नाटकमिषानें या देशांतील प्रसिद्ध प्रसिद्ध ठिकाणीं फिरत असतां अति उत्तम व अति नीच जीं मनुष्यें दृष्टीस पडतात त्यांचीं चरित्रें आपल्या स्मरणपत्रिकेंत नोंदून ठेवून, " एकोणिसाव्या शतकांतील हिंदुस्थान " या नांवाचें जें आम्ही एक नाटक करणार आहोंत त्यांत आह्मी या महाराजांस रंगभूमीवर आणल्याखेरीज कधीं सोडणार नाहीं, असें त्यांस आश्वासन देऊन, ज्या सद्गृहस्थांनीं आह्मांस आश्रय दिला त्याबद्दल त्यांचे आभार मानून आह्मी या नागपूरवासी लोकांची प्रेमपुरःसर रजा घेतों."

सदर्हू मजकुरावरून वर्तमानपत्रांत कशा प्रकारची टीका काय हेतूनें आली असावी हें ध्यानांत येण्यासारखें आहे.

मंडळी **नागपुराहून अकोल्यास** आली. **उमरावती, नागपूर** व **अकोला** हीं शहरें भरभराटीचीं आहेत. हीं सुमारें वीस वर्षांपूर्वीं विद्याविषयक चळवळी व रसिकपणा या संबंधानें कांहीं मागसलेलीं व कांहीं सुधारलेलीं शहरें होतीं.* तिन्ही शहरांत, सुशिक्षित, व्यापारी, पांढरपेशे व सुखवस्तु लोक बरेच आहेत. तिन्ही शहरचा विस्तारही मोठा आहे. परंतु मंडळीस **उमरावती** व **नागपूर** या शहरांपेक्षां **आकोला** शहर रसिकतेच्या संबंधानें अगदींच मागसलेलें असें अनुभवास आलें. इतर शहरांतून ज्या नाटकावर व पात्रांवर लोकांच्या उड्यावर उड्या पडून पांचपांचशें रुपये सहज मिळावयाचे त्याच नाटकास व त्याच पात्रांवर **आकोल्यास** पन्नास रुपये मोठ्या मारामारीनें एखाद्या वेळीं मिळत. यावरून त्या शहरच्या रसिकपणाची व गुणग्राहकतेची कल्पना होण्यासारखी आहे.$

पूर्वीं **वैदर्भ** वर्तमानपत्र **अकोलें** येथें प्रसिद्ध होत असे. त्या पत्रांत सौभद्र नाटकावर फार मार्मिक टीका आली होती. ती वाचली असतां कदाचित् त्या शहरावर आलेला अरसिकपणाचा आरोप कमी होईल. ह्मणून ती मुद्दाम येथें दिली आहे.

"मागील अंकीं कळविल्याप्रमाणें ' किर्लोस्कर संगीत नाटककार ' मंडळीनें साग्र ' संगीत सौभद्र ' नाटकाचा प्रयोग गेले शनिवारीं व ' संगीत शाकुंतला ' चे पहिले चार अंकांचा प्रयोग गेले बुधवारीं करून दाखविला. शनिवारच्या प्रयोगास ठिकठिकाणचे लोक आले असल्यामुळें प्रेक्षकसमाज फारच मोठा जमला होता. सुमारें ६५० लोक असावेत असा अजमास आहे. मंडळीस द्रव्यप्राप्तिही वऱ्हाडच्या

---

* बजावा रामचंद्र प्रधान, वामन दाजी ओक, विष्णु मोरेश्वर महाजनी, हरी महादेव पंडित हेच फक्त वऱ्हाड व नागपूर प्रांतांतील ग्रंथकार व लेखक त्यावेळीं उदयास आलें होते. पैकीं प्रधान, ओक व पंडित यांच्या पश्चात त्यांच्या जागा अद्याप कोणी भरून काढल्या नाहींत.

$ १८९४ सालीं मंडळी पुन्हा एकवार या शहरीं गेली होती. त्या वेळीं मोरोबा भाऊराव यांच्या सारखीं पात्रें असूनही एकदां तर २७ रुपये मिळाले आहेत. मंडळीनें पुढें या शहरचें सत्व पाहण्यांत तात्पर्य नाहीं ह्मणून तेथें जाणें सोडलें.

मानानें चांगली झाली. बुधवारीं कांहीं विशेष कारणामुळें प्रेक्षकवृंद फारच कमी होता, व मंडळीस द्रव्यप्राप्तीही तादृशच झाली.

" संगीत सौभद्र " हें नाटक स्वतः रा. बळवंत पांडुरंग उर्फ अण्णा किर्लोस्कर यांनीं संस्कृत नाटकाच्या धर्तीवर रचिलें आहे. तरी प्रस्तावनेंत जरी उल्लेख नाहीं तरी स्वतःच्याच त्यांच्या बुद्धीनें हें ग्रंथित झालेलें दिसत नाहीं. शाकुंतल, मालती-माधव, मृच्छकटिक, वगैरे संस्कृत नाटकांतील कित्येक कल्पनांच्या आधारें हें रचिलें आहे, असें नाटक वाचतांच किंवा त्याचा प्रयोग पाहतांच स्पष्टपणें दिसून येतें. तारा ( रा. महाजनी यांची ) वगैरे एक दोन मराठी नाटकांतीलही कांहीं विचार व सौभद्रांतील कांहीं विचार यांत बरेंच सादृश्य दिसून येतें. अर्जुन त्रिदंडी संन्यास घेऊन रैवतक पर्वताच्या गुहेंत येऊन बसल्यावर त्याची द्वारका नगरींत प्रसिद्धि करण्याकरितां कृष्णानें पाठविलेल्या वक्रतुंड ब्राह्मणाचें भाषण व शाकुंतलांतील दुष्यंतमित्र विदूषक याचें भाषण यांत किती साम्य आहे ! तसेंच " + + नरवर हे काय बाई ॥ शुद्ध मन हें साक्ष देई ॥ " हें ( पान ११३ तील ) सुभद्रेचें ह्मणणें व " + + यदार्यमस्यामभिलाषि मे मनः ॥ सतांहिसंदेहपदेषुवस्तुषु । प्रमाणमंतःकरणप्रवृत्तयः ॥ " (=( किर्लोस्कर संगीत शाकुंतलांतील ) " + + अतिश्रेष्ठ मम मन इज वरती जात धांव घेउनी ॥ अपात्रीं वघत न जें ढुंकुनी ॥ साधूंना ये संशय कवण्या वस्तूच्या चिंतनीं ॥ ठरविती मनोवृत्ति पाहुनी ॥ ) ही दुष्यंताची पहिल्या अंकांतील उक्ति यांत किती फरक आहे ? सुभद्रेनें अर्जुनास शेला व अर्जुनानें सुभद्रेस रत्नमाला प्रेमदर्शक ह्मणून देणें हीही कल्पना मालतीमाधवांतील माला, व मृच्छकटिकेंतील शेला यांवरूनच सूचित झाली असावी. तसेंच सुभद्रा ही लग्नमुहूर्ताचेच दिवशीं नाहींशी झाली व मालतीही तशाच दिवशीं नाहींशी झाली. त्याप्रमाणेंच ( पान ७४ तील ) " अरे पण मी त्या गंगाजलाप्रमाणें निर्मल मनाच्या पुरुषाशीं असें कपटाचरण करितों आहे ना ? ( विचार करून ) छे छे, हें कांहीं फसविणें नव्हे. ज्याचा परिणाम हितावह तें आरंभीं जरी कपटरूपी भासलें तरी त्यांत दोष मुळींच नाहीं. " हें कृष्णाचें ह्मणणें व " देवा ! यावेळीं मी खोटें बोलतें. पण मी कोणाचें कांहीं नुकसान करीत नाहीं, तेव्हां तूं दंड करणार नाहींस खास. " हे तारा नाटकांतील ( १३८ पानांतील ) तारेचें भाषण हीं बरींच सदृश आहेत. तसेंच अरण्यांत अर्जुनानें सुभद्रेस झांकून ठेवून तिच्याकरितां पाणी आणण्यास जाणें व मागें ती नाहींशी होणें ( पान २७।२८ ) यांत व तारेला जाळीआड ठेवून राजारामानें जाणें व मागें ती नाहींशी होणें. ( पान १३७ ) यांतही बरेंच साम्य आहे.

अशी जरी ही कथा बनली आहे तरी " संगीत सौभद्र " हें नाटक एकंदरीनें फारच सरस उतरलें आहे. सुंदर कोंदण करून त्यांत शोभेल अशा प्रकारें हिरा

वसविण्यासही कमी कसब लागत नाहीं. कौशल्य चांगलेंच कसोटीस लागतें ! रा. किर्लोस्कर यांचा संस्कृत भाषेशीं, संस्कृत नाटकाशीं, साहित्यशास्त्राशीं व गायनकलेशीं बराच परिचय असून, व्यवहार यांस चांगला अवगत असावा व मनुष्यस्वभाववैचित्र्य यांनीं मार्मिकपणें अवलोकन केलें असून नाट्यकलेचें हृद्य यांना बरेंच कळलें असावें असें त्यांनीं जगापुढें मांडलेल्या रूपका ( दृश्य काव्य ) वरून सिद्ध होतें. प्रस्तुत कथानक भारतांतून घेतलें असून मूळांत मधून मधून बराच फरक केलेला आढळतो. मुख्य रस विप्रलंभशृंगार,सर्व काव्यांत दृक्‌गोचर होत असून संभोगशृंगार, करुण, शांत, हास्य, वीर, रौद्र या रसांचीही बरीच झाक आहे; व उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, निदर्शना, विषादन वगैरे अलंकार जागजागीं दृष्टिगोचर होतात. नायक अर्जुन हा ( अनुकूल ) शृंगारविषयक दर्शविला असून नायिका सुभद्रा विरहोत्कंठिता ( शृंगार विषयक ) दर्शविली आहे. उपनायक कृष्ण हा कपटपटु दर्शविला असून उपनायिका रुक्मिणी ही धीरोदात्त अशी दर्शविली आहे व या दंपत्यासच नाटकाचार्यानें पीठमर्द व दूती योजिलें आहे. सर्वांचे स्वभाव पुराणांत सांगितले आहेत तद्वतच बहुतेक दाखविण्याचा प्रयत्न केला असून तो बराच सफल झाला आहे. बहुतेक रूपक पद्यांनींच भरलें आहे, तरी पद्यरचना लक्षपूर्वक अवलोकन केली असतां रा. आण्णांचे अंगीं कवित्वशक्ति व समयस्फूर्ति हीं बरींच वसतात असें दिसून येतें. मधून मधून करुणारसपर पद्यें इतकीं उत्तम साधलीं आहेत कीं तीं वाचतांना व ऐकतांना हृदय द्रवत नाहीं. असा क्वचित्. सृष्टिवर्णन व कालवर्णन हेंही कांहीं ठिकाणीं फार सुरेख साधलें आहे.–परंतु हीं पद्यें बहुतेक सर्व रागरागणींत घातलीं असल्यानें गाण्याचें अंग नाहीं अशांस तीं वाचल्यापासून तादृश आल्हाद होणार नाहीं—**एकंदरीनें संविधानक विशेषतः शेवटाच्या अंकांत फारच चटकदार व खुबीचें उतरलें असून भाषा बरीच प्रौढ व शुद्ध असल्यानें प्रस्तुत नाटकाचार्यांस महाराष्ट्र नाटकाचार्यांच्या मालिकेंत बरेंच उच्च स्थान मिळेल यांत संदेह नाहीं. शिवाय त्यांनीं मराठी नाटकास अगदीं निराळ्या तऱ्हेचें रूप देऊन त्याची प्रतिष्ठा लोकांत वाढविली या त्यांच्या देशसेवेबद्दल त्यांस मान मिळेल तो निराळाच**—यद्यपि प्रस्तुत नाटकांत **विसंगतता, प्रकृतिविपर्यय ग्राम्यत्व, बीभत्सता, निरर्थकत्व**, वगैरेचे दोष बरेच पडले आहेत. ( पान ४८ त ) " काय मेला चमत्कार ! माझा रोग कोणता याची परीक्षा न करितां भलतेच उपचार केले तर काय होणार? " असें यतितीर्थ बलरामानें अंगावर सिंचन केलें असतां सुभद्रेनें अश्रद्धापूर्वक ह्मणून हा अर्जुन असेल अशी शंकाही तिच्या मनांत नसतां यतीची एकनिष्ठपणें सेवा करूं लागणें व त्यापासून " प्रकृति बरीच निवळल्यासारखी दिसूं " लागणें, व " पडली तर त्या महा

राजांची सेवाच माझ्या उपयोगीं पडेल " हें ह्मणणें यांत वरीच विसंगतता दिसून येते. तसेंच घटोत्कच राक्षसानें ( पान १९,—२० त ) कृष्णाच्या सांगण्यावरून सुभद्रेस अरण्यांत नेल्यावर " आतां हिला मजपासून सोडविणारा कोण आहे? या सर्व सौख्याचा उपभोग घेणारा दैववान पुतळा मीच आहें, यांत संशय नाहीं" असें ह्मणून तिला आलिंगन देण्यास प्रवृत्त होणें व पुढें ( पान २८ त ) कृष्णाच्या आज्ञेप्रमाणें मीं सुभद्रा देवीला इथें आणिली " व ( पान ११७ त ) " सुभद्रा काकीचरणीं हा वालक घटोत्कच वंदन करितों " अशा पूज्य नांवानें तिला उद्देशणें हेंहीं विसंगत दिसतें.—राक्षस झाला ह्मणून काय झालें? कृष्णाची वहीण असून आपली ही चुलती होणार हें त्यास पक्कें माहीत असतां तो असें नीच वर्तन करील असें संभवत नाहीं. त्याप्रमाणेंच ( पान ८१ त ) " पुरे, पुरे, मी सारें समजलों. तुझ्या मनांतून माझा व दादांचा विघड यावा, व स्वतंत्रपणानें आपण निराळें रहावें. खरोखर प्रपंचांत जें वंधूबंधूचें वांकडें पडतें त्याला कारण स्त्रियाच यांत संशय नाहीं. " हें कृष्णानें रुक्मिणीस ह्मणणें व ( पान ८४ त ) " सामान्य स्त्रियांची व माझी बरोवरी करून संशय घेतां हें मला चांगलें वाटत नाहीं." ही आत्मस्तुतिपर उक्ति रुक्मिणीनें काढणें या कल्पना अयुक्त होत. रुक्मिणी लक्ष्मीचा अवतार होती. कृष्ण तिला फार मान देत असे, व प्रशांत, गंभीर, प्रवुद्ध, निगर्वी असा तिचा स्वभाव होता अशाविषयीं पुराणांतरीं आख्या आहे. तेव्हां तिच्या संवंधानें अशा कल्पना अर्थात् ग्राम्य असून प्रकृतिविपर्ययाचा दोष आमच्या नाट्याचार्यांनीं केला असें ह्मणणें भाग आहे. त्याप्रमाणेंच कुसुमावती दासीनें आपल्या वरोवरीच्या सारंगनयना दासीला वारंवार " चांडाळणी " ह्मणून संवोधणें हेंही नीट दिसत नाहीं. " करपाशीं या तनुला " इ० इ० हा ( पान ७९ तील ) शृंगार साधारण मर्यादेच्या बाहेर गेला. " या कृत्या साह्य होती कां वहिनी रेवती।। " ही ( सुभद्रेची ५३ पानांतील ) उक्ति संविधानकास निरर्थक होय. कारण रेवतीला रंगभूमीवर आणिलें नाहीं किंवहुना, तिचा पुढें उल्लेखसुद्धां केला नाहीं. हें वाक्य मुळींच काढून टाकिलें तरी संविधानकास बिलकूल अपाय घडणार नाहीं. तसेंच पद्यांत अनार्थक असे शब्द पुष्कळ घातलेले आढळतात. तालसुरास जमवण्याकरितां पद्यांत वाटेल तशी भरती करण्यानें पद्याच्या सौंदर्याची हानि होते इकडे रा० किर्लोस्करांचें चांगलें लक्ष असावें. भाषेसंवंधानें " संगीत शाकुंतला " पेक्षां " संगीत सौभद्रां"त जास्त काळजी घेण्यांत आलेली दिसते, तथापि अद्यापि जास्त सुधारणा पाहिजे आहे. **ग्राम्यत्व व अशुद्धता** हीं भाषेंत अद्याप वरींच आढळतात.—पद्यांत तर हीं फारच दिसून येतात. ऐतिहासिकासंबंधाचे ही कांहीं थोडे दोष झाले आहेत. उदाहरणार्थः " अपराधाबद्दल तुह्मांस सर्वत्रांस तोफेच्या तोंडीं बांधून उडवून देतों " असें ( पान १२० त ) वलरामानें म्हटलें आहे. या काळीं तोफा असण्याचा संभव नाहीं. कित्येक उक्तींनीं चालू ओघाचा मध्येंच **वि-**

**घाडही** केला आहे. ( पान ६३ त ) " अहो वहिनी साहेब बोला. आणखी कांहीं उपदेश करा " हें सुभद्रेचें भाषण गंभीर भाषणाच्या चालू ओघास फार प्रतिकूल झालें; असो. सर्वांत मोठा दोष सांगणें आहेच. नाटकाचा मुख्य उद्देश उपदेश व मनोरंजन. यांतील दुसऱ्या हेतूकडे रा. किर्लोसकरांनीं चांगलें लक्ष दिलेलें दिसून येतें. परंतु पहिल्याकडे दुर्लक्ष झालें आहे. जगांतील घडामोडी रंगभूमीवर आणण्याचा मुख्य उद्देश हाच कीं पात्रांच्या भाषणद्वारें लोकांचें मनोरंजन करून त्यांस सदुपदेश करावा. अमुक अमुक गोष्टी अशा अशा घडल्या हें नुसतें रंगभूमीवर दाखविण्यापासून तादृश फायदा नाहीं या मोठ्या दोषामुळें या ग्रंथाची योग्यता बरीच कमी झाली आहे."

---

## चरित्रांतील प्रवेशक.

कादंबरीमध्यें गोष्टींचा शेवट जवळ जवळ येत चालला ह्मणजे तिच्यांतील आरंभापासूनच्या यच्चयावत् सर्व गोष्टींची जशी ताळाबेरीज द्यावी लागते, त्याप्रमाणें चरित्रांतील कथानक शेवटास जाण्यापूर्वीं त्यांतील उपकथानकेंही अवश्य असतात. प्रस्तुत चरित्रनायकाचा अवशेष कथाभाग फार थोडा असून उपकथानकांत येणाऱ्या चरित्रनायकाचे आचारविचार, त्याचीं मतें, गृहस्थिति, त्याच्या संबंधाच्या आख्यायिका, इत्यादि गोष्टी बऱ्याच महत्त्वाच्या आहेत. नाटकांतील प्रवेशकाप्रमाणें, चरित्राची परिपूर्तता होण्याकरितां या गोष्टींचा समावेश मध्यंतरींच केला असल्या कारणानें प्रस्तुत प्रकरणास प्रवेशक हें नांव दिलें आहे.

---

## अण्णासाहेबांविषयीं पूज्यबुद्धि.

**अण्णासाहे**बांनीं संगीत कला काढल्यापासून अगदीं अल्प काळांत त्यांच्याविषयीं लोकांत एक जी विलक्षण पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती तितकी **विष्णु शास्त्री चिपळूणकरा**खेरीज फारच थोड्याबद्दल पाहण्यांत आली असेल. त्यांचें संघट्टन अनेक विद्वान्, गुणी व वरच्या स्थितींतल्या लोकांपासून तें कनिष्ठ स्थितींतल्या लोकांपर्यंत सारखें होतें. त्यांच्या भाषणांत रसिकपणा, कोटिक्रम, विनोद, थट्टेखोरपणा व माहिती इतकी विपुल होती कीं, त्यांच्या सहवासांतला काळ केव्हांही

कंटाळवाणा वाटत नसून उलट करमणुकींत गेल्याप्रमाणें वाटे. पुष्कळ लोकांना त्यांच्याशीं नुसता परिचय असण्यांत मोठेपणा वाटत असे. व कांहीं लोक तर त्यांच्या अगदीं भजनीं लागल्यासारखें त्यांच्याशीं वागत असत. त्यांच्या संबंधानें ज्यांनीं आपली पूज्यबुद्धि व्यक्त केली आहे, अशांचीं कांहीं पत्रें पुढें दिलीं आहेत. तीं पाहिलीं ह्मणजे लोक त्यांना कसें मानीत असत याची कल्पना होईल.

**नाशीकचे बळवंतराव पारख** यांनीं पुढील कटाव रचून **उमरावती** येथें नाटकगृहांत वाचून दाखविला होता. यांत **अण्णासाहेबांचें** व मंडळीचें वर्णन केलें आहे:

**" विद्वज्जन शिरोमणी रा. रा. अभिनव कालिदास बळवंतराव पांडुरंग** ऊर्फ **अण्णासाहेब किर्लोस्कर संगीत नाट्यकलेचे जनक स्वा० से० नवीन कटाव.**

सुजनहो त्यागुनि दंभाला ॥ ध्या हृदयांतरिं सांवाला ॥ धृ० ॥ स्मरा सदोदित त्या शिखिंपिंछा ॥ धरा धरा तच्चरणीं निष्ठा ॥ त्यागा संसाराच्या कष्टा ॥ करा दूर कामादिक नष्टा ॥ कुकल्पना त्या त्यागा क्लिष्टा ॥ तशाच लोकीं कुमति कनिष्ठा ॥ टाकुनि ध्यावें सुरादि श्रेष्ठा ॥ शृंगी भृंगी नंदी वरिष्ठा ॥ अशा शिवाच्या स्मरुनि रुपा या ॥ नंतर ध्यातों श्री गुरुपायां ॥ चुकविति जे चौऱ्यांशि अपाया ॥ लाज कशाला तिथें खपाया ॥ करा सुजनहो सुलभ तपा या ॥ **गुर्लेस** गांवाचा तो पाया ॥ **मलप्रभे**च्या तिरीं अपा या ॥ पान करुनिया श्री शिव भार्या ॥ स्मरती मानिति जीतें आर्या ॥ लागति अपुल्या स्वधर्मकार्या ॥ ऐशा गांवीं **पांडुरंग** सुत ॥ नाम शोभतें ज्या **बळवंत** ॥ **अण्णासाहेब** जन हे बोलत ॥ **किर्लुस** गांवांमधील खोत ॥ ह्मणूनि **किर्लोस्कर** जन वदत ॥ त्यांनिं नाटकें रचिलीं संगीत ॥ हे नच संसाराच्या गुंगित ॥ भेदबुद्धि हिन करि वामुंगित ॥ शाकुंतल हें प्रथमचि रचित ॥ ज्यानें द्रवलें सज्जन चित्त ॥ स्वशक्तिमानें खर्चुनि वित्त ॥ रसीक न बघण्या मागें सरत ॥ सौभद्रामधिं सुरसचि प्राज्य ॥ फिकें ज्यापुढें दधि मधु आज्य ॥ असाच वियोग सुरामराज्य ॥ तिन्ही खेळही अतितर पूज्य ॥ साधुनि संसाराचें काज ॥ नाट्यकले मधि **अण्णा** सज्ज ॥ यांचा देशचि जो करनाटक ॥ तो या आज्ञापी कर नाटक ॥ सन्मार्गाचे असति सुवाटक ॥ अशीं ना-

टकें यांनीं रचिलीं ॥ **पुण्य**ग्रामीं मिळुनि मंडळी ॥ पंच विंशती झाले गोळा ॥ एकमतावरि ठेवुनि डोळा ॥ फिरती नगरें बारा सोळा ॥ विवेकदहनीं कुतर्क टोळा ॥ टाकिति जाळुनि त्याच वेळां ॥ पात्रें यांतिल उत्तम सारीं ॥ परंतु किंचित परिसुनि चतुरीं ॥ आणावे हे विचार अंतरिं ॥ सूत्रधारबलराम श्री नरा ॥ शकुंतला कैकेइ मंथरा ॥ दुष्यंता वा स्मरुनि मावरा ॥ ह्यांना बघण्या जीव हावरा ॥ कोण्या वेळीं होय कावरा ॥ आणि बावरा होउनि वाटे ॥ विस्मय मोठा शंभर वाटे ॥ कोण्या काळीं आनंदातें ॥ वाटति त्यावेळीं जणुं दाते ॥ अशीच रीती बहु सुखदाते ॥ ह्यामध्यें हे खोताचि पहिले ॥ **अण्णासाहेब** नामें वहिले ॥ **मोरोबा** हे देवचि आले॥ त्याच्या गानें सज्जन धाले ॥ **रामभाऊं**नी जें गाईलें ॥ त्यानें जनमनं प्रसन्न झालें ॥ **भाऊराव** हे मुख्य नायिका ॥ काय यापुढें करिति वायका ॥ सज्जन हो यद्वचन आयका ॥ वेध लाविती गुणी गायका ॥ जणु मदनाच्या ह्याच सायका ॥ पाहुनि विगलित तत्तद्भावें ॥ ज्यांच्या वांट्या जें जें यावें ॥ तें तें त्यानें सुखें करावें ॥ असो ह्यावरी मास्तर मोठे **देवल** दुसरे **दिवाण** साठे ॥ **काशिनाथ** ज्या रुपले कांटे॥ **भास्करा**दि जे गाटे गोटे ॥ सांगूं आतां सुजना कुठवर ॥ जो तो आपुल्या कामीं तत्पर ॥ नये मुखांतूनि कधिं असदुत्तर॥ भाषण यांचें फार मधुरतर॥ गायन विद्या ती बलवत्तर ॥ आनंदानें काल निरंतर॥ क्रमिती करिती कधीं न अंतर ॥ राहिल यांचें स्मरण निरंतर ॥ एथुनि रविवाराच्या नंतर ॥ जातिल सुकीर्ति मिळवायाला॥ गुण न जातसे कधीं वायाला॥ जागा दिधली त्या सुगुणाला ॥ आंगीं वेधुनि मौक्तिक झाला ॥ म्हणुनि आला सुनासिकाला ॥ पौष वद्य प्रतीपदेला ॥ शके अठराशें सहा भृगूला ॥ मित्रांच्या ऐकुनी आर्जवा ॥ केला आपण खेळ आठवा॥ ह्मणाल पुष्कळ दिवस आठवा ॥ जैसा द्वापर युगीं आठवा ॥ तैसा युष्मत् पक्ष बहुजवा ॥ पुनः पुन्हां पाहुनी पहावा ॥ **उमरावति**चीं सु उष्ण हवा ॥ घेउनि करिता खेळ सहावा ॥ रसिकां बघुनी हर्षचि व्हावा॥ अशा आपुल्या उत्तम नांवा॥ ऐकुनि आह्मीं अपुल्या गांवा॥ सोडुनि एथें घेऊनि धांवा ॥ येउनि आजचि बसलों ठावा ॥ सद्गुण त्यावरि कटाव गावा ॥ उद्भव मम मनिं ह्या सद्भावा ॥ मजवरि ममता सख्या भावा ॥ समान अकपट अक्षय ठेवा॥ ठेवा मजला आपण द्यावा ॥ असें वदुनि हा जोडुनि हस्त॥ विनवितसे मन करुनि स्वस्थ ॥ युष्मत्सुकीर्ति हो **बळवंत** ॥ **खंडूजी सुत** हा **बळवंत** ॥ **बळवंता**वरि कटाव करित ॥ विद्वानांचे सुपाद चुरित ॥ ईश्वरचरणीं

मस्तक धरित ॥ हा जन आपुल्या आणि सुधींच्या ठेवितसे पदिं भाला ॥ ध्या हृदयांतरीं० ॥ १ ॥

पुढील पत्र श्रीक्षेत्र त्र्यंबक येथून आलें होतें. पत्रांतील भाषा शास्त्रीय आहे. यावरून लिहिणारे कोणी शास्त्री असले पाहिजेत.

" श्रीजगदंब. मित्ती पौष्य शु॥ ८ गुरुवार.

श्रीमन्निखिलजनमनोल्हादक संगीत विद्याधर संपूर्ण गुणागुणाभिज्ञ राजश्रिया सालंकृत देशबंधो बळवंतराव उर्फ आण्णासाहेब किर्लोस्कर. यांसि—

कृतानेक नमस्कार विनंतिद्वारें कळविण्याचें कीं, ज्याचा कवि कालीदास व त्याचा संगीतद्वारानें भावार्थ न सोडतां अज्ञ जनांसही समजे असा महात्प्रयासानें तयार करून प्रसिद्ध केला त्यांत दोषाचाच स्वीकार करून हें लिहिणें केलें हें मनांत न आणतां विचारी बुद्धि आपली आदर करील अशी आशा ठेवून कळवितों. आमचे कंपनीनें संगीत शाकुंतल नाटक पाहिलें. त्यापासून आनंद किती झाला याविषयीं आम्हीं लिहिण्यानें आपणांस विशेष उत्तेजन किंवा कमीपणा हें थोडेंच आहे. आमच्या दोषदृष्टीनें एवढा कमीपणा दिसतो. मूळ पद्य " न खलु न खलु बाणः संनिपात्योऽय. " याचें संगीत पद्य " शशिकूलभूषण गुणवंता " यांत " अग्निपुष्पावरी जैसा " हा जरी कांहीं पुस्तकावरून आधार सांपडला असेल तथापि बहुतेक पद्यांत " तुलराशाविवाग्निः " यावरून अग्निपुष्पावरी येथें तूलावरी जैसा टाकूं नको. यांत सूक्ष्म विचार तूलराशीवर अग्नि ठेवला तर जसा तो दग्ध होईल तसा पुष्पावर अग्नि ठेवल्यानें तत्काल पुष्प दग्ध होत नाहीं. हा पूर्ण विचार करून देशबंधूच्या वर्गांत असल्यानें यथार्थ असल्यास लोभसह ग्रहण करतील. शनिवारीं येत्या येणार आहों. तिकीट खुर्ची घेणार. पत्रोत्तर फुरसत आलेंच पाहिजे."

पुढील दोन पत्रें अण्णासाहेबांस गुरुस्थानीं समजणाऱ्या त्यांच्या शिष्यांकडून आलेलीं होतीं. पहिल्या पत्रांतली जुनी नाटकी भाषा, व अण्णासाहेबांविषयीं पूज्यबुद्धि दाखविण्याची विलक्षण तऱ्हा व दुसऱ्या पत्रांतला वेड्यावांकड्या भाषेनें विचार व्यक्त करून दाखविण्याचा प्रयत्न हीं कांहींशीं मनोरंजक आहेत ह्मणून तीं येथें दिलीं आहेत:

" श्री बलवंतदास प्रसन्न.

**श्रीमत् गुरुवर्य अणासाहेब किर्लोस्कर मुक्काम पनवेल** यांचे चरणीं—

शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना–आपल्या सूचनेवरून सदलगेकर मंडळीची संगती धरलेली सोडून देण्यास परम सायास जाहले. सरतेशेवटीं माझें दोन तीनशें रुपयांचें सामान व बांटणी यासंबंधें बिलकुल आशा न ठेवतां एका लंगोटीनिशीं बा-

हेर पडून " देवाधर्मजागो " ह्मणत घरीं धारवाडास येऊन पडलों. पुढें ५ महिने रेलवे खात्यांत नोकरी करून " व्हावें तर शुद्ध नाटकी व्हावें " हीं गुरुमुखांतलीं अक्षरें निघालेलीं मनांत दृढ वागत असल्या कारणानें आपलें आयुष्य सर्व नाटकास अर्पण करण्याचा निश्चय करून असलेल्या चाकरीस राजीनामा दिला व आतां माझा पूर्ण बुद्धीचा ( मनाचा नव्हे ) कल असा झाला आहे कीं, स्वतः आपण मालकीनें नाटक करावें. माझ्याकडे पुष्कळ चांगल्या नीतिनें वर्तन करणाऱ्या, खडखडीत, न्यायी मंडळीचा राहण्याचा मानस आहे व सर्वत्रांचें ह्मणणें आहे कीं, अण्णासाहेबांच्या कृपेंकरून नाटक तयार असें करूं कीं, आपल्या इंडियामध्यें ख्याति करूं— गुरुकृपेची साउली-मागल्या खेपेस मद्रास इलाख्यांत बलवंतदास कवींचें दर्शन होण्यास्तव लोक अति उत्सुक झाले—कारणावांचून क्रिया घडणूक होणें कठीण— इकडे सर्वत्रांस-तिकडे अबालवृद्धांस खात्री आहे कीं, खऱ्या सद्गुरूचे शिष्ये हे आहेत. यांच्या अंगीं कर्तृत्व असें असण्यास यांचा पूर्ण साथी हा पांडुरंगराव बुवाजी आहे. खऱ्या वस्तादाचा पक्का शिष्या आहे. बुवाजी ह्मणण्याचें कारण मी गोसावी बाण्यानें राहतों व निस्पृहपणानें आपल्या कृपेनें वागतों याकरितां सिद्धि बरोबर असते, कोणाची एक दमडी घेणें नाहीं, वांछा नाहीं, याकरितां जितके दुःखणेंकरी मानसिक व्यथेनें पीडलेले आले-भूत पिशाच्याची कोणास बाधा जाहली अति संकटसमयीं कोणीं पाय धरले तर त्या लोकांस मी फक्त बिभूत आपल्या स्मरणानें लावीत असें व लावतोंही. त्यायोगें सर्वांस गुण येऊन चमत्कार व साक्षात्कार भासतो. तिकडे जाऊन मी आपल्या कृपेनें मंत्र शास्त्र, भरतशास्त्र, इत्यादिकांचें अवलोकन करून योगाचीही कांहीं ब्राह्मिणी ऐंद्ररंध्रि थोडीबहुत साधन केली आहे. अण्णासाहेब काय सांगूं ? आपली माझी गांठ सदां मला पडते. आणखी जे चमत्कार योग विद्येमध्यें आहेत तेही आपल्यास केव्हांतरी दाखवीन. ही सगळी मला प्राप्ति आपल्यावर भक्ति माझी बसली तेव्हांपासून होऊं लागली. आतां कर्तव्य आहे नाटक. मंडळीस ह्मणून या सर्व क्रिया पाहिजेतच.

मी कोणाजवळ आणखी मागणार नाहीं. कारण आपण एकटे माझे गुरु. त्यांत नाटक करणार आहे. देणार तर आपण द्या ५०० रुपये. सर्व तयारी करतों. स्वतः म्यानेजर होतों. ३ वर्षे एक स्वारी मद्रास, बंगाल, पंजाब करून मध्य हिंदुस्थानांतील राजे रजवाडे करून मुंबई, पुणें, सातारा करून रत्नागिरीस ( ह्म. हेडक्वार्टरास ) स्वारी ठेपिवणार.

रत्नागिरीची ७।८ मंडळी, अजऱ्याचे ३।४ असामी व जुन्या शिस्तीपैकीं कांहीं निवडक मंडळी स्नेही आहेत. अशा १८।२० असामींची मंडळी " रत्नागिरीकर हिंदु नाटकमंडळी " या नांवें कंपनी स्थापित करून हल्लीं—संस्थान सेनापतीची कापशी या मुक्कामीं सुखरूप आपल्या कृपेनें आहे. मी शुद्ध नाटकवाला झालों आहे. या

गांवीं ३।४ इसमास घेऊन येऊन राहिलों आहे. आतां पत्र लिहितों आहे. इतक्यांत माझी ७ मंडळी आली–दाखल जाहली–या गांवीं येऊन राहण्याचें कारण फक्त पोरांचें काय करावें पोरांव्यतिरिक्त नाटक नाहीं. शहरगांवीं त्यासंबंधें फारच बोभाट होतो, करितां मी येथें येऊन बसलों आहें. आज संध्याकाळीं, उद्यां सकाळीं बाकीची सर्व मंडळी येते. अक्टोंबरचा रेलवेंत, २५ रुपये पगार हातांत पडतांच या उद्योगास लागलों व तेवढ्यावर इतक्या पल्यावर येऊन पोहोंचलों आहे. सद्‌गुरुकृपेची सत्ता अनुभवी शिष्यासच ठाऊक. इतकें सर्व स्वतः नाटक कर्तव्य ह्मणून आपलें पत्र येतांच पायाची तिडिक मस्तकास पोहोंचली. तरी गाडा " धारवाडकर हिंदु ना. मं. " हा मीं उत्तम रीतींनेंच ढकलता, पण Indirectly ज्याबद्दल आपण सूचना केली होती त्या सदलगेकरांकडे म्यानेजरी आधींच दिली होती. मग काय करणार ? मी ह्मणत होतों त्याप्रमाणें त्या मंडळीस सर्व दाखला आला. तुमच्याबद्दल विकल्प त्यांना जेव्हां येऊं लागले तेव्हां त्यांचा नाश होऊं लागला- माझें वचन कधीं असत्य होणार नाहीं. पैसे खाणें, पोरांस बुडविणें, मारामारी करणें हा अधर्म तुह्मी करतां तर तुमच्या गुरुचाच तुह्मावर कोप होणार. तर तद्वतच त्यांस सर्व स्थिति तशी घडून येऊं लागली—असो—तें मोडो किंवा राहो जें आपल्यास नापसंत तें मला कसें पसंत पडेल ? सरते शेवटीं मी त्यांस सांगून सवरून सर्वांगास राख लावली. कारण माझ्याकडून गुरुनिंदा सहन होईना हें आपणांस माझें ब्रीद ठाऊकच आहे. आपलें पत्र त्यांस शत्रुरूप भासूं लागलें. बेळगांवास कांहींजणांस असें वाटत होतें कीं अण्णासाहेबांचा कायतो इकडे डौल, पुणें मुंबईकडे कोण विचारतो ! सांगलीकरी वाण्याचे ऐटींत पाणके असले तरी हकरत नाहीं, पण मिशीवर तांव देत होते; या एकंदर जणांस मला तोंड दाखविणें कठीण होऊन हिजड्यासारखे लपून बसूं लागले आहेत. अण्णासाहेब आपला गुण गुप्त ठेवून उपयोग नाहीं. अशांच्या हाडांची पूडच झाली पाहिजे. या कामास शिष्य आपला मीच पाहिजे व आहें ह्मणूनच बरें आहे. मागलें नाटक मीं स्वतः सर्वांस हिंदुस्थानी शिकवून तयार केलें होतें. करतां हेंही हिंदुस्थानीच करणार. कारण तेलंगण वगैरे प्रांतीं अन्यत्र ठिकाणींही ही भाषा सर्वसधारण आहे. मीं या भाषेंत आलीकडे बराच अभ्यास केला आहे " सर्व गुरुकृपेचें लेणें " हा आपल्या चरणांव्यातिरिक्त कोठेंहीं हात लाविल काय ? आपले प्रवासांत मध्यंतरीं एकदां आपणास मी आणवीन. रेलवे पाहिजे. एक महिना भर राहून मंडळीस दर्शन व उपदेश देऊन नंतर परत पोहोंचवितों. असो आतां मला काम आहे. पुरें करतों.

प्रति महिन्यास हिशोब पाठवीन, आज्ञा जशी तसा मी वागणार हें लिहिणें नको. हें पत्र पोहोंचतांच अवकाश करू नये. मी वाटच पहात होतों. आपल्यास पैसे मिळतांच नाटक आज्ञेनुसार स्वतः करावें. शिवाय रत्नागिरी जन्म भूमी—हा अ-

भिमान गुरू बलवंत असल्यावर मी कोट्यावधींचा सावकार असला तरी जी जाणारा नव्हें, आळसानें तसेंच बसाल, इकडे माझा घात होईल. लौकर रुपये पाठवा. एक वर्षांत परत करतों. मीच जामीन, मीच मागणारा, सत्यास कागद पत्र नको. पत्ता—" संस्थान सेनापतीची कापशी येथें " रत्नागिरीकर हिंदू नाटक मंडळी" चे म्यानेजर चिरंजीव पांडुरंग भिकाजी फडके यांस दिजे."

" Berhampure.
10-10-82.

From,
Wamanbhat Joshi Esqr.
Manager Dharwar Hindu Company
To
Balwant Raw alias
Anna Saheb Kerlosker Esqr.
Sir,

I am very glad to let you know your honour, that I together with my company enjoying sound health and hope you the same. From Cokinad I sent a letter concerning about all things, but as yet I have not received any answer. I have no notice of your staying &c. so I put a stop to write letter. Fortunately I came to know from Poona Dnayanchakshu Press that you are at Poona. So I wrote you this letter concerning about every thing about the company. From Cokinada we came to Vijagapatam there we performed some 20 plays and got 4000 Rs. From thence we came to Vizianager State. performed some plays in the town and some plays in Rajwada earned there 5000 Rs. Thence we went to Chicacole and thence to Kimidi State and now we are at Berhampore. Here we performed our Gajananas festival very rapidly and performed 5 plays. From this we are to go to Jagannath, Calcutta. Benaras upto Haridwar. I am very anxious to see you and to perform

some plays before your honour this is my only desire. By your favour we are doing well up to this time without any struggle &c.

We perform all our dramas in Brija language, because the people of this presidency dont know Marathi language we dont know Telegu.

I will give you short account about Mr. Pandurangrao Phadke. I wrote you once from Rajamadri about his condition &c. He turned mad at kocanda so I sent him to his native country for recovery. Again he joined the company without any call from the co. Then again he began to trouble the co. I say darely that he tried his best to brake the company but unfortunately he could not do. Such being the case heagain went away to his native country without the permission of the co. I informed you every thing. When I will meet you in person you will come to know every thing.

In short by your and Gajananas favour the company is in a prosperous state. No more particulars. I am very anxious to see you and hear your sound health. All the company people gave their hearty compliments.

I beg to remain
Yours sincerely
**वामनभट जोशी,** Manager.

हे दोन्ही गृहस्थ **अण्णासाहेबांचे** बेळगांवच्या चारित्रक्रमांतले स्नेही किंवा अनुयायी असावेत असें वाटतें.

कोणी शास्त्र्यांनीं **अण्णासाहेबांवर** स्तुतिपर छंदोबद्ध संस्कृत रचना करून त्यांस अर्पण केली होती ती याप्रमाणें:

शाकुंतलं तेपि मयाहि दृष्ट्वा ॥ तथापि सौभद्रमहं दिदृक्षुः ॥
नचापराधोऽत्र ममास्ति विद्वन् ॥ किंतु त्वदीयस्य गुणस्य नूनम् ॥१॥
नाटके अपि वलेन निर्मिते ॥ नाटके खलु विलोक्य चित्तमे ॥ प्रातरं-
बुजविडंविलोचना ॥ प्रातरम्यसुरवृक्षनंदने ॥ २ ॥

गेयज्ञत्वं कवित्वंच, विदुषां पालनादिकं । एतैर्गुणैः प्रत्युक्तत्वाद्बल-
वंत इतीर्यते ॥ ३ ॥

न कविं नु जगाम वामनं वा, न मयूरं तु भुजंगभुग्वरिष्ठं ॥ अभुजं-
गभुजंमहच्छरीरं बलवंतं प्रययौ सरस्वतीव ॥ ४ ॥

दिन एवं तनोति सूर्य इत्थं वसुदानं जनको ममेति कर्णः ॥ विजिगी-
षुरयं वदानशक्त्याऽवता राथ बलाभिधां प्रयातः ॥ ५ ॥

[ भावार्थ ]—तुमचें शाकुंतल पाहिल्यानंतर सुद्धां मला सौभद्र पाहण्याची इच्छा होते हा कांहीं माझा अपराध नाहीं; खरोखर हा तुमचाच दोष आहे. [ १ ]

तुह्मीं जें धैर्यानें नवीन नाटक तयार केलें आहे, तें पाहून कल्पतरूंनीं पूर्ण अशा नंदनवनांतील प्रातःकाळीं फुललेल्या कमलाप्रमाणें नेत्र प्रफुल्ल होतात. [ २ ]

गायनाची माहिती, कवित्व, विद्वानांचा परामर्ष घेणें इत्यादि तुमच्या अंगच्या गुणांमुळें तुम्हांला बलवंत असें ह्मणतात. [ ३ ]

वामन कवि तर उघड उघड ठेंगणा, मयूर तर भुजंगावर उपजीविका करणारा; ह्मणूनच त्यांच्याहून श्रेष्ठ असणाऱ्या सरळ भुजांच्या आणि धिप्पाड आकृतीच्या बळवंतालाच सरस्वतीनें वरिलें असें वाटतें.[४]

सूर्यप्रकाशामुळें धनदान फक्त जनकच करितो, असें ह्मणतात. त्याला औदार्यानें दिपविण्यासाठींच हा बळवंत नांवाचा अवतार झाला कीं काय? असें वाटतें. [ ५ ]

एका कवियित्रीनें पुढील पत्र अभंगरूपानें **अण्णासाहेबांकडे** पाठविलें होतें:—

आह्मी रचितों नाटका ॥ त्याचा परिणाम निका ॥ करणें तुह्मांकडे ॥
नये पडूं देऊं कोडें ॥ सुरक्षित व्हावें ॥ हेंची मागतों स्वभावें ॥ ...ह्मणे
करा ॥ कोणा कोणी करि धरा ॥

यावें भेटायाला ॥ किंवा बोलावा आह्माला ॥ काय येतें मना ॥ द्यावें
उत्तर सज्जना ॥ विचारावें मना ॥ द्यावें उत्तर पुन्हां ॥ करा खट-
पट ॥ ...पहातसे वाट ॥

अभंगाच्या रचनेवरून तिनें कवित्वाचा पहिलाच धडा घेतला होता

असें दिसतें. कदाचित् कवीला पत्र लिहावयाचें ह्मणून तात्कालिक स्फूर्तीनेंही वरील पत्र लिहिलें असेल.

प्रसिद्ध **साधु यशवंतराव महादेव** मामलेदार, **काशीचे तारकाश्रम** स्वामी ह्मणजे पूर्वाश्रमांतले प्रसिद्ध कीर्तनकार **गोविंदबुवा नाशिककर** **अण्णासाहेबांस** पूज्य समजत असत. **अण्णासाहेबांचें** मन पुढें पुढें व्यवहारविषयक गोष्टीवरून निघून विरक्तीकडे वळत चाललें होतें. हा संस्कार त्यांच्या मनावर होण्याला कारण कदाचित् अशा पुरुषांचा कांहीं सहवास किंवा त्यांचें उदाहरण असलें पाहिजे. कांहीं असलें तरी **अण्णासाहेब** पूर्वीं लोकमतानें निंद्य मानलेल्या एका व्यवहारांत असतांना अशा प्रकारें पूज्य झाले होते.

---

## अण्णासाहेब-नट आणि नाटककार.

रामराज्यवियोग तीन अंक ही **अण्णासाहेबांची** शेवटची कृति होय. यानंतर त्यांच्या हातून ग्रंथरचना किंवा काव्यरचनात्मक उद्योग झालेले दिसत नाहींत. फक्त चौथ्या अंकांतील पहिल्या प्रवेशाचा आरंभ त्यांच्या हातचा लिहिलेला आहे.* तिसऱ्या अंकाच्या समा-

---

* सदर प्रवेश पुढें दिला आहे. हा प्रवेशाचा नुसता आरंभ आहे, तरी त्यांतील शब्दरचना किती प्रौढ आहे हें दिसून येतें.

" अंक ४. संगीत रामराज्यवियोग.

( तदनंतर आसनस्थ सीतेसह राम प्रवेश करितो. )

**राम**—प्रिये कांहीं कारण नसतां तुह्मां स्त्रियांना असा हा राग येतो तरी कसा ? मला वाटतें तुजसारख्या सद्गुणी स्त्रियांचा स्वभाव जरी सहवासानें पतीसारखा झाला, तरी केव्हां केव्हां आपल्या जातीवर गेलाच पाहिजे. पहा:

पद: ( शशिकुल भूषण सदया )

अपराधाविण पतिला ॥ छळिता आनंदाला ॥ मानुनि निष्कारण कोपाला ॥ वाढविती नारी ॥ १ ॥ ममता प्राणापरती ॥ करि जरि कांतेवरती ॥ बळेंच होऊनि निष्ठुर चित्तीं ॥ पीडिति निजपतिला ॥ २ ॥ रमवाया जाया तो ॥ जितुका यत्नचि करितो ॥ तितुका त्यांचा कोप पेटतो ॥ स्वभाव हा स्त्रीचा ॥ ३ ॥

( टीप पुढें चालू ).

ष्टीनंतर ता. ७ आगष्ट १८८४ ही तारीख आहे. तेव्हां या तारखेपुढें केव्हां तरी तो लिहिलेला आहे.* त्यांनीं ग्रंथरचनेच्या कामांत पुढें शिथिलता स्वीकारली होती. रामराज्यवियोगाच्या पहिल्या तीन अंकांवरून **अण्णासाहेबां**ची ही कृति त्यांच्या सर्व कृतींत सरस व कुशलतेची होणार होती. या नाटकांत उदात्त व नीच अशा भिन्न प्रकृतींचीं पात्रें दाखविण्याचे प्रसंग सौभद्र नाटकापेक्षां पुष्कळ होते. परंतु तें नाटक दुर्दैवानें पूर्ण झालेलें पाहण्यास न मिळाल्या कारणानें लोकांचा एक प्रकारें कायमचा मनोभंग झाला आहे. १८८० पासून १८८४ पर्यं-

---

( टीप मागील पृष्ठावरून ).

पण जानकी, तुझी गणना तर या स्त्रियांत होत नसून आज असं काय करितेस बरं !

**सीता**—झालं. असं आमच्या स्त्रीजातीवर दूषण देऊन टाकलं ह्मणजे जरी मला खरा राग आला असला तरी तो मी मनांतल्यामनांत गिळून मुकाट्यानं बसावं वाटतं. काय त्या खोडकर बायकाच, आणि पुरुष मात्र धुतलेल्या तांदुळासारखे अगदीं निर्मळ मनाचे असतात ना ?

**राम**—( किंचित् हंसून ) मग पुरुषाचे असे कोणते दुर्गुण असतात ते बाहेर काढण्याला तुला कुणीं नको म्हटलें आहे ?

**सी०**—कांहीं नको बाई. उगीच थोडीशी रागावून बसलें तर इतकीं वर्मं काढलीं, नी तसं कांहीं बोललें तर काय परिणाम होईल तें कांहीं कळत नाहीं.

**राम**—पण प्रिये, थोडासा तरी राग तुला कशाचा आला बरं ?

**सीता**—अहाहा ! निजलेल्या माणसाला जागं करतां येईल, पण बळेंच झोपेचं सोंग घेणाऱ्याला काय करावं बाई. साऱ्या जन्मांत ठाऊक नव्हता असा प्रसंग काल रात्रीं मजवर आपण आणलात. त्यावेळीं मला काय झालं तें कांहीं सांगतां येत नाहीं.

पद. ( सखये अनुसूये या चा० )

वेळा येण्याची जैं टळली ॥ मति माझी घाबरली ॥
निद्रा कैसी ती नच आली ॥ तनु व्याकुल झाली ॥
कर्णी चाऊल ये जरी कसली ॥ स्वारी ये वाटे आपुली ॥
वर्षापरि रात्र किती झाली ॥ अतिकष्टें घालविली ॥ १ ॥

**राम**—( तिला कुरवाळून ) सखे आतां लक्षांत आलं. खरोखर तुझ्या कोमलअंतःकरणाला काल मी दुःख देण्याला कारण झालों खरा. पण काय करावं अगदीं निरुपायामुळें तसं करणं मला भाग पडलं....( हा प्रवेशक येथेंच अर्धा राहिला ! )

तरी त्यांचीं नाटकें व त्यांचें नाट्यकुशलत्व हीं त्यांच्या महतीला कारण झालीं आहेत. ते जसे नाटककार या नात्यानें प्रसिद्धीस आले, त्याचप्रमाणें नट या नात्यानेंही प्रसिद्धीस आले होते. आमच्यांत नाटककार असणारे नट असलेले यांच्या पूर्वीं कोणी झाले नव्हते. संस्कृत नाटकाचा काल होता त्यावेळीं नाटकप्रयोगांत ग्रंथकर्ते स्वतःकडे कांहीं भूमिका घेत होते किंवा कवि व नट यांचें नातें अगदीं पृथक् असे, याबद्दलचा कोठें इतिहास नाहीं. **कालिदास, भवभूतीसारखे** महाकवि नुसते नाटककारच होते किंवा नटही होते ह्यासंबंधाचीही साधार माहिती मिळण्याचा संभव नाहीं. तरी पूर्वीं नाटककारापेक्षां नटाचें महत्त्व कमी समजलें जात असलें पाहिजे हें उघड आहे. कदाचित् हल्लींप्रमाणें त्यावेळीं नट आणि नाटककार यांच्या परिस्थितींत समाजदृष्ट्या अंतर असेल. **अण्णासाहेबां**च्या अंगीं दोन्ही कला पूर्ण वसत होत्या. त्यामुळें नट व नाटककार यांमधील भेद त्यांनीं नाहींसा करून टाकला होता. ते जितके प्रासादिक कवि होते तितकेच कुशल नटही होते. उत्तम बुद्धीचा कवि असेल तो उत्तम बुद्धीचा नट असेलच असा नियम नाहीं. एकादा नाटककार एकाद्या पात्राच्या तोंडांतून असें एकादें भाषण वदवील कीं तें ऐकून प्रसंगाप्रमाणें, प्रेक्षकांचीं मनें थक्क होऊन जातील, किंवा विव्हल होतील किंवा आनंदानें उचंबळून येतील. परंतु तेंच भाषण त्याला स्वतःला बोलून दाखविण्याचा प्रसंग आला तर कदाचित् त्याच्या हातून तें काम होणार नाहीं. ग्रंथदृष्ट्या उत्तम असून कांहीं नाटकें प्रयोगदृष्ट्या निरुपयोगी होतात,याचें कारण नाटककारांना रंगभूमीवरचा अनुभव नसतो व ते नुसते आपल्या कल्पनेच्या जोरावर रचना चालवीत असतात; परंतु शेवटीं ती नीरस ह्मणून अनुभवास येते. उत्तम कवि आणि नट या दोन्ही गोष्टी अगदीं भिन्न आहेत. परंतु **अण्णासाहेबां**च्या बाबतींत त्या अगदीं एक आहेत असें प्रत्ययास आलें होतें. **मोरोबा, भाऊराव** व **बाळकोबा** यांच्यासारखीं अप्रतिम गाणारीं पात्रें त्यांच्या नाटकांत कामें करीत असतां, **अण्णासाहेबां**चें तेज वास्तविक फिकें पडावयाचें, परंतु त्यांच्याकडे ज्या भूमिका असत त्या ते आपल्या अभिनयानें प्रेक्षकांच्या मनांत इतक्या भरवून देत असत कीं, ती कामगिरी त्या गाणाऱ्या पात्रांच्या हातूनही होत नसे.

भाषणांतील किंवा पद्यांतील अर्थ स्वतः पात्रांच्या मनांत बिंबल्याखेरीज तो दुसऱ्याच्या अंतःकरणांत भरविणें शक्य नसतें; व संगीत पात्रांत अशा तऱ्हेचा अर्थ समजणारीं व समजून काम करणारीं पात्रें फारशीं अढळून येत नाहींत. त्यामुळें प्रेक्षकांना पात्रांच्या गाण्यापलीकडे दुसरा विशेषसा आनंद होत नाहीं. संगीतांत वळणशुद्ध अभिनय कसा करावा याचा पाठ **अण्णासाहेबांनींच** घालून दिला म्हटलें तरी हरकत नाहीं. त्यांचा प्रत्येक अभिनय अर्थद्योतक असे. शाकुंतलमध्यें वैखानस व शार्ङ्गरव; सौभद्रांत बलराम व रामराज्यवियोगांत दशरथ या भूमिका ते स्वतः करीत असत. या करते वेळीं जो आविर्भाव, ते निरनिराळ्या विकाराच्या मुद्रेनें दाखवीत असत, त्यांचा परिणाम प्रेक्षकांच्या मनांवर झाल्याशिवाय कधीं रहात नसे. शाकुंतलांतील व रामराज्यवियोगांतील अगदीं शिपायासारख्या भूमिकाही कधीं कधीं त्यांनीं घेतल्या आहेत. कांहीं पात्रास महत्त्वाच्या भूमिका घेण्याची हौस असते व कांहींना हलक्या भूमिका घेण्यांत हलकेपणा वाटत असतो; परतु **अण्णासाहेब** अगदीं हलकी भूमिका घेऊन तिच्यांत आपलें कौशल्य दाखविण्यांत भूषण आहे असें समजत असत. ते स्वभावतः आळशी असत. परंतु नाटकाच्या कामांत यत्किंचित्‌ही कधीं हयगय किंवा दुर्लक्ष करीत नव्हते. ह्मणून त्यांनीं जें नांव मिळविलें आहे तें **नट व नाटककार** या नात्यानें मिळविलें असून तें त्यांच्यापूर्वीही कोणीं मिळविलें नाहीं व नंतरही एका **देवला**खेरीज सांगण्यासारखें कोणीं मिळविलें नाहीं.*

---

## आमचा प्रेक्षकसमाज.

**इंग्लंड**पेक्षां **फ्रान्स**मध्यें नाटक पाहणाऱ्या प्रेक्षक समाजाची व्यवस्था अनुकरण करण्यासारखी आहे. तेथील सर्व लोकांना उत्तम प्रकारचीं नाटकें कशीं पाहावींत याचें शिक्षण मिळालेलें असतें. नाटक कृती-

---

* शेक्सपीयर, गोल्डस्मिथ, आणि शेरिडन या तिन्ही नाटककारांत शेक्सपीअर. फक्त हॅमलेट नाटकांत भुताचें सोंग करीत असल्याची दंतकथा आहे.

त गुणाचा पुष्कळसा भाग असल्याखेरीज नाटक पाहण्याचें त्यांना ठाऊक नसतें. ग्रंथकाराकडून किंवा नटाकडून जनरुचिविरुद्ध क्षुल्लकशी जरी कृति झालेली आढळली कीं, सर्व नाटकगृह तिचा निषेध करण्यास तयार असतें. मोठ्या नामांकित ग्रंथकाराला किंवा नटाला सुद्धां या शिक्षेस पात्र होण्याचा कधीं कधीं प्रसंग येतो. नवीन नाटकाचा प्रयोग व्हावयाच्या दिवशीं नाटकगृहांत असणें हा प्रत्येकाला मान वाटत असतो. अशा प्रसंगीं मोठे मोठे विद्वान्, मुत्सद्दी, ग्रंथकार, कवि, नट हे सर्व नाटकगृहांत हजर असून नाटकाविषयीं आपलें स्पष्ट व खरें मत देत असतात.* अशा योग्यतेचा प्रेक्षकसमाज सुमारें वीस वर्षांखालीं

---

* यासंबंधाचें पुढील वर्णन वाचण्यासारखें आहे:

" The public in France has that intuitive taste in the drama, which the public in Itally has in music. In Itally, they say, in the smallest town that has an opera-house you will find an audience that knows good singing from bad, and not merely in the stalls, but in the gallery, and that audience is both a merciless and an upright judge of every *debutant*, It is much the same in Paris where the whole population has been educated on dramatic *Chefs-d' œuvre*, ( शेडूव्हर-कला किंवा ग्रंथ यांची उत्तम कृती ) and has never known what it is from its earliest infancy to see work without a very high average of merit. You my often see a shudder pass round the house at some touch of bad taste on the part of author or actor, and even men of the first rank like Coquelin or Got, are not exempt from an occassional liability to this most awful and effaetive kind of censure. Criticism of every kind is of course in fullest force on the night of a first representation. A first night has quite exceptional attraction in France. It is a point of honour with every one in society with every man about town, to have seen the first of the new play, in as much as a new play, is sure to be

( टीप पुढें चालू ).

पुणें शहरांत पाहण्यास मिळत असे. त्या वेळीं या शहरांत एक सुशिक्षित व दुसरा जुन्या समजुतीचा असे नवे जुने दोन वर्ग होते. तरी बहुजन समाजाचा कल जुन्या समजुतीच्या लोकांकडे विशेष असे. सुशिक्षित वर्गांतील विद्वान् लोकांविषयीं जुने लोकांची आदरबुद्धि असे तरी, त्यांच्या सर्वच गोष्टी त्यांना मान्य होत्या असें नाहीं. पुणें शहरांत ज्या ज्या संस्था त्या वेळीं होत्या त्या बहुतेक या सुशिक्षित लोकांच्या पुढारीपणाखालीं अस्तित्वांत होत्या; परंतु लोकांस त्यांपैकीं कांहीं मान्य झाल्या व कांहीं झाल्या नाहींत. प्रार्थनासमाजपंथ, पुनर्विवाहपक्ष, इत्यादि धर्मसंबंधीं

---

( टीप मागील पृष्ठावरून ).

the wonder of the next nine days, a topic on which it behoves every man to have an openion. A great deal has been written about the composition of a first night audience, and accordingly to M. Charles Garnier, the architect of the opera it has many and divers elements. " First all the representatives of the Parisian press, both political and literary, then the managers of other theatres, and all the actors and actresses, that can get a holiday; deputies, senators, ministers past, present and future and number of personages belonging to society at large. The Academy and the Institute send their cantigent; and at one time it was easy enough to see Victor Hugo, Legouve, Augier. petava, Feutlet, Camille Doucet, Alexandre Dumas Sardou, Labiche, Pailleron, Sandeau Ambroise Thomas, Gound, Massenet, Saint Sæns all in the house together." With such an auditory, actors naturally do their best; and this, according to Mr. Garnier, explains why dramatic art in France has survived the decay of so many other institutions Good taste may have forsaken the tribune of Parliament, and the Law courts, but it is still preseived as a living force on the stage."

Living Parish

व सामाजिक नव्या चळवळींस रानड्यासारख्या विद्वानांचें पाठबळ होतें तरी त्या मागें पडल्या, व वक्तृत्वोत्तेजक सभा, सार्वजनिक सभा इत्यादि संस्था भरभराटीस आल्या. यावरून **पुणें** शहरच्या लोकांच्या अंगीं ग्राह्याग्राह्य पाहण्याची पोक्त बुद्धि स्वाभाविक होती हें दृष्टोत्पत्तीस येतें. **किर्लोस्करांना** जें यश आलें आहे त्याचा बराच वांटा **पुणें** शहरच्या लोकांकडे आहे. दोन्ही वर्गाच्या लोकांना **किर्लोस्करांची** अभिनव कृति मान्य झाली होती; व त्यांनीं तिचा आरंभापासून चांगला गौरव केला होता. **पुणें** शहरचीं नाटकगृहें मोठींशीं शोभिवंत नाहींत, तरी अनेक समंजस व मार्मिक प्रेक्षकांच्या योगानें तीं फार शोभिवंत दिसत असत. **किर्लोस्करांनीं** संगीताचा उपक्रम **बेळगांवासच** केला होता; परंतु तेथें त्याचें बीं पेरलें गेलें नाहीं, तेंच **पुणें** शहरांत आल्याबरोबर त्यांच्या उद्देशाला चांगलीं फळें आलीं. यावरूनच **पुणें** शहरच्या मार्मिकतेची परीक्षा होण्यासारखी आहे.

**मुंबईचाही** प्रेक्षकसमाज **पुण्याच्या** तोडीचा होता. दोन्ही **शहरें** अनेक प्रकारच्या चळवळींत नेहमीं गुंतलेलीं असतात. या दोन शहरांचा जितका निकट संबंध आहे तितका इतर शहरांचा नसतो. त्यामुळें पुष्कळ गोष्टी **पुणें** शहरानें **मुंबईच्या** अनुकरण केल्या आहेत व **मुंबईनें पुण्याच्या** अनुकरण केल्या आहेत. " वन्समोअर " ची पद्धत **पुणें** शहरांत वीस वर्षांपूर्वीं नव्हती म्हटलें तरी चालेल. ती **मुंबईचें** अनुकरण होय. दोन्ही शहरच्या प्रेक्षकांच्या गुणांची तुलना केली तर **पुण्याचे** प्रेक्षक जितके चवचाल—त्यांना दोष म्हणून खपावयाचे नाहींत तितके **मुंबईचे** उदार--किरकोळ दोषांकडे दुर्लक्ष करणारे—असे होते; परंतु दोन्ही ठिकाणचा एकंदर प्रेक्षकसमाज वजनदार, गुणग्राही व पात्रांना प्रोत्साहन देण्याविषयीं तत्पर असा असे.*

---

* सदर्हू वर्णन वीस वर्षांपूर्वीचें आहे. आलीकडे निरनिराळ्या प्रकारचीं नाटकें प्रचारांत येऊं लागल्यामुळें लोकरुचि पुष्कळ बदलत चालली आहे. याचें कारण आमच्याकडची नाटक पाहण्याची पद्धति इंग्रजी राष्ट्रांतील नाटक पाहण्याच्या पद्धतिपेक्षां फार भिन्न आहे. आह्मी नाटक फक्त करमणुक या दृष्टीनें पाहतों. म्हणून प्रत्येक नवी करमणुक आह्मांस हवीशी वाटते. तिकडचे लोक त्या विषयावर व्यासंग

( टीप पुढें चालू ).

मुंबई पुण्याच्या मानानें इतर शहरांतून विद्येचा प्रसार फारसा झाला नव्हता. त्यामुळें साधारण जनसमुदायाच्या अभिरुचीला कायमचें वळण लागावयाचें होतें तें किर्लोस्करांनीं आपल्या संगीत नाटकाच्या द्वारें लावून दिलें.

---

## स्फुट पद्यें.

अण्णासाहेबांच्या मनांतून शांकरदिग्जय नाटकाचा प्रयोग स्वतः करून दाखवावयाचा होता. त्याची पात्रयोजना करून स्वतःकडे त्यांनीं शंकराचार्यांची भूमिका घेतली होती. परंतु त्याच्या तालमी कांहीं दिवस होऊन तें रंगभूमीवर येण्याचें तसेंच राहिलें. असाच दुसरा एक त्यांचा बेत अर्धवट राहिला. त्यांच्या मनांतून स्वतः कीर्तनकार व्हावयाचें होतें. त्यांच्या या विचाराला बाबासाहेब गर्दे यांची अनुमति होती. त्यांनीं अण्णासाहेबांस याबद्दल पुढील पत्र लिहिलें होतें:

" कारवार ता० १२ जुलै १८८४

सा० न० विज्ञापना विशेष. आपलें पत्र पावलें. पद्यें पाठविण्याबद्दल लिहिलें. त्यांस आमची फेर कापी चालली आहे. ती जाहल्यानंतर एक दोन दिवसांत कांहीं पद्यें कथेस उपयुक्त अशीं निवडून पाठवून देतों. रा० मोरोबास सा० नमस्कार सांगावा. कीर्तनाचा बेत ऐकून आनंद जाहला. पद्यें सुमारें ६५ जाहलीं आहेत. आणखी १५ होतील.

बाबा गर्दे. "

---

( टीप मागील पृष्ठांवरून ).

करून नाटकें पाहतात. तिकडे नाटकविषयावर चर्चा करणाऱ्या स्वतंत्र संस्था आहेत. तेथें विचारपूर्वक त्या विषयाचा खल होऊन मत बाहेर पडत असतें. फ्रान्समध्यें नाटकमंडळ्यांनीं आपलीं नाटकें प्रसिद्धपणें दाखविण्यापूर्वीं टीकाकारांस दाखविण्याची पद्धत काढली आहे. या पद्धतीच्या योगानें टीकाकारांस दोन तीन वेळां नाटक पाहण्यास मिळून आपलें मत स्थापित करण्यास पुष्कळ अवधि व संधि सांपडते. तिकडील वर्तमानपत्रांनींही नाटकविषयाच्या चर्चेकरितां आठवड्यांतून स्वतंत्र एक दिवस नेमून दिलेला असतो. या दोन्ही व्यवस्था फार हितावह झाल्या आहेत व त्यांचा परिणाम लोकरुचीवर व नाट्यकलेवर चांगला झाला आहे.

**अण्णासाहेबांच्या** मतानें त्या वेळेच्या कीर्तनपद्धतींत दोष होते. एक तर **कीर्तनकारांत** लोकांना उपदेश करण्यास पात्र असे फारच थोडे होते, दुसरें कीर्तनांतही अज्ञान स्त्रीपुरुषांना रंजविणाऱ्या गोष्टी किंवा गायनादि प्रकार यांपलीकडे कांहीं नसे. कीर्तन हा भक्तिमार्गाचा एक भाग आहे. त्याचा उपदेश करणारे आचरणानें निर्मळ असले पाहिजेत. परंतु भाविक लोक अंधपरंपरेनें, कीर्तनकार वर्तनानें कितीही निंद्य असले तरी त्यांस पूज्य मानीत आले होते. वस्तुतः त्यांच्यापासून लोकांना ज्ञानदृष्टीनें कांहीं फायदा होत नव्हता. हे दोष मनांत आणून लोकांस भक्तिरसाचा लाभ घेतां येईल असा कथेचा उपक्रम पूर्वरंगापासून स्वतःच्या रचनेनें चालविला होता. प्रथम अनुसंधान लावण्याकरितां अभंग रचला होता तो हाः

सुख पाहिजे सर्वांसी ॥ परी तें मिळालें कवणासीं॥१॥सारी खटपट सौख्यासाठीं ॥ पण ती निष्फल कीं शेवटीं ॥२॥ खरें सुख जेथें आहे ॥ नेत्र उघडुनी कोणि न पाहे॥३॥सुख असुनी अपुल्या घरीं ॥ भिक्षा मागे दारोदारीं॥४॥केली ओरडजी बहु संतीं॥ उठली प्रतिध्वनि बलवंतीं ॥ ५ ॥

पुढील पद्य **बाबासाहेब गर्दे** यांनीं कीर्तनाकरितां रचलेल्या पद्यांपैकीं आहेः

बीज पेरावें ॥ तैसें फळ तोडुनी ध्यावें ॥ वन पर्णाशन धूम्रपानें ॥ उग्र तपाच्या आचरणानें ॥ अर्जित शापानुग्रहदानें ॥ जगा जिंकावें ॥तैसें फळ०॥१॥ हट योगाचीं आठ अंगें॥यम नीयमादिक साधुनी चांगें ॥ आणिकादिक सिद्धीच्या योगें ॥ लोक भुलवावें॥तैसें०॥२॥ संगती करूनि संतजनाची॥रहाटी ठेवुनि हरिभजनाची॥मौज मारुनी सगुणभक्तीची प्रेमामृत प्यावें॥ तैसें०॥ ॥३॥सद्गुरूचा उपदेश घेउनि ॥ श्रवण मनन अभ्यास करोनि॥ तत्त्वमसीनें ब्रह्म जाणुनि ॥ स्वस्थ बैसावें ॥तैसें०॥४॥

कीर्तनांत **अण्णासाहेब** पुढें व **मोरोबा, भाऊराव** मागें असा कीर्तनाचा थाट अपूर्व व्हावयाचा होता; परंतु तो जुळून आला नाहीं.

अण्णासाहेबांना शंकराची भक्ति विशेष असे हें त्यांनीं शाकुंतल, सौभद्र, रामराज्यवियोग इत्यादिनाटकांत मंगलाचरणाला शंकरावरचीं पद्यें घातलीं आहेत त्यावरूनच दिसून येत आहे. इतर देवतांवरही त्यांनीं स्फुट पद्यें रचलीं आहेत. त्यांत त्यांची वर्णनशैली अधिक दिसून येते. हीं पद्यें त्यांच्या पूर्ववयांतलीं आहेत.

पुढील भूपाळीच्या पद्यांत त्यांची जन्मभूमि गुर्लहोसूर इचें वर्णन आहे.

( मलीन वस्त्र परिधान करितसे या चालीवर. )

ऊठ भवानीवरा दयाळा वेळ बहुत जाहली ॥ पूर्वदिशामुख रक्त करित ही रविप्रभा आली ॥ धृ० ॥ स्नान करुनि मुनि निजाग्निसदनीं उद्धरणा करिती ॥ सुखासनीं सरसाउनि योगी समाधि आचरिती ॥ गुरुपद वंदुनि सुशिष्य सारे स्वाध्ययना करिती ॥ आंग धुवोनि नदिवरुनि सुवासिनि निजाश्रमा येती ॥ अध्यात्म ग्रंथाच्या पठणीं मग्न होति सुयती ॥ प्रातर्विधी सारोनी नैष्ठिक ब्रह्मचारी बसती ॥ आपआपल्या नियमारंभि तपि सिद्ध याच कालीं ॥ पूर्वदिशा० ॥ १ ॥ ग्रामवासि जन दंतधावना करोनिया आले ॥ पूजापुष्पें आणावयास्तव आरामीं शिरले ॥ घरोघरीं जलदिनें पहा हें दधिमंथन चाले ॥ वेणिफणी करण्यांत कुमारीयूथ मग्न जहाले ॥ अधिकारी बहु तत्पर होऊनि चावडींत बसले ॥ कृषिकर्मी निजपशु घेऊनिया क्षेत्रीं चालीले ॥ दोहन होतां गोमहिषी त्या नेल्या गोपालीं ॥ पूर्व० ॥ २ ॥ तवोत्सवा जे श्रमुनी रात्रीं भक्त सुखें निजले ॥ आरंभाया नित्यकर्म ते पहा सिद्ध झाले ॥ वासुदेव सुब्रह्मण्यादिक सेवेकरी आले ॥ पांडुरंग तव पूजक हा तुज ऊठ ह्मणुनि बोले ॥ वाट पाहाती कर जोडुनि तव पहा सकल चेले ॥ आवडत्या बाबाच्या शब्दें तरि आतां हाले ॥ बळवंताची वाणी खचितचि उमाधवा दमली ॥ पूर्वदिशा० ॥ ३ ॥

## गौरीहर पूजा.

( लावणी. हटातटानें पटा रंगवुनि० या चा० )

नरा करीरे त्वरा शरण तूं जाई गौरीहरा ॥ होशिल भवतापांतुनि बरा ॥ धृ० ॥ खराच फसशिल खरा ॥ जरासा

राख भक्तिचा झरा ॥ भरारा आली वघ ही जरा ॥ वरात येईल घरां यमाजी ओढितील फरफरा ॥ दुराशा सोड कामकिंकरा ॥ चाल ॥ या विषयगरामध्यें बुडूं नको पामरा ॥ सुंदरांगनोवरि विट यो झरझरा ॥ ही दारा नच हें कारागृह कर चुरा ॥ चाल ॥ करांत घे शिव हिरा झडकरी टाक भवा खापरा ॥ होशिल भवतापांतुन बरा ॥१॥ सदाशिवाला फिदा करि तो कदां न सोडिल तुला ॥ मदाच्या नदांत नच जा खला ॥ सदापदाहर पदारविंदावरि सदां दाखला ॥ यदां धरशिल तदां तूं भला ॥ चा०॥ हा काल काल चुकविल तुझ्या मृत्यूला ॥ गोपालपाल फिरविल मनोवृत्तिला ॥ हा भालनेत्र देईल करीं मुक्तिला ॥ चाल॥ पुराराति गुरूवरा सुरारे ऐसें वद सरसरा॥ होशिल भव० ॥ २ ॥ आज काय वदूं साज कसा सुरराज गौरि घेऊनी ॥ अंकीं बसला माझा धनी ॥ लाज सोड घालीन माज मग माग काज जें मनीं ॥ देईल वदान्यवर वेचुनी ॥ चा० ॥ हा योग सकल योगांत बहुत चांगला॥ मृडमृडानि संगम नेत्रिं आजि देखिला ॥ हा ब्रह्मानंदचि पाहुनि मज जाहला ॥ चा० ॥ प्रसादरूपी असो सदां शिरिं बलवंताच्या तुरा ॥ होशिल भव० ॥ ३ ॥

## कृष्णावतारावरचीं पदें.

( नोहे नारी ही चंचल वल्ली या चा० )

वंदूं भवनाशन तुज घननीला॥ सुरनुतपद कमला ॥ध्रु०॥ जगद्व्यापि निर्लेप असुनिया ॥ मायाशक्ति विचालित निखिला ॥ व्योमाकृति घटिमठि जैसी भरली ॥ सत्ता तव दिसली ॥ वार्ता द्वैताची नाहीं उरली ॥ मति कुंठित जाहली ॥ निगमागम वाणि मागें फिरली ॥ स्वानुभवें ठसली ॥ चाल ॥ नामरूप नष्टांश जाहल्या अस्ति भाति प्रिय भावहि गेला ॥ वंदु० ॥ शेषावरि पहुडुनि योगनिद्रा ॥ घेशी सुरभद्रा॥ दावी मनमोहन सुंदर मुद्रा ॥ दुर्मिळ जी रुद्रा ॥ ताता जाणासि तूं आमुच्या छिद्रा ॥ किति सांगु दयार्द्रा ॥ चा० ॥ धांव धांव वैकुंठपालका॥ भक्तचित्तचातक घनमाला ॥ वंदु०॥ पृथ्वीवरि सर्वहि दुर्नय करिती॥ पातक आचरिती ॥ गाई विप्रातें पीडा देती ॥ धर्मा संह-

रती ॥ वसुधा अघनग भरभारें रडती ॥ साहिल कैसी ती ॥ चा० ॥ गरुडवाहना पन्नगशयना ताराया ये बळवंताला ॥ वंदु० ॥

### पद २ रें.

राग यमनकल्याण. ध्रुपद ( चौताल. )

मदन कदन पद वंदी कविवर ॥ सुखसंपादे कवनि सुमति दे सकल सदाशिव मग भररररर ॥ धृ० ॥ जाणुनि भूमिसराक्षस भरभर ॥ स्तविति अनंत पयोनिधी तटि सुर ॥ अवतरला मथुरा गोकुलि जो नंदयशोदा सुखकर मुरहर ॥ १ ॥ खेळत मुलांत नाचत गिरिधर फेकि अनंत सुशर व्रज वधुवर ॥ गोकुलि चोरी दधिनवनीता ॥ गोप युवति हृत् सरसिज दिनकर ॥ २ ॥ गाइन हरिची लीला सुंदर गाति जी नारद सुरमुनि किन्नर ॥ बळवंताची वाणी आणी प्रेक्षकहृदया पाझर झर झर ॥ ३ ॥

### कोल्हापूरच्या देवीवरचें पद.

( ऋषिच्या तपा विघ्न केलें. या० )

झडकरी पाव जगज्जननी ॥ कोल्हासुर मर्दुनि करविरीं, वससि सुखसदनीं ॥ धृ० ॥ उजवेकडे महाकाली ॥ वामीं सरस्वति ठेली ॥ गजानन मूर्ति पुढें बसली ॥ सकल सुरप गिरिजावल्लभ तो धरिशि शिरस्थानीं ॥ झड० ॥१॥ मनकर्णिका काशि दत्त ॥ मुक्तिमंडप बहु लखलखित ॥ राम अहिशयन रमाकांत ॥ राधा कृष्ण शनैश्चर मारुति राहति सुवेष्टुनी ॥ २ ॥ पंचगंगा झळके नामी ॥ समाधित नारायण स्वामी ॥ गरुडमंडप किती वर्णू मी ॥ दक्षिणकाशी म्हणोत परि मज अधिक दिसे तुलनी ॥ ३ ॥ मनोरम रूप तुझें माते ॥ गदा खेटक फलपात्रातें ॥ धरुनि उभी चार हाते ॥ बलवद्दास मनोरथपुरणि अससि कास कसुनि ॥ झडकरी० ॥ ४ ॥

### दत्तावरचें पद.

( मला शांत मुनि भासतो० या चा० )

मनो वसतु मम यतिवरे बोध निकरे ॥ पंचगंगा सुकृष्णांतविहरे ॥ धृ० ॥ व्यक्तविधिहरिहरे ॥ रक्तछाटीधरे ॥

दंडसुकमंडलु श्रीविहारे॥ भक्तकरुणाकरे दत्त जगदीश्वरे॥
गाणगापुरपरिव्राट प्रविरे ॥ १ ॥ सकल सुरसेविते॥
अत्रिसतिलालिते ॥ ज्ञानशशिमुदितहृत चंद्रकांते ॥ अ-
गमनिगमांचिते विषयसुखविरहिते ॥ नीच पैशाच्य नग-
चंडविधुरे ॥ २ ॥ दीनजनतारके ॥ आत्मसुखपूरके ॥ स-
त्पथस्थापितानंतलोके ॥ दुरितवन पावके ॥ दास भवमो-
चके ॥ मूढ बलवत् हृदानंदसारे ॥ ३ ॥

बेळगांव जिल्ह्यांत चंदगड तालुक्यांत पारगड ह्मणून एक ठि-काण आहे. तेथील देवीच्या दर्शनास अण्णासाहेब गेले होते त्यावेळीं त्यांनीं पुढील पद केलें:

( निग्रहानुग्रही दक्ष आह्मी जाण हे या चा० )

नमश्चंडमुंडांतके सौख्यघटके ॥ मदनसूदन महाकंठपदके
॥ धृ० ॥ रक्तबिंबाधरे भक्तसुखसागरे ॥ रक्तभूग्रस्तसक्तां-
गहारे रक्तमालाधरे रक्तपटपरिकरे ॥ रक्तबीजस्त्रिये धूत-
तिलके ॥ १ ॥ पर्वचंद्रानने सर्वजनलोचने ॥ गर्वभरिता
सुरस्तोमनिधने ॥ सर्वतनुचंदने पर्वतानंदने ॥ शार्वरी-
प्रियविभे गानरसिके ॥ २ ॥ आदिजननीप्रिये आदिकम-
लालये ॥ आदिमध्यांतहीनादिमाये ॥ आदिपुरुषस्त्रिये
आदिमंत्रश्रिये ॥ आदि कविद्दास बलवत्सुतवके ॥ ३ ॥

अण्णासाहेबांचा कंठ मधुर नव्हता, परंतु त्यांच्या आवाजांत कांहीं एक प्रकारचा मोहकपणा असे. शिवाय त्यांच्या कवितेंत सहज ओघानें आलेली शब्दरचना व अर्थ समजण्यासारखी ह्मणण्याची त्यांची हतोटी यांच्या योगानें ऐकणारांचें चित्त ते आकर्षण करीत असत.

---

## गृहस्थिति.

अण्णासाहेबांच्या कुटुंबांत वडील, मातोश्री ( सापत्न ), चुलते व बंधुवर्ग इत्यादिकांचा मोठा परिवार होता. अण्णासाहेबांस संतति नव्हती. सुमारें तीस वर्षांच्या वयापूर्वीं त्यांस तीन मुलें झालीं होतीं. परंतु तीं अगदींच अल्प वयांत वारलीं. एवढ्या मोठ्या कुटुंबांत मिळविते असे अण्णासाहेबच होते. त्यांचे वडील व चुलते आतां वृद्ध झाले होते

व स्वतःचे व चुलत भाऊ सर्व लहान होते. हें घराणें पूर्वीचें गर्भ श्रीमंतींतलें होतें. परंतु पूर्वींचीं गर्भश्रीमंतींतलीं घराणीं, पुढें मोठा रोजगार व कामगिऱ्या करण्यास मार्ग न उरल्या कारणानें बहुतेक खालावतच चाललीं होतीं. त्याप्रमाणें हेंही घराणें खालावलें होतें. **अण्णासाहेबांचे** वडील कांहीं उलाढाल्या करीत असत; परंतु त्यांत त्यांना यश येत नसे. उलट त्या अंगावरच येत. **अण्णासाहेबांचा** आतांशा कोठें चालता काळ येण्यास सुरुवात झाली होती. यापूर्वीं त्यांच्या नोकरीचा कुटुंबाकडे कांहीं उपयोग होत नसे. संसारसंबंधीं बाबतींत हे अगदीं बेफिकीर असत. वडिलांना वेळेवर खुशालीचें पत्र पाठविण्याचें सुद्धां त्यांच्या हातून होत नसे. त्यांचा लौकिक एवढा चोहोंकडे गाजत होता, परंतु वडिलास ती वार्ता लोकवार्तेवरून समजून येत असे. **अण्णासाहेब** इतके पैसे कमवीत असून आपला कर्जभार हलका होत नाहीं याबद्दल पर्यायानें त्यांच्या वडलांनीं **गणपतराव किर्लोस्कर** यांच्या पत्रांत कसे खेदोद्गार काढले आहेत हें पुढील पत्रावरून समजण्यासारखे आहेत.

" गुर्लहसूर ता. परसगड ता. २९ आगष्ट १८८४.

चिरंजीव राजमान्य राजश्री गणपतराव किर्लोस्कर यांशीं पांडुरंग नारायण किर्लोस्कर अनेक आशीर्वाद उपरी श्री कृपेंकरून सर्व कुशल असे विशेष. आपण फार दिवस, जीर्ण लोक आह्मी, आह्मास पत्र पाठवीत नाहीं. असें उदासीन नसावें. सर्व क्षेम कुशल असल्याबद्दल व आमचे चिरंजीवाचा मुक्काम हल्लीं कोठें आहे, पुढील कर्तव्य काय त्यासुद्धां ल्याहाल तर आह्मी आनंद पावूं. चिरंजीवासही उदासीन नसावें याविशीं पत्रीं विनंति करून आमचे अनुभवास आणून द्यावी: हें कर्तव्यापैकीं समजलें पाहिजे. चिरंजीव दादा हल्लीं श्रावण अखेरपासून धारवाडास गेले आहेत. चिरंजीव मंडळी तुह्मादि सर्वांनीं आमचीं कामें शुभस्य शीघ्रं हें मनांत आणून केल्यास चिरंजीव यांजवर बोजा नसून मुधोळकर व सांगलीकर वगैरे यांस आपल्या करामतीनें प्रसन्न करून घेऊन त्यांचे दस्तऐवजबरहुकूम त्यांजकडून आमचीं वेतनें चालू होऊन मागील राहिले सालाबद्दल आकार आह्मास मिळाल्यास देण्याच्या पेचांतून पार होऊं. नाहींपेक्षां देणेंदाराचे घरीं जन्मांतरीं रेडे होऊन राबावें लागेल. तुह्मीं साठ हजार रुपये मिळविले खर्च केले. याणें कांहीं आमचा पेच चुकत नाहीं. त्यांच्या हृदयांत ठसण्याकरितां हें पत्र चि० रा० बळवंतराव किर्लोस्कर व गणपतराव व आण्णाकडे क्रमानें सरक्युलर फिरवावें. अस्तु. वाटेल तें करा. एक काम लहान, फल मोठें, सर्व लोकमुखीं कीर्ति अशा प्रकारचें फर्मास क-

रतों. अव्हेर कदापि करूं नका. गुर्लहसूर येथील श्री सद्गुरु चिदंबरेश्वर देवाचा महोत्सव कार्तिक व॥ १ पासून सप्तमीपर्यंत आगमोक्त रथोत्सव होतो. त्या उत्सवमूर्तीला पागोटें उत्तम पुण्यांत पगड्यादाखल तयार होतात, त्या मासल्याचें तांबडें पदर वगैरे उत्तम अशा प्रकारचें बाराचवदा रु. किंमतीचें तयार करून पाठवावें. ह्मणाल कीं, केवढें मोठें असावें. ? तर बाराचवदा वर्षांच्या मुलाच्या डोक्यास येण्याजोगें असावें. त्याबरोबर शेलारी लहान फडकी एवढी लांब रुंद रंगदार कलाबतू कांठ घालवून, पदरासही कलावतु चमत्कारिक दुहेरी घालवून लांब हात पांच रुंद दोन हात त्याबद्दल दाहा रुपयेपावेतों लावून दिवाळीच्या आंत तयार करून पाठवाल तर त्यापासून मंगलदायक फल सत्य होईल याविषयीं व सदरींविशीं विचार कराल तो उत्तरांत जरूर कळवावा हे आशीर्वाद.

**पांडुरंग नारायण किर्लोस्कर.”**

पुढचें पत्र अण्णासाहेबांच्या चुलत्याकडून आलेलें आहे. या पत्रांतही संसारांतील अनेक उपाधींबद्दल स्पष्ट उद्वेग दाखविला आहेः

“ धारवाड.

चिरंजीव विजयी भव राजमान्य राजश्री अण्णा किर्लोस्कर मु॥ मुंबई यांसी रंगो नारायण किर्लोस्कर कृतानेक आशीर्वाद. श्रीकृपें सर्व मंडळी सुखरूप असो विशेष. आपल्याकडून निमंत्रणपत्रें आलीं. त्या वेळीं हुबळींत होतों. कारण कार्तिक व॥ ५ स ब्रह्मीभूत दादा गर्दे यांची पुण्यतिथी. त्याबद्दल चिरंजीव रा० बाबा गर्दे यांच्या सूचनेवरून गेलों होतों. तेथें पूर्वी सोमण मामलेदार व गर्दे यांचीं पत्रें पाहिलीं. नंतर माझें पत्र आलें. तीं सर्व पाहून प्रत्यक्ष भेटीतुल्य आनंद झाला. त्या पर्ली अलिकडे पत्र येत नाहीं असें दर्शविलें त्यांस चिरंजीव रा० रा० गणपत राव्जी किर्लोस्कर यांनीं जी मदत केली त्याबद्दल त्यांचे पूर्ण आभारी असून त्यांनीं शेवटीं जीं चार अक्षरें लिहिलीं तीं निरंतर डोळ्यांपुढें दिसत आहेत तीं हीं कीं, “ आह्मीं तर आपलें वचन पार केलें. पुढें तुमचें वचन पार करणें तुह्मांकडे. ” हे शब्द अगदीं हृदयास झोंबून राहिले आहेत तें ईश्वरकृपेनेंच शल्य निघावयाचें त्यांत मन गुंतून आहे.

तीर्थस्वरूप रा. रा. तात्या यांचे नांवें एक पत्र मालतीमाधव नाटकासंबंधानें आलें होतें. त्यांत चिरंजीव रा. गंगाधर अभ्यास सोडून कां गेला ? असा एक प्रश्न होता. त्यांस पोटांतील विकारानें प्रकृति अशक्त असून हवा न मानतां नेहमीं पडसें, खोकला व केव्हां केव्हां ज्वर येत असल्यानें अभ्यासाकडे मन लागत नाहीं, असें समजल्यावरून निघून येण्यास लिहिलें. इकडे आल्यावर प्रकृति हल्लीं बरी आहे. कोल्हापुरास राहून अभ्यास करावा ह्मणतात. कित्येकांचें मत असें

आहे कीं, अशक्त प्रकृतीस जास्ती अभ्यास करणें रास्त नाहीं. पुढें कसें काय होतें तें पहावें. साल मजकूर शाळेची परीक्षा होऊन चि० रा. धोंडू सातव्या यत्तेंत व शंभू सहावे यत्तेंत अभ्यास करूं लागले आहेत.

प्रपंच ह्मणजे दुःखजाळयांतून निराळें निरंतर राहण्यास उपाधि दूर झाल्या पाहिजेत. त्या मुख्यत्वें लोकांचे ऋणांतून पार होणें व पुढें प्रपंच चालविण्याचा भार पुत्रांनीं घेणें अशा मनानें मानिल्या आहेत. त्या प्रारब्धकर्मानेंच सिद्ध व्हावयाच्या. तशा दैववान पुरुषासच कांहीं तरी जीवन्मुक्ति सुखाचा लाभ होणार आहे. तें सर्व दैवाधीन असल्यामुळें त्याच्या विवंचनेंत अर्थ नाहीं, तथापि आपण जसें उपचारार्थ निमंत्रणपत्र लिहिलें तसें उपचारिकच हें लिहिणें आहे.

होतां होतां विस्तार बराच झाला. पुढें आपला बेत कुणीकडे जाण्याचा होईल तो कळवीत असावें. इतकें सांगून हें पत्र पुरें करतों. लोभ करावा हे आशीर्वाद.

चि० रा. रा. गणपतरावजी वकील यांस आशीर्वाद प्रविष्ट करावा. रा० रा० मोरोबा बावा यांस सा० न प्रविष्ट व्हावा."

**गणपतराव किर्लोस्कर** यांनीं **अण्णासाहेबांच्या** वडलांस बरेंच साहाय्य केलें होतें. हे **मुंबई हायकोर्टांत** त्यावेळीं प्रसिद्ध वकिलांपैकीं एक असून यांचा चालता काळ होता.

**अण्णासाहेबांनीं** कमिशनरच्या कचेरींतील आपल्या नोकरीचा हक्क १८८९ सालापासून बदलून घेऊन ते **इंदूरसरकारचे** कायमचे नोकर झाले. याप्रमाणें कित्येक वर्षें सलत असलेला सरकारी नोकरीचा पाश त्यांनीं कायमचा तोडून टाकला.

वरील दोन्ही पत्रांवरून **अण्णासाहेबांच्या** गृहस्थितीची कल्पना होईल. **अण्णासाहेबांच्या** चुलत्यांनीं आपला परिवार पुढें **धारवाडास** आणून ठेविला होता. तरी संसारसंबंधीं एकोप्यांत उभयतां भावांत कोणत्याही तऱ्हेचा विभक्तपणा नव्हता.

**किर्लोस्कर** घराण्याचा व **बेळगांवचे** जिल्हा जज्ज **मे. शा. साहेब** यांचा ऋणानुबंध होता. ह्मणून **रंगोपंतदादांनीं** त्यांची गांठ घेऊन त्यांच्या मार्फत मुलांच्या शिक्षणाची सोय **कोल्हापुरास** लावण्याची खटपट केली होती. परंतु तिच्यांत त्यांना यश आलें नाहीं. ती हकीकत पुढील दोन पत्रांत आहे:

" धारवाड ता. २३।२।८५.

चिरंजीव राजमान्य राजश्री बळवंतराव अण्णा किर्लोस्कर मुक्काम इंदूर यांसी रंगो नारायण किर्लोस्कर कृतानेक आशीर्वाद. आपण पेशजी श्रीक्षेत्र नाशिकाहून पत्र पाठविलें होतें त्यावेळीं मी धारवाडास नसतां गुर्लहोसुरांत होतों. त्यामुळें वेळेवर पत्र न पोंचतां उशीरानें आलें व आपण लवकरच उमरावतीकडे जाणार असें त्या पत्रीं असल्यावरून उत्तर पाठविलें नाहीं. हल्लीं आपला मुक्काम इंदुरास असल्याचें मुंबईच्या पत्रावरून समजलें. चिरंजीव गंगाधर याच्या प्रकृतीस पुणें मुंबईची हवा मानेना. वरचेवर प्रकृती बिघडूं लागली. सबब इकडे निघून आल्यानंतर मेहेरबान शा साहेब जज्ज संवदतीस आले होते, त्यांस चिरंजीवासह आह्मीं भेटून सर्व हकीकत कळविल्यावर त्यांनीं कोल्हापूरचे एजंट साहेब यांचे नांवें एक चिठ्ठी दिली. ती घेऊन त्यांच्या सांगण्याप्रमाणें बेळगांव मुक्कामीं एजंटसाहेब आले होते त्यांस तेथें जाऊन भेटल्यावर कोल्हापुरास यावें असें सांगितलें. त्यावरून गंगाधर व शंभू उभयतांही करवीरास निघून गेले. गंगाधर कालेजांत व शंभू हायस्कुलांत अभ्यास करतात. शंभू सातवे यत्तेंत आहे. येथपर्यंत सर्व नीटच झालें. परंतु करवीर मुक्कामीं एजंट साहेब भेटल्यावर बेळगांव मुक्कामीं बोलणें झालेली ओळख मुळींच नसून आमचे हातून कांहींच होणें नाहीं असें साफ सांगितलें. मग आमच्या दुर्दैवानें ह्मणा, किंवा एजंट साहेबांच्या विलक्षण स्थितीमुळें म्हणा अशी गोष्ट घडून आली. आणि उभयतांच्या खर्चास निदान वीस रुपये पाठविण्याची दर महिन्यास नवीन विवंचना प्राप्त जाहली. होणारास उपाय नाहीं. उभयतांनीं गेल्याप्रमाणें अभ्यास करावा. इकडून खर्चास पाठवितों असें त्यांस लिहिलें आहे. व त्याप्रमाणें करणें आतां भागच आहे. जज्ज साहेबांनीं चिठ्ठी दिली होती तिची नक्कल आपल्यास पाहण्याकरितां पाठविली आहे. त्याचा उपयोग मात्र जाहला नाहीं. चिरंजीव गणपतराव चार महिने येथेंच असून हल्लीं रेलवेसंबंधानें पुण्याचीं आफिसें येथें येणार त्यांत कांहीं शिरकाव जाहल्यास पहावा अशा खटपटींत आहेत. चि० रा० धोंडू सातवे यत्तेंत आहे. सदर्हू नकलेचें अक्षर त्याचेंच आहे. व वडील गुर्लासुर मुक्कामीं व बाकी येथील तेथील मंडळी क्षेम सुखरूप आहेत. मी आणखी चार दिवसांत गुर्लासुरास जाणार आहें. पत्राचें उत्तर क्षेम समाचाराचें पाठविणें जाहल्यास तिकडेच यावें. श्रीमंत होळकर थोरले महाराज यांची प्रकृति बिघडल्याची खबर वर्तमानपत्रावरून कळते. ईश्वरानें खैर करावी. रा० रा० नाना मोरोजी तेथें आल्याचें कळतें. त्यांची भेट झाल्यास माझा नमस्कार पोंचविणें. कारण ते जुने स्नेही आहेत. लोभ करावा हे आशीर्वाद. रा० रा० मोरोबा बावा गवई यांस साष्टांग नमस्कार. "

पुढील पत्र शा साहेबांनीं कोल्हापूरच्या एजंट साहेबांस दिलें होतें. त्यांत अण्णासाहेबांच्या घराण्याची व तें कसें खालावलें याची माहिती देऊन मुलांस मदत करण्याबद्दलची शिफारस केली आहे.

" Savandutti.

My dear Harry

The bearar Gangadher Rangnath Kirlosker is son of late Mamledar at Ajara, his uncle Pandurang Narayan is in the village Gurlahasure close by, he was formerly banker to the Ramdurg, Ichalkaranji and other chiefs The family like many other families is down in its luck. The old members are estimable Brahamins of old school. Anna, son of Pandurang was formerly in Crawford's office, but prefered the stage and I believe has taken office as Pradhan of some company. Another distant relative Ganesh Ramchandaa is a Vakil in High Court. A have told you all I know of the family with which I have been acquainted last 32 years. The bearer Gangadher is evidently not strong. He wishes to prosecute his studies up to B. A. in Kolhapur and wants you to help him in any way you can. He would like an under tutorship to some chief of Rs. 20 or so monthly to help him to study.

Very truly
Shaw. "

Christamas day. 1 in 67dr, rain yesterday.

पुढील तजविरींत अण्णासाहेब व गणतपराव किर्लोस्कर यांच्या कुटुंबांतील मंडळी आहेत. १ गणपतराव किर्लोस्करांचा गडी. २ विष्णुपंत किर्लोस्कर हे एल. एम. ॲन्ड एस. ची परीक्षा उतरलेले डाक्टर आहेत. ३ यादवराव साठे बारशीस मामलेदार होते. यांचा गणपतरावांच्या कुटुंबांत फार घरोबा असे. ४ अण्णासाहेब

विष्णुपंत कि०. यादवराव साठे. अण्णासाहेब किर्लोस्कर. गणपतराव किर्लोस्कर. बापूसाहेब किर्लोस्कर



गडी. अण्णासाहेबांचें कुटुंब. × येसूअ. भाची. गणपतरावाची मातोश्री. बापूसाहेबांचें कुटुंब. आश्रित.

विष्णुपंताचें कु०. बापूसा० मु०. गणपतरावाचे द्वि० कु०.

C.S.P.

५ **गणपतराव.** ६ **बापूसाहेब.** ७ घरचा आश्रित. ओळ दुसरी ८ **अण्णासाहेबांचें** कुटुंब. ९ ( × ). १० **बापूसाहेब, गणपतराव** व **विष्णुपंत** यांची मातोश्री. ११ **बापूसाहेबांचें** कुटुंब. ओळ तिसरी १२ **विष्णुपंतांचें** कुटुंब. १३**बापूसाहेबांचा** मुलगा **कृष्णा**, शाकुंतलांत सर्वदमन झालेला. १४ **गणपतराव** ह्यांचें द्वितीय कुटुंब, ह्या एक मुलगा होऊन वारल्या. दुसऱ्या ओळींत जी लहान मुलगी आहे ती **अण्णासाहेबांच्या** बहिणीची मुलगी येसू आहे.

---

## मतें व स्वभाव.

थोर पुरुषांच्या चारित्राला त्यांचे लेख, ग्रंथ, त्यांच्यासंबंधाच्या आख्यायिका व प्रत्यक्ष माहिती हीं आधारभूत असतात. या सर्वांची एकवाक्यता करून मग त्यांच्या स्वभावाविषयीं किंवा मतांविषयीं निश्चित सिद्धांत काढलेले बरे असतात. पुष्कळ ग्रंथकार कवींच्या व मोठमोठ्या लोकांच्या ग्रंथांवरून व लेखांवरून त्यांच्या स्वभावाची परीक्षा करण्याचा प्रयत्न करीत असतात. **शेक्सपीयरच्या** संबंधानें त्याच्या चरित्रकारांनीं व टीकाकारांनीं त्याच्या प्रत्येक ग्रंथावरून त्याचा स्वभाव व ज्ञान हीं निश्चित केलीं आहेत. महाकवीच्या ठिकाणीं असामामान्य बुद्धि व कल्पनाशक्ति वसत असते ही गोष्ट खरी आहे, परंतु तेवढ्यावरून त्यावर सर्वज्ञत्व स्थापित करणें केव्हां केव्हां हास्यास्पद होत असतें.* यासंबंधानें एका ग्रंथकाराचें मत मनन करण्यासारखें आहे. तो म्हणतो:

---

* इंग्रजी ग्रंथकारांच्या शोधकबुद्धीची कमाल आहे. त्यांनीं शेक्सपीयरला सर्व कांहीं विद्या अवगत होत्या याबद्दल कशीं प्रमाणें दिलीं आहेत हें पुढील उताऱ्यावरून समजेल:

" In truth Shakspeare's practical knowledge was very extensive for those times, as Drake has proved with certainty. He shows that Shakspeare had read a great

(टीप पुढें चालू).

"There is venerable prejudice which clings to the idea that poetic genius is something entirely unaccountable and wayward subject to no law or rule. To search for its secret is merely to profane a mystery, and of Shakespeare, as the supreme poet of all time, this, it may be said holds especially true; he is a stupendous phenomenon, to be accepted with awe and thanksgiving. His plays should be read in and every order, each for its own inherent beauty, and all attempts to arrange them in groups, and thence to infer the development of their author's mind, are an offence against true aesthetic principles."

Shakespeare and his predecessors.

अण्णासाहेबांच्या मतांसंबंधानें किंवा स्वभावासंबंधानें कल्पना करण्यास त्यांच्या ग्रंथाची अवश्यकता नाहीं. त्यांचा ज्यांच्याशीं निकटसंबंध होता अशीं माणसें प्रस्तुत हयात आहेत. त्यांच्या अनुभवांतीं जी त्यांची कल्पना झाली असेल तीच प्रमाणसिद्ध समजली पाहिजे. ते फार मार्मिक असत. त्यांच्या कवितेंत जसा प्रसाद आहे,

---

मागील पृष्ठावरून.

deal of the Italian and French literature of the day, that he was very well acquainted with the best known Latin and Greek authors, and that, in all probability, he had also studied critical works such as Wilson's 'Rhetoric' and others. He likewise shows that Shakspeare was equally wellread in the chronicles and histories of England as well as in those of classical antiquity, and as intimately acquainted with Pliny's 'Natural History,' as with Batman's 'Gothic Pliny,' which is an imitation of the former. Lastly, he points out how well versed Shakspeare was in the overflowing abundance of songs, romances, ballads, and stories which had been introduced

( टीप पुढें चालू ).

तसा त्यांच्या वाणींतही प्रसाद असे, असे ते बोलत असलेल्या गोष्टी आज अनुभवास येत असलेल्या पाहून ह्मणावेंसें वाटतें. नाटकाचे ते पूर्ण अभिमानी होते. नाटकासंबंधानें कोणी वाईट उद्गार काढलेले त्यांना खपत नसत; व नाटकास ऊर्जितावस्था यावी ही त्यांची मनापासून इच्छा होती. या सर्व गोष्टी खऱ्या होत्या; परंतु स्वतः त्यांचें मत नाटकाच्या धंद्याबद्दल फार वाईट होत चाललें होतें. त्यांनीं नाट्यकलेला राजविलासी स्वरूप आणलें होतें. पूर्वीं हा धंदा

---

मागील पृष्ठावरून.

into England by translations, from all the different European countries, and were current among the people. He was equally familiar with the language and subjects of the Old and New Testaments, as has been recently pointed out, for almost every page of his writings contains expressions, similes, comparisons, etc. from the Scriptures. But it was not merely from books that Shakepeare drew his knowledge of nature, of life, and of history. He was not what every great poet is, a keen, attentive observer of nature, but, in his works there occur so many technical expressions belonging to the different trades of common workmen, as well as of those appertaining to the business of educated men—more especially such an intimate acquaintance with jurisprudence and the forms of its practical application—that they have furished English critics with material enough to establish more definitely those traditions which aver that Shakspears lent his father a helping hand in his wool-trade, in glove-making and, in the slaughtering of calves, and that Malone came to the conclusion that Shakspeare in his youth, must have worked for sometime in an attorney's office. Other, owing to his singular acquaintance with the state of the

( टीप पुढें चालू ).

करणाऱ्याला किंचितूही मान नसे; परंतु **अण्णासाहेबांच्या** योगानें तें मन्वंतर बदलत चाललें होतें. इतक्या स्थितीला त्यांनी हा धंदा आणला असून मंडळीचें स्वैर वर्तन, जुन्या नाटकमंडळ्यांतून ज्याप्रकारचें असे, तसें नव्या संगीत मंडळ्यांतूनही असल्याचें पाहून त्यांचे उद्गार निघत असत कीं, "मीं हें केशराचें शेत लावून ठेवलें आहे व त्यांत गाढवें चरत आहेत." आणखी एका प्रसंगानें नाटकाविषयीं त्यांचे उद्गार बाहेर पडले आहेत. एका मुलाला नाटकांत येण्याची इच्छा झाली होती. तो उद्देश त्यानें श्लोकाच्या तीन चरणांत व्यक्त करून **अण्णासाहेबां**कडे पाठविला व त्याचें उत्तर चौथ्या चरणांत मागितलें. तो श्लोक हा:*

---

मागील पृष्ठावरून.

madical profession in his day, have conjectured that if he did not himself study medicine, he, at all events, must have been on intimate terms with doctors and apothecaries. But he seems likewise not to have been unacquainted with philosophical questions and enquiries; for their was recently discovered in the British Museum a copy of J. Florio's translation of Montaigne's *Essais*, published in the year 1603, which bears Shakspeare's name in his own handwriting together with the date 1603. Moreover a passage in "The Tempest' ( II. i. ) which is taken almost word for word out of the thirtieth chapter of the first book the *Essais*, proves that Shakspeare not only procured the work of this most ingenious French philosopher of the sixteenth century, but that he had himself studied it."

Shakspeare's Dramatic Art.

* या श्लोकाचा दुसरा चरण ज्यांनीं हा श्लोक पाठविला त्यांसही आतां आठवत नाहीं. हे गृहस्थ पुणें येथें हल्लीं एका मोठ्या दुकानाचे व्यवस्थापक असून शिवाय मोठाले ग्रंथ प्रसिद्ध करीत असतात.

विज्ञप्ति करितों तुह्मांस करुणा आणा दयासागरा.

.... .... .... .... ....

मजला घेउनि नाटकांत पिवळा फणसांत जैसा गरा.

सदरहू तीन चरणांला अण्णासाहेबांनीं पुढील उत्तर देऊन श्लोक पूर्ण करून पाठविला:

"वाटे गोड तुह्मांस नाटक परी ह्मणवी वरें तें गरा."[1]

नाटकाच्या धंद्यांत कीर्ति व द्रव्य मिळवून ज्यांच्या मनांत त्याविषयीं अप्रीति उत्पन्न झाली अशीं आणखीही उदाहरणें सांपडतात. शेक्सपीयर-लाही नाटकाचा तिटकारा आला होता असें त्याच्या चरित्रकारांनीं त्याच्या एका पद्यावरून अनुमान काढलें आहे. तें पद्य हें:

" O, for my sake do you with Fortune chide,
The guilty goddess of my harmful deeds,
That did not better for my life provide,
Than public means, which public manners breeds.
Thence comes it that my name receives a brand.
And almost thence my nature is subdued
To what it works in, like the dyer's hand:
Pity me then, and wish I were renew'd;
Whilst, like a willing patient, I will drink
Potions of eysell, 'gainst my strong infection:
No bitterness that I will bitter think,
Nor double penance, to correct correction.
Pity me then, dear friend, and I assure ye,
Even that your pity is enough cure me."

इंग्लंडांतील या शतकांतील प्रसिद्ध नट सर हेनरी आयर्व्हिंग लहानपणीं नाटकांत जाण्याकरितां फेल्प्स नांवाच्या नाटककाराकडे एकाची शिफारस घेऊन आला. हा फेल्प्स आपल्या धंद्यांत प्रसिद्ध

---

१ या चरणांत गणाच्या संबंधानें दोष आहे तो कसा राहिला हें समजत नाहीं.

होता. त्यानें आयर्व्हींगला आपल्याकडे ठेवून घेण्याचें कबूल केलें. परंतु त्याबरोबरच हेंही त्यांनीं सांगून टाकलें कीं, "बाबारे, नाटकाच्या नादीं लागूं नकोस. हा धंदा वाईट आहे." (young man, have nothing to do with the stage; it is a bad profession.)

अण्णासाहेबांना हा धंदा ऊर्जितावस्थेंत आणण्याला फारच त्रास पडला होता. त्यामुळें कित्येक वेळां त्यांचा मनोभंग झाला आहे. नाटकांत स्वार्थबुद्धीचा, प्रसंगाला अडवून धरणारा, मत्सरी, व्यसनी, दुर्गुणी असा एकादा जरी मनुष्य असला तरी तो सर्वांचीं मनें बिघडवितो; व अशीं माणसें बहुधा प्रत्येक नाटकमंडळींतून आढळून येतात. अण्णासाहेबांना नाटकाचा धंदा ऊर्जितावस्थेला आणण्याच्या कामांत स्वतःला जो त्रास पोंचला होता व इतर नाटकमंडळीची जी स्थिति त्यांनीं पाहिली होती त्यांचे परिणाम हे वरील उद्गार आहेत.

धर्मसंबंधीं अण्णासाहेब पाखंडी मताचे नव्हते व मोठे कर्मठही नव्हते. त्यांची देवावर श्रद्धा होती हें त्यांच्या निरनिराळ्या पदांवरून दिसून आलेलें आहेच. शिवाय रामचंद्रबोवा तिकोटेकर ह्मणून एक वेदांतमार्गी असत. त्यांचा गुरूपदेश त्यांनीं घेतला होता. मोरोबानींही त्यांचाच उपदेश घेऊन अण्णासाहेबांशीं गुरुबंधूचें नातें जोडलें आहे. बाबासाहेब गर्दे व मंडळींतील कृष्णाप्पा हेही तिकोटेकर बुवांचे अनुयायी आहेत.

गांवठी साहेब हे मिशनरी लोकांशीं नेहमीं वाद करीत असत हें पूर्वीं सांगितलें आहेच. पुण्यांत असतांना अण्णासाहेबांच्या मनांत आपणही एकवेळ त्यांच्याशीं वादविवाद करावा असें आलें व त्यांनीं गांवठी साहेबांच्या मार्फत दोन गौरकाय धर्मोपदेशकांस आपल्या बिऱ्हाडीं बोलावलें. सुमारें तासभर या दोघांचा वाद चालला होता. परंतु शेवटीं अण्णासाहेबांची खात्री होऊन ते म्हणाले कीं: "हे लोक वितंडवादी आहेत. एखादा मुद्दा अंगावर येण्यासारखा दिसला कीं, विषय बदलून तो मुद्दा बाजूला सारतात. परंतु अंगावर बाजू ह्मणून येऊं देत नाहींत."

**अण्णासाहेबांस** सर्व खेळ येत होते. बुद्धिबळें खेळण्यांत हे पटाईत असत. त्यांस पोहतां येत होतें. ल्हानपणीं **गुलीसुरास** ऐन पुरांत पोहण्यास गेले होते. शेवटीं मध्येंच दमून बुडण्याच्या बेतांत आले. इतक्यांत त्यांचे स्नेही **बाळकृष्णपंत तांबे** यांनीं त्यांस काढलें. पत्ते खेळण्याचा त्यांस फार नाद होता. एकदां मंडळी खेळण्यास बसली ह्मणजे जेवणाखाण्याचें सुद्धां भान रहात नसे. गप्पा गोष्टी सांगण्याची त्यांना फार हौस असे. त्यांच्याजवळ पुष्कळ ऐतिहासिक गोष्टींचा सांठा होता. तालीम आटपून मंडळी घरोघर गेली कीं, **गोपाळराव दाते, मोरोबा** व........यांच्याबरोबर रात्रीं कोठें जुन्या पुराणिकी नाटकाच्या, कोठें तरुणपणीं त्यांच्या हातून कांहीं प्रमाद घडले होते त्यांच्या, कोठें **रेनाल्ड**च्या कादंबऱ्यांतल्या अशा गोष्टी रात्रीं एकेक दोन दोन वाजेपर्यंत चालावयाच्या. त्यांच्या तोंडांत स्पष्टोक्ति फार असे. याची कल्पना त्यांच्या शिमग्याच्या कवितेवरून होईलच. मराठी भाषेंत अश्लील शब्द व त्यांच्यापासून झालेल्या ह्मणीची समृद्धि आहे. एखाद्या फटकळ मनुष्याला आपलें भाषाज्ञान दाखविण्याला ते शब्द व ह्मणी दिवसांतून दहा पांच वेळां तरी उपयोगीं पडतात. चांगल्या पोक्त व प्रतिष्ठित माणसाच्या तोंडांत सुद्धां असली भाषा सहज बसलेली पाहण्यांत येते. "गाढव" "पाजी" "मूर्ख" हे शब्द इतके प्रचारांतले झालेले आहेत कीं, त्यांचा खरा अर्थ नाहींसा झाला आहे. ह्मणून ते बोलणाराला व ऐकणाराला त्याचें कांहीं वाटत नाहीं. **अण्णासाहेबां**चा व कोणाचा एखाद्या विषयावर वादविवाद चालत असला व आपल्या इतर मुद्यांनीं प्रतिपक्षी कुंठित होत नाहीं असें त्यांना दिसलें ह्मणजे ते बहुतकरून वरील प्रकारच्या शब्दांच्या भात्यांतून एखादा बाण सोडीत असत. **गोविंदराव देवलां**चे व यांचे जेव्हां जेव्हां नाटकविषयावर वाद चालत तेव्हां याच मुद्यावर शेवटीं **देवलां**ना गप्प बसावें लागे.

नाटकाच्या टीकाकाराविषयीं यांची पूज्यबुद्धि नसे. हें "नागपूर समाचारा" च्या टिकेस जें त्यांनीं उत्तर दिलें, त्यावरून समजण्यासारखें आहे. "आमच्या डोक्याला किती श्रम पडले आहेत याची कल्पना या....ना काय?" असें ह्मणून ते टीकाकारांच्या टीकेकडे दुर्लक्ष करीत असत.

सोंग करीत असतांना त्यांना आंतून प्राम्टरनें सुचविलेलें आवडत नसे. एकदां संगीत सौभद्र खेळ चालला असतां बलरामाच्या कामाच्या वेळीं **बाळ घोरपडे** आंतून त्यांना “ प्राम्ट ” करीत होता. ( सुचवीत होता ) प्रवेश संपून आंत आल्याबरोबर “ तुला प्राम्ट करायला कोणीं सांगितलें, मी का तेथें गवत कापायला बसलों होतों कां ? ” ह्मणून त्याला रागें भरले.

**अण्णां**चा स्वभाव फार थट्टेखोर असे. कधीं कधीं ती थट्टा अस्थानीं होई. त्यांची पत्नी शरीरानें उंच आहे. एकदां त्यांना आणलेलें लुगडें कांहींसें अरुंद होतें. तें पाहून ते ह्मणाले “ हें लुगडें तर आमच्या बायकोला अगदीं अंडपंचासारखें होईल. ”

संगीत शाकुंतलाच्या तालमी चालल्या होत्या, परंतु नकला कोणाच्या पाठ नव्हत्या. त्याबद्दल **अण्णासाहेब** एकदां रागावले. त्याबरोबर ज्यांच्याकडे विदूषकाचें काम होतें ते **फौजदार** ह्मणालेः “ या **बभ्रुवाहना**ची नक्कल तयार आहे. आत्तां ह्मणून घ्या. ” या गोष्टीला कांहीं दिवस गेले. पुढें ज्या दिवशीं **डेक्कन कालेजमध्यें** शाकुंतलचे सहा अंकांची तालीम झाली, त्या दिवशीं सहाव्या अंकांतला दुष्यंत व विदूषक यांचा प्रवेश चालला होता. **अण्णासाहेब**ही जवळच पडद्यामागें बसले होते. इतक्यांत **फौजदार** आपल्या विदूषकाचे सोंगांत भलत्या ठिकाणीं भलताच शब्द बोलले; व त्या प्रवेशांतला पुढचा संदर्भ बिघडवून टाकला. त्याबरोबर **अण्णासाहेब** तेथूनच मोठ्यानें ह्मणालेः “ भले **बभ्रुवाहन** ! ” आंत येतांच चोहोंकडे सारखा हंशा पिकला.

नाटकपात्रें ह्मणजे लहान लहान मुलांच्या करमणुकीकरतां जशीं बाहुलीं तशीं मोठ्या लोकांच्या करमणुकीचीं चालतीं बोलतीं बाहुलीं आहेत; तीं आपल्या घरीं गारोडी, तमासगीर यांच्याप्रमाणें चालत आलीं पाहिजेत व आपल्यास मोफत मिळालीं पाहिजेत अशा समजुतीचे बरेच अधिकारी व लोकही प्रत्येक नाटकमंडळीस कोठेंनाकोठें आढळतात. अशा लोकांची खुशामत करण्याकरितां त्यांच्या तेथें त्यांनी कधीं पाऊलही घातलें नाहीं. परंतु निगर्वी व सरळ स्वभावाचा गृहस्थ भेटला कीं, त्याच्या घरीं पडून राहत. त्यांची आकृति जशी गं-

भीर तसा त्यांचा स्वभाव असे. निरनिराळ्या मंडळीशीं त्यांचा प्रसंग असे. परंतु ते आपली गंभीर वृत्ति कधीं बिघडूं देत नसत. त्यांचा लौकिक चोहोंकडे गाजत होता याबद्दल किंवा मी नाटकाचा कर्ता, मी नाटकाचा मालक ही अहंमन्यता त्यांच्या स्वभावाला शिवली नाहीं. एक दिवस कोणीसें रुप्याचें ताट पंक्तींत मांडलें होतें, त्याबरोबर "मीच कोण एकटा रुप्याच्या ताटांत जेवणारा" असें ह्मणून त्यांनीं तें फेकून दिलें. त्यावेळीं प्रत्येकाला एकेक रुप्याचें ताट मांडलें असतें तरी करतां आलें असतें अशी स्थिति होती; परंतु "प्रत्येकाच्या मागें एकेक ब्राह्मण अशी स्थिति येईल तर रुप्याच्या ताटांत जेवण्याचें महत्त्व," असें ते ह्मणत. तशी स्थिति येणें अशक्य नव्हतें. संगीत नाटक काढण्याची कल्पना त्यांच्या मनांत प्रथम आली तेव्हां ते अगदीं खात्रीनें भविष्य केल्यासारखें असें ह्मणाले होते कीं, "एकट्या शाकुंतलावर लाख रुपये मिळवीन." ऐकणाराला त्या वेळेला या नुसत्या वल्गना किंवा लोक ज्याप्रमाणें मनोराज्य करतात त्याप्रमाणें मनोराज्य वाटलें असेल. परंतु हें त्यांचें भविष्य त्यांच्या हयातींतच जवळ जवळ खरें होत आलें होतें. व त्यांच्या पश्चात् सुद्धां कांहीं वर्षे शाकुंतल नाटक म्हटलें कीं, त्यावर लोकांच्या उड्या पडत असत. या एका गोष्टीवरूनच ही गोष्ट शक्य होती हें कळून येईल. मंडळींत **मोरोबांचा** स्वभाव जरा उतावळा असे—उतावळा ह्मणजे लवकर राग येणारा—एरव्हीं ते फार धिम्या स्वभावाचे आहेत. त्यांच्या प्रकृतीला **अण्णासाहेब** सुद्धां भिऊन वागत. **भाऊराव** त्यावेळीं अगदींच तरुण होते, चोहोंकडे "भाऊराव" ह्मणून गाजत असत; तेव्हां त्यांच्या वागणुकींत आरंभीं जरा थिल्लरपणा होता. परंतु **अण्णासाहेब** सर्वांच्या प्रकृतीच्या तऱ्हा ओळखून व कारणावर नजर देऊन चालत. सर्वांचे स्वभाव त्यांच्या नजरेंत असत, परंतु ते आपल्या वृत्तींत फरक होऊं देत नसत. याप्रमाणें **अण्णासाहेबांच्या** स्वभावाचें चित्र आहे. मोठ्या लोकांच्या स्वभावांत कांहीं प्रकारचा तऱ्हेवाईकपणा असतो व तो त्यांच्या गुणाला शोभा देत असतो. त्याच्यापासून मोठासा बोध घ्यायचा असतो असें नाहीं. परंतु त्यायोगानें चरित्रविषय मनोरंजक वाटतो.

१८८९ सालीं मराठी ग्रंथकारांची सभा भरविण्याचा बूट **पुणें**

शहरांत निघाला होता. त्याप्रमाणें एकच सभा झाली. तिच्या संबंधानें **अण्णासाहेबांचा** अभिप्राय विचारण्यांत आला होता. तो अभिप्राय एकंदर पत्रव्यवहारासुद्धां पुढें दिला आहेः

" रा० रा० **अण्णासाहेब किर्लोस्कर** यांसः

वि. वि. सोबतचें विनंतिपत्र आपणाकडे पाठविलें आहे, त्याची प्रसिद्धि आपण करून सवड झाल्यास ता. २४ मे रोजीं सभेस स्वतः येण्याचें करावें, किंवा निदान आपला अभिप्राय इकडे कळवून आपण केलेल्या पुस्तकाची एक अगर अधिक प्रत त्यांत लिहिल्याप्रमाणें लायब्ररीचे चिटणीस यांजकडे पाठवावी.

पुणें, ता. १२ माहे मे सन १८८५ } **महादेव गोविंद रानडे.**

' विनंति पत्र.

मराठी भाषेतील ग्रंथकार यांस विनंति करण्यांत येते कीं, मराठी भाषेंत ज्यांनीं ज्यांनीं आजपावेतों नवीन ग्रंथ अगर इतर भाषांतून भाषांतरें केलीं असतील अशा सर्व लोकांची, परस्पर एकमेकांची ओळख व्हावी व भाषेची स्थिति ग्रंथांच्यासंबंधानें हल्लीं कशी आहे व ती कोणत्या उपायानें सुधरतां येईल याविषयीं चर्चा व्हावी, व नवीन ग्रंथ करण्याच्या कामीं ज्या अडचणी येतात त्या दूर व्हाव्या या हेतूनें चालू वसंतोत्सवांत एक दिवस नेमून त्या दिवशीं ज्या लोकांस येण्यास सवड होईल त्या सर्व ग्रंथकर्त्यांनीं एकत्र जमावें असा कित्येक मंडळीचा उद्देश आहे. चालू महिन्यांत अशी मंडळी जमेल त्या दिवशीं गेल्या २० वर्षांत मराठी भाषेंत जे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत त्यांचा साधारण इतिहास देऊन त्यांतील गुणदोष थोडक्यांत सांगून कोणत्या विषयावर ग्रंथाची न्यूनता आहे व ती दूर कशी होईल याविषयीं निबंध वाचला जाईल व त्यानंतर या

बाबतींत थोडी चर्चाही होईल. पुढें दरवर्षीं याचप्रमाणें क्रम चालू राहून प्रत्येक वर्षास जे नवीन ग्रंथ प्रसिद्ध झाले असतील त्या ग्रंथकर्त्यांचा सन्मान करून त्यांच्या ग्रंथांची प्रसिद्धि ज्या रीतीनें होईल तशी केली जाईल. पूर्वीं सूचना करण्यास सवड न झाल्यामुळें या वर्षीं सर्वांस आमंत्रण वेळेस पोहोंचणार नाहीं, तथापि या उद्योगास आरंभ या वर्षीं करावा असा पुष्कळांचा विचार ठरल्यावरून ही जाहिरात प्रसिद्ध केली आहे. सर्व वर्तमानपत्रकर्त्यांनीं कृपा करून ही जाहिरात आपले पत्रीं प्रसिद्ध करावी व ज्या ग्रंथकारांच्या हातांत ही जाहिरात पडेल त्यांनीं आपण केलेल्या पुस्तकांची एक एक प्रत येथील नेटिव जनरल लायब्ररीचे चिटणीस यांचे पत्यावर पाठवून द्यावी. सवड झाल्यास स्वतः यावें. सवड न झाल्यास वर लिहिल्याप्रमाणें पुस्तकें पाठवून सूचना करणें असतील त्या पत्रद्वारें नेटिव जनरल लायब्ररीचे चिटणिसाचे पत्यावर पाठवाव्या. असा ग्रंथसंग्रह एक ठिकाणीं झाल्यानें ग्रंथकर्त्यांस व इतर सर्व लोकांस मोठा उपयोग होणार आहे. सर्वांच्या सोयीस पडावें म्हणून तारीख २४ मे १८८९ इसवी रोजीं मराठी ग्रंथकारांची सभा जोशी हालांत सार्वजनिक सभेच्या कचेरींत भरेल. तेथें सर्वांनीं येण्याची मेहरबानी करावी.

नीलकंठ जनार्दन कीर्तने.
काशिनाथ बाळकृष्ण मराठे.
महादेव गोविंद रानडे.
नारायण दामोदर योगी.
महादेव मोरेश्वर कुंटे.
गोपाळ गणेश आगरकर.
हरी कृष्ण दामले.
वेंकटराव रामचंद्र वकील.'

" नागपूर ता. १८ मे १८८९.

रा० रा० नेटिव्ह जनरल लायब्ररीचे सेक्रेटरी
मुक्काम पुणें यांस

बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णा किर्लोस्कर यांची विनंति अशी आहे कीं,—

"मराठी ग्रंथकारांची सभा" वसंतोत्सवांत एक दिवस भरावी, व त्यांत भाषेच्यासंबंधानें पूर्णत्व येण्यास कशा प्रकारचे ग्रंथ असावेत, याविषयीं चर्चा व्हाव्या, इत्यादि कृत्य फार स्तुत्य आहे. अशाच प्रकारचे माझ्या मनांतही कित्येक दिवस तर्क येत असून हल्लीं त्याच कामीं पत्राखालीं सह्या असलेल्या मोठमोठ्या विद्वानांनीं कमरा बांधल्या, हें पाहून अत्यानंदच झाला आहे. नवीन झालेले मराठी ग्रंथ, जरी मीं बहुतेक वाचिले नाहींत, तरी जे थोडेसे पाहण्यांत आले, ते हल्लींच्या कामीं सभेला जें पाहिजे आहे, तें मिळवण्याच्या बुद्धीनें त्या त्या प्रसंगीं वाचले नसल्यामुळें, त्या बाबतींत अभिप्राय कांहींच देववत नाहीं. ही सभा पुढील वर्षपर्यंत आयुष्मती राहिल्यास इथून जो नवीन ग्रंथ वाचण्यांत येईल तो तशा दृष्टीनें वाचून मिळालेली माहिती सभेच्या पसंतीकरितां पाठवीन.

परस्पर ग्रंथकारांची ओळख व योग्यता तत्कृत काव्यावरून त्यांचे स्वभाव व इतर धर्म कसे असतील यांसह बारीक दृष्टीनें पाहणारांच्या जरी स्पष्ट अनुभवास येईल, तरी त्यांची ती प्रत्यक्ष मूर्ति एकमेकांस एककालीं व एकप्रदेशीं पाहण्यास मिळावी, हें तर मोठें आनंददायकच आहे. यावरूनही या सभेचा उद्देश फार उत्तम आहे हें सिद्ध होतेंच.

" मराठी ग्रंथकारांची सभा " या प्रदेशांत पाऊल टाकण्यास, माझ्या योग्यतेवरून मला कांहीं धैर्य आहे असें वाटत नाहीं; तथापि विनंतिपत्राखालीं सह्या केलेल्या सारख्या उत्तम विद्वान पारख्यांनीं मला निवडून निमंत्रण दिलें, त्यावरून मीही

एक ग्रंथकारच आहें असें वाटूं लागलें आहे; पण तें वाटणें कितपत खरें असेल तें असो. अशा सभेस समक्ष हजर असावें, त्यांतून तिच्या उत्पत्तिकालीं तरी असावेंच अशी उत्कंठा झाली आहे; परंतु शिरावर घेतलेल्या जोखमीच्या कर्तव्यकर्मानें फार दूर ओढून नेल्यामुळें समयास सेवा करण्यास सादर होईन, अशी आशा नाहीं.

आपापले केलेल्या ग्रंथाची एकेक प्रत या सभेच्या उपयोगाकडे पाठवावी, अशी सूचना झाली, त्यास मीं अलीकडे केलेल्या दोन्हीही ग्रंथांचे मालक विनंतिपत्राखालीं सही करणारांपैकींच एक असल्यानें, तेच सदरहू मत्कृत पुस्तकांच्या प्रती माझ्याबद्दल सभेच्या कामीं अर्पण करतील अशी आशा करितों. परभारें या पत्रासोबत प्रती पाठवाव्या; परंतु मजजवळ औषधाकरितां देखील शिल्लक नाहींत.

आतां ग्रंथकार एकत्र जमून चर्चा होईल असें विनंतिपत्रांत दिसल्यावरून तत्संबंधानें माझ्या कांहीं सूचना आहेत त्या केल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. पुण्यासारख्या सरस्वतिनिवासस्थानीं अशा प्रकारची सभा उत्पन्न होऊन कांहीं अप्रयोजक कारणामुळें लयास गेलीं असा अपवाद जडलेल्या आरंभशूरत्वापवादाला जोर आणील. याकरितां या कामीं सध्यां जीं विघ्नें येतील असें वाटतें तीं न येण्याकरितां अगोदरच सावधगिरी ठेवितां येईल. यास्तव त्या विघ्नांचीं स्वरूपें, जशीं माझ्या नजरेस आलीं तशीं दाखवितों.

या सभेचें आमंत्रण, मठांतील प्रसादाच्या आमंत्रणाप्रमाणें सर्व मराठी ग्रंथकारांस असल्यानें ज्यानें म्हणून थोडें कांहीं रचिलें आहे, तोही ग्रंथकार होऊन सभेस वेळाशक येऊन बसेल. बसला ह्मणून चिंता नाहीं. ग्रंथासंबंधीं चर्चा होतांना त्याच्याच ग्रंथावर धाड आली ह्मणजे त्याचें पित्त खवळून प्रसंगीं दंडादंडीवरही येईल. कारण जे विद्वत्तेच्या शिखरावर जाऊन पोंचले त्यांच्या हातून देखील असे प्रमाद झाल्याचे लेख वर्तमानपत्रांतून ढळढळीत वाचण्यास मिळतात, मग हा तर ‘ रेम्या डोक्या ’

ग्रंथकार, त्याचें काय विचारावें? यास्तव असे अनर्थ न हो-ण्याबद्दल काय सावधगिरी ठेविली आहे याचा विचार झाला नसल्यास व्हावा. पोक्त, विचारी सभासद असल्यामुळें अशी भीति बाळगण्याचें मला कांहीं कारण नाहीं. तथापि वाटलें तें सुचविलें आहे. मला वाटतें "ग्रंथकार" या शब्दाचा अर्थ कुठपर्यंत घ्यावा, याची सीमा ठरविली ह्मणजे बरें.

सदरहू माझा अभिप्राय मला खुद्द येण्यास अडचण असल्यामुळें लेखनद्वारा पाठविला आहे. जितका आवडेल तितका स्वीकार व्हावा. लोभ करावा हे विनंति. *

आपला,

**बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णा किर्लोस्कर**

शांकरदिग्जय, संगीत शाकुंतल व संगीत सौभद्र नाटकाचे कर्ते."

---

## स्वारीची अखेर.

**आकोल्याहून** मंडळी १८८९ जुलई महिन्यांत **पुण्यास** आली. येथें सात खेळ झाल्यावर **मुंबईस** गेली, व तेथें नऊ खेळ करून पुन्हां विश्रांति घेण्याकरितां **पुण्यांत** आली व पुन्हां चार खेळ केले. **मुंबई** व **पुण्यास** यापूर्वीं चार वर्षांत मंडळीच्या सात आठ खेपा झाल्या होत्या. त्या प्रत्येक खेपेस हींच पात्रें व हेच प्रयोग होते; व प्रत्येक खेपेस नाटकगृहांत प्रेक्षकांचीही गर्दी होत असे. या खेपेस **अण्णासाहेबांज**-वळ कांहीं नवीन पात्रें किंवा नवीन नाटकप्रयोग होते असा प्रकार न-व्हता; परंतु दैवयोगानें या खेपेसही पैसे अतोनात मिळाले. पुढें **पुणें**, **मुंबई** व पुन्हां **पुणें** येथें जे जे प्रयोग झाले, व जी प्राप्ति झाली त्याचा तपशील दिला आहे. त्यावरून **किर्लोस्करांच्या** नाटकप्रयोगास जी प्राप्ति होत असे तिची कल्पना होईल.

---

* या सभेचें आयुष्य एक वर्षच होतें.

पुणें, जुलै ता. ११ पासून ८ आगष्टपर्यंत.

| खेळाचें नांव. | उत्पन्न. रु० आ० |
|---|---|
| सौभद्र .... .... .... .... | ७१५–१२ |
| शाकुंतल .... .... .... .... | ५९७–१२ |
| शाकुंतल .... .... .... .... | ५२६– ३ |
| सौभद्र .... .... .... .... | ७३८– ६ |
| रामराज्यवियोग .... .... .... | ६४९–१० |
| सौभद्र .... .... .... .... | ६९२– १ |
| शाकुंतल .... .... .... .... | ७५५– १ |

मुंबई, ता. १३ आगष्टपासून ११ सप्टंबरपर्यंत.

| | |
|---|---|
| सौभद्र .... .... .... .... | ६२८– ८ |
| सौभद्र .... .... .... .... | ८००– ७–६ |
| रामराज्यवियोग .... .... .... | ३३५–१२ |
| शाकुंतल .... .... .... .... | १२९– १ |
| शाकुंतल .... .... .... .... | २०४– ० |
| सौभद्र .... .... .... .... | ५३९– १ |
| सौभद्र .... .... .... .... | ७२१– ० |
| सौभद्र .... .... .... .... | ५८३– ० |
| शाकुंतल .... .... .... .... | १०३१– ० |

पुणें, ता. २६ सप्टंबरपासून ७ आक्टोबरपर्यंत.

| | |
|---|---|
| शाकुंतल .... .... .... .... | ८६२– १ |
| सौभद्र .... .... .... .... | ७६६– ८ |
| सौभद्र .... .... .... .... | ४९७– १ |
| रामराज्यवियोग .... .... .... | ३५७– १ |

दिवा जातेवेळीं मोठा होतो असें ह्मणतात. त्याप्रमाणें संगीतांतला दिवा या स्वारीअखेर मालवला जावयाचा होता, हें भाकीत लोकांस जणूं कळलें होतें. ह्मणून त्याचें शेवटचें दर्शन घेण्याकरितां लोकांच्या इतक्या उड्या पडत होत्या कीं काय कोण जाणे !

याच सुमारास, पुण्यास ज्याप्रमाणें "मराठी ग्रंथकारांच्या सभे" ची चळवळ निघाली होती, त्याप्रमाणें मुंबईस महाराष्ट्रांत त्या वेळीं जे जे पुरुष प्रसिद्धीस आले होते त्यांचीं चरित्रें प्रसिद्ध करण्याचा विचार निघाला होता. यासंबंधानें अण्णासाहेबांस पुढील पत्र व प्रसिद्धिपत्रक आलें होतें.—

राजमान्य राजश्री { अण्णासाहेब किर्लोस्कर, बळवंतराव नाटेकर व मोरोबा वाघोलीकर. } यांस—

विनंति विशेष:—"प्रस्तुतची ठळक ठळक मंडळी" हें पुस्तक तयार करण्याच्या हेतूनें काढलेलें "प्रॉस्पेक्टस" ह्मणजे सूचिपत्र या सोबत आपणाकडे पाठविलें आहे. तें आपल्या मित्रमंडळींत दाखवून ज्यांचीं नांवें सदरहू पुस्तकांत आलीं पाहिजेत असें आपणांस वाटत असेल त्यांस हकीकत लिहून तयार करण्यास व खालीं लिहिलेल्या पत्त्यावर पाठविण्यास आपण कृपा करून उत्तेजन द्यावें अशी आपणांस प्रार्थना आहे. लोभ असावा ही विनंति.

गिरगांव मुंबई,<br>आगस्ट १८८९. { आपला<br>जनार्दन दामोदर कोलटकर."

## "प्रस्तुतची ठळक ठळक मंडळी."

इंग्रजी भाषेंत "MEN OF THE TIMES" ह्मणजे प्रस्तुतची मंडळी ह्मणून एक पुस्तक आहे. त्या धरतीवर आपल्या मुंबई इलाख्यांतील बडोद्याकडील, वऱ्हाडांतील, नागपुराकडील व काशींतील ठळक ठळक महाराष्ट्रीय गृहस्थांच्या ऐहिक माहितीविषयीं एखादें पुस्तक असतें तर बरें होतें, असें पुष्कळांस वाटलें असेल. माझ्या मनांत असें आलें आहे कीं, असलें पुस्तक तयार करावें;

ह्मणजे जीं मानवरत्नें आपणांमध्यें निपजत आहेत, त्यांविषयीं कांहीं तरी विश्वसनीय लेख हवा तेव्हां पहाण्यास ठीक होईल. माझ्या एकट्याच्यानें अर्थात् हें काम होणार नाहीं. आपणांविषयीं कांहीं तरी लेख रहावा असें ज्या सभ्य गृहस्थांस वाटत असेल त्यांनीं तो लेख लिहून मजकडे पाठविल्यास तो जागच्या जागीं छापण्याविषयीं मी खबरदारी ठेवीन.

आपल्या देशांतील सर्व ठळक गृहस्थांविषयीं असा लेख असणें इष्ट खरें, पण अनेक कारणांस्तव तसा लेख तयार करणें सध्यां मला दुरापास्त आहे. फार तर काय पण आपल्या इलाख्यांतील सर्व प्रकारच्या गृहस्थांविषयीं तसा लेख तयार करूं ह्मटलें तरी कठीण होईल. ज्यांना विद्येच्या योगानें नांवलौकिक प्राप्त झाला आहे, अशांस तरी आपणांबद्दल इत्थंभूत माहिती देण्यास शंका वाटणार नाहीं, अशी उमेद आहे. ह्मणून तूर्त तशा सद्गृहस्थांबद्दल आणि जुनीं जीं सभ्य घराणीं या कृत्यास साहाय्य करण्यास राजी असतील त्यांबद्दल, हा लेख तयार करण्याचें योजिलें आहे. आरंभीं मराठी भाषा बोलणार गृहस्थांपुरताच हा लेख तयार झाला तरी बराच पल्ला झेंपला असें ह्मणतां येईल, व एकंदर कामाची अटकळ समजेल. खालीं नमूद केलेल्या वर्गांच्या गृहस्थांचीं नांवें ठळक असामींत मोडतातः—

( १ ) महाराजे, राजे, युवराज, राजपुत्र; ( २ ) संस्थानिक, जहागीरदार, इनामदार, सरदार, देशमुख, देशपांडे, ( ३ ) साहुकार, पेढीवाले, मुनीम, व्यापारी, ब्यांकेकडील असामीदार वगैरे. ( ४ ) सरकारी ग्याझेटेड आफिसर्स, जज्ज, कलेक्टर, असिस्टंट कलेक्टर, हायकोर्टाकडील रजिस्ट्रार, डेप्युटी व अ० रजिस्ट्रार, इंटरप्रिटर्स व ट्रान्सलेटर्स, बारिस्टर्स व आडव्होकेट्स, अटर्नीज, सालिसिटर्स, वकील; स्मालकाज कोर्टाचे जज्ज, ओरिएंटल ट्रान्सलेटर, पोलिटिकल आफिसर्स, डेप्युटी कलेक्टर्स, जस्टिसेस आफ दी पीस; एज्युकेशन खात्यांतील कालेजांचे प्रिन्सिपाल, व्हाईस प्रिन्सिपाल, प्रोफेसर्स, इन्स्पेक्टर्स, हेड मास्तर्स; सर्व ग्राज्युएट्स; रिपोर्टर ऑन धि नेटिव्ह प्रेस; एडिटर्स; पब्लि-

२७

क्वर्कस् खात्यांतील एक्झिक्यूटिव्ह व असिस्टंट इंजिनियर्स; सिव्हिल व असि. सर्जन्स; सब जज्ज, मुनसफ, मामलेदार, आनररी माजिस्ट्रेट्स, हेड आकौंटंट्स व प० व० आकौंटंट्स; सुपरिंटेंडेंट्स,–सेक्रेटरीएट, व्हाक्सिनेशन, पोस्ट आफिस, वगैरे. इन्स्पेक्टर्स, पोलिस, रेजिस्ट्रेशन, टेलिग्राफ; सर्व खात्यांतील डेप्युटी व असि०; सालिसिटरचे म्या० क्लार्कस्, हेड क्लार्कस्, चिटणीस; प० व० सब इंजिनियर्स, सुपरवायझर्स, ओव्हरसियर्स; ( ५ ) लोकनियुक्त म्युनिसिपल कमिशनर्स, डिस्ट्रिक्ट व तालुका बोर्डाचे मेंबर्स. ( ६ ) ज्यांस दरमहा सुमारें १०० रुपयांची प्राप्ति आहे असे सर्व सरकारी म्युनिसिपल, रेलवेकडील, व संस्थानांतील नोकर पेन्शनर्स. ( ७ ) नांवाजलेले शास्त्री, वैदिक, पुराणिक व हरिदास; ( ८ ) इतर प्रसिद्ध पुरुष. ”

या चरित्रमालिकेची व्यापकता फार मोठी होती असें दिसतें. ह्मणून कदाचित् ती छापखान्याचें द्वार पाहण्यापूर्वीच नाहींशी झाली. नाहींतर **अण्णासाहेबांचें** त्रोटक चरित्र यापूर्वींच प्रसिद्ध झालें असतें.

तारीख ७ आक्टोबर रोजीं **पुणें** येथें शेवटचा खेळ झाल्यावर मंडळीच्या वांटण्या झाल्या. खर्च वजा जातां सुमारें बारा महिन्यांत जो नफा झाला त्याची एकंदर वांटणी १३०८० रुपयांची झाली. **अण्णासाहेबांच्या** वांटणीस ३६७५ रुपये आले. **अण्णासाहेबानीं** हा धंदा काढल्यापासून व्यवस्थित व मोठी अशी हीच प्राप्ति त्यांस झाली.

---

## जन्मभूमीकडे प्रयाण.

**अण्णासाहेबांच्या** प्रकृतींत मधुमेहाच्या आजारासारखीं कांहीं चिन्हें असल्याचें कळून आलें. त्यामुळें त्यांच्या वृत्तींत अलीकडे विरक्तता आली होती. त्यांनीं अलीकडे दिवसाचें जेवण व मंडळींत पहिल्यासारखें बसणें उठणें सोडलें होतें. फक्त संध्याकाळीं जेवीत असत. व आपल्या खोलींत बसून असत. या वृत्तीमुळें रामराज्याचा शेवट करण्याचें राहिलें. या विरक्ततेचा परिणाम त्यांच्या मनावर झाला इतका कीं, त्यां-

चा स्वभाव जो रंगेल होता तो त्रासिक झाला. प्रयाण करतांना जनरूढीप्रमाणें वेळ अवेळ, शुभ अशुभ दिवस पहावयाचा तो सुद्धां त्यांनीं पाहिला नाहीं. शेवटचा खेळ झाल्यावर मंडळीस रजा देऊन कार्तिक पौर्णिमेला ह्मणजे ता. २२ नोव्हेंबरच्या सुमारास **पुण्यास** पुनः जमावयाचें ह्मणून ठरविलें. व आपण गांवीं जाण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें दुसरे दिवशींच प्रयाणास निघाले. त्या दिवशीं भाद्रपद वद्य अमावास्या होती. मंडळीनें आज निघूं नये ह्मणून आग्रह केला. पण तें न ऐकतांच निघाले. निघण्यापूर्वीं पुढील पत्र **दिवेकर** शास्त्री यांस गेलें:

"पुणें ता. ७।१०।८५.

रा. रा. दिवेकर शास्त्री यांस कृतानेक सा० नमस्कार वि. वि. आह्मीं ता. ८ आक्टोबर गुरुवारीं रात्रीं मेल मधून ८ वाजतां सौभाग्यवती वगैरे मंडळीसह निघून गुर्लसुरास जाणेंसाठीं धारवाडास जाणार आहोंत. तर आमची गाडी जेव्हां गदग स्टेशनवर येईल तेव्हां तुह्मीं तेथें अगत्य असावें. आह्मीं वाटेंत कोठेंही मुक्काम करणार नाहीं. गाड्या जसजशा निघतील तसतसे निघून जाऊं. बाकी सर्व मंडळी खुशाल आहे. अधिकोत्तर समक्ष विदित करूं. कळावें लोभ असावा ही विनंति.

**अण्णा किर्लोस्कर.**"

बरोबर **कृष्णाप्पा, बाळू घोरपडे, विसू न्हावी,** व **मोत्या** कुत्रा इतका परिवार होता. पहिला मुक्काम **हुबळीचा** झाला. **बाबासाहेब गर्दे**, या वेळीं तेथें होते. त्यांची पंचदशी यांनीं ऐकिली व यांचें रामराज्यवियोग त्यांनीं ऐकिलें. त्यांची प्रकृति बिघडली होती, ह्मणून संध्याकाळीं जेवणाचीं नक्तें धरलीं होतीं तीं **बाबांनीं** सोडवून **अण्णासाहेबांच्या** कुटुंबास करण्यास सांगितलीं. दुसरे दिवशीं मंडळी

---

* सदाशिव विष्णु दिवेकर हेही चरित्रांतलें एक पात्र आहेत. **अण्णासाहेबांचें** शंकराचें चित्र आहे त्यांत त्यांच्या डाव्या हाताला जे आगडबंब पुरुष उभे आहेत तेच हे. हे कांहीं दिवस रे. कमिशनरच्या आफिसांत, कांहीं दिवस रेलवे जमादार व हल्लीं बडोदें येथें नोकर आहेत.

धारवाडास गेली. तेथें दादा होतेच. दसरा करून गुर्लासुरास जा ह्मणून त्यांनीं सांगितलें. परंतु मला दसऱ्याकरितांच तेथें जावयाचें आहे ह्मणून सांगून पाऊस पडत होता, व रस्ते चांगले नव्हते तरी गाडी करून निघाले. गांवीं पोंचल्यावर बाळू घोरपडे यांनीं साठे यांस पत्र पाठविलें तें:—

" गुर्लासूर ता. १७ आक्टोबर १८८५.

सेवेशीं सेवक बाळा हणमंत घोरपडे याचा अनेक दंडवत. आपलें पत्र आतांच पोंचलें. आपण सखारामाबद्दल लिहिलें तर अण्णासाहेब यांनीं, त्याच्यापासून ठराव करतेवेळीं असा करावा कीं, त्यानें कोणतेंही स्त्रीपार्टी सोंग घेतलें पाहिजे. नाहीं तर त्याचा कायसा ह्मणे स्त्रीपार्टी सोंग घेत नाहीं असा ठराव आहे. तर तें उपयोगी नाहीं. तसा जर कबूल होईल तर हरकत नाहीं म्हणून लिहिणेंस अण्णासाहेब यांनीं सांगितलें आहे. त्याचा इकडे कोणत्या पार्टींत खोळंबा आहे हें आपणांस माहित आहेच. आपण व श्रीमंत अप्पासाहेब विजापुरास येणार ते तेथें शिवरामपंत किर्लोस्कर यांचा शोध करावा ह्मणजे ते आपणांस सर्व तेथील मजा दाखवितील. आपली राहण्याची वगैरे सर्व सोय करतील. नंतर इकडे येण्यास आपणास धारवाडास यावें लागेल. तेव्हां धारवाड मुक्कामीं किर्लोस्कर यांचा वाडा आहे तेथें बापूराव खरे राहतात तर तेथें उतरावें. व तेथून भाड्याचें घोडें करून सर्व कागदपत्रें घेऊन गुर्लासुराहून यावें. धारवाडाहून सात कोस हें गांव आहे* विशेष कांहीं नाहीं. अण्णासाहेब आदिकरून सर्व मंडळींची प्रकृति बरी आहे. कळावें. लोभ करावा ही विनंति.

आपला,

बाळा हणमंता घोरपडे. "

तेथें गेल्यावर वडिलांना मुलगा नांव मिळवून घरीं आला ह्मणून हर्षानंद झाला. त्याच्या तोंडचीं पदें ऐकावीं ह्मणून त्यांना फार इच्छा झाली. परंतु तीं ह्मणण्यासारखी माझ्यांत ताकद नाहीं, मी मोरोबा व भाऊराव यांस बोलावतों ह्मणजे ते ह्मणून दाखवितील; असें अण्णासाहेबांनीं ह्मणावें. या ह्मातान्यानें मग विसू न्हावी याजकडून पदें ऐकून घ्यावीं. याप्रमाणें महिना गेला. प्रकृति साधारण बरी होती, परंतु झोंप येत नसे. तेव्हां परत पुण्यास जावयाचें असा विचार झा-

* कर्नाटकाकडे तीन मैलांचा कोस धरतात.

ला. एके दिवशीं रात्रीं गांवाजवळ डोंगरावर असलेल्या **यल्लामा** देवीला **अण्णासाहेबांनीं** नवस केला कीं, " आज मला झोंप येईल तर उद्यां तुझ्या दर्शनास येईन. त्याशिवाय अन्नग्रहण करणार नाहीं. " कर्मधर्मसंयोगानें त्या रात्रीं झोंप आली. त्याबरोबर दुसरें दिवशीं लागलींच डोंगरावर गेले. तेथें स्नान करावयाला नको होतें तें मुद्दाम गार पाण्यानें केलें. त्याबरोबर वायूचा झटका होऊन तोंड वांकडें झालें, वाटेंतच **सौंदत्ती गांव** आहे, तेथें डाक्तरकडून औषधोपचार केले. मंडळीला यायला उशीर लागला ह्मणून काळजी वाटून वडील **सौंदत्ती**पर्यंत आले. सर्व मिळून रात्रीं आठ वाजतां परत घरीं आल्यावर संन्यास घ्यावयाचा ह्मणून म्हणूं लागले. वडील, चुलते यांना कदाचित् वायु होऊन बडबडत असेल म्हणून त्यांच्या ह्मणण्याकडे कोणी लक्ष दिलें नाहीं; रात्रीं अस्वस्थच होते. सकाळीं उठल्याबरोबर **विसू न्हाव्यास** धोकटी घेऊन गंगेवर जाण्यास सांगितलें. अत्तराच्या बाटल्या जवळ होत्या त्या काढवून. व सर्व अंगाला स्वतः अत्तर चोळलें. **नागपुराहून** रेशमी धोतरें आणविलीं होतीं तीं **कृष्णाप्पा**स कावेंत भिजवून छाट्या करून गंगेवर घेऊन ये ह्मणून सांगून आपण गंगेवर जाण्यास निघाले. वडलांनीं व घरांतल्या मंडळींनी त्यांचा प्रतिकार केला. परंतु त्यांची तंद्री एका गोष्टीकडे लागली होती. निरुपायास्तव ते स्वस्थ पडले व पाणी पिण्याचें निमित्त करून पाण्याचा खुजा मस्तकावर ओतून घेतला. यज्ञोपवित तोडून टाकिलें व वडील मंडळींना सांगितलें कीं, " हा देह तुमचा आहे. मला संन्यास द्या किंवा नका देऊं. मीं तो आपल्या मनानें घेतला आहे. " सोमवारीं संध्याकाळीं पांच वाजेपर्यंत साधारण शुद्धींत होते. शुद्ध गेली तसें डाक्तरास बोलावणें धाडिलें. सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. **अण्णा** आतां हातीं लागत नाहींत अशी सर्वांची खात्री झाली. संध्याकाळच्या सुमारास श्वास झाला. तसें माडीवरून त्यांना खालीं आणलें. डाक्तर वेळेवर येणें शक्य नव्हतें. किंवा त्यांनीं येऊन कांहीं करण्यासारखें नव्हतें. म्हणूनच अशा जिवितसंशयाच्या वेळीं डाक्तर किंवा धन्वंतरी बहुधा येत नाहींत. डाक्तरनें आपल्या हाताखालचा एक मनुष्य धाडला होता. परंतु त्याचें पाऊल दारांत व या धिप्पाड, लौकिकवान्, व सर्वांना आवडत्या अशा थोर पुरुषाचा

अंतरात्मा बाहेर अशी चुकामूक झाली ! याप्रमाणें **ता. २ नोव्हेंबर १८८५ अश्वीन वद्य ११ शके १८०७ रोज सोमवार रात्रौ या प्रसिद्ध पुरुषाच्या चरित्राची समाप्ति झाली !**

---

## नंतर !

**अण्णासाहेबांनीं** रंगभूमीवरची शेवटची कामगिरी दशरथाची केली आहे. दशरथाचें पात्र ज्याप्रमाणें पुन्हां रंगभूमीवर आलें नाहीं, त्याप्रमाणें **अण्णासाहेब**ही पुन्हां रंगभूमीवर आले नाहींत. रामराज्यवियोगाचें शेवटचें नाटक व **अण्णासाहेबांचें** रंगभूमीवर शेवटचें येणें हा योग एकदम आल्या कारणानें तें नाटक **किर्लोस्कर** मंडळींना अशुभदायक झालें आहे. तेव्हांपासून रामराज्यवियोगाचा प्रयोग मंडळीनें कोणत्याही ठिकाणीं शेवटचा ह्मणून लावला नाहीं.* अमावास्येच्या दिवशीं **अण्णासाहेबांचें पुण्याहून** प्रयाण व त्यांच्या आवडत्या **मोत्या** कुत्र्याचें त्यांच्या मरणापूर्वी कांहीं दिवस रडणें, या त्यांच्यासंबंधाच्या गोष्टी आमच्या लोकांच्या भोळ्या समजुतीवर केव्हां केव्हां विश्वास बसावयास लावतात. असाच आणखी प्रकार दहाव्या दिवशीं त्यांच्या और्ध्वदेहिकाच्या संबंधानें झाला. मृताच्या पिंडास कावळ्यानें स्पर्श केला नाहीं, ह्मणजे त्याची कांहीं तरी आशा राहिली आहे अशी समजूत आहे. **अण्णासाहेबांच्या** पिंडास कावळ्यानें स्पर्श केला नाहीं,

---

* पौराणिक नाटकमंडळीनींही रामायणांतील रामराज्यवियोगाचा भाग करून दाखविण्याचें सोडलें होतें. तो प्रयोग ज्या ज्या मंडळीनें करून दाखविला आहे, त्या त्या मंडळींत त्या सालीं फाटाफूट झाली आहे. अशीं सांगलीकर, आळतेकर वगैरे नाटकमंडळींचीं उदाहरणें होतीं. तेव्हांपासून त्या कथाभागासंबंधानें विलक्षण ग्रह जुन्या नाटकमंडळींत असे. कांहीं श्रीमंतांच्या घराण्यांत **किर्लोस्कराच्या** रामराज्यवियोगाचा शेवटचा प्रवेश पहात नसत.

यावरून त्यांचा कांहीं तरी आशातंतु मागें राहिला असावा असें म्हणावें लागतें. त्यांची कोणती आशा राहिली होती हें समजण्यास मार्ग नव्हता. ज्या ज्या गोष्टींबद्दल आशा राहिली असेल अशी कल्पना होती त्या त्या गोष्टी तुमच्या मागें चालतील याबद्दल वडील मंडळीकडून सांगण्यांत आलें. तुमच्या मागें तुमची मंडळी चालवूं, तुमच्या कुटुंबाचा योग्य प्रतिपाळ करूं. संन्यास घ्यावा अशी तुमची इच्छा होती, तर येथून पुढें जें और्ध्वदेहिक करावयाचें तें त्या शास्त्राप्रमाणें करूं. इत्यादि आश्वासन वडील मंडळींनीं दिलें; परंतु **अण्णासाहेबांचे** पिंडास कावळ्यानें स्पर्श केला नाहीं. शेवटीं वाट पाहण्याची मर्यादा संपल्यावर दर्भाचा कावळा करून तो विधि संपविण्यांत आला, व **अण्णासाहेबांच्या** आत्म्याला अशा तऱ्हेनें बलात्कारानें गति मिळाली !

**अण्णासाहेबांचें** संसाराच्या मोहपाशांत चित्त नसे हें त्यांच्या वडिलांचीं व चुलत्याचीं जीं पत्रें मागें दिलीं आहेत त्यांवरून कळण्यासारखें आहे. आपणास संतान नाहीं, किंवा तें असावें याबद्दल त्यांना कधीं सुद्धां वाईट वाटल्याचें दिसलें नाहीं,इतकेंच नाहीं, तर **बेळगांवास** त्यांचा एक लहान मुलगा होता तो वारला; तेव्हां त्याच्या ऐन सुतकांत त्यांनीं तेथें नाटक करविलें. त्यावरून त्यांच्या मनाची प्रवृत्ति कळून येते. जगांत येऊन चांगलें नांव मिळवावयाचें हें जें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्यकर्म तें त्यांनीं पुरें पुरें बजावलें होतें. मध्यम स्थितींतल्या माणसाला जितकें ऐश्वर्यसुख भोगण्यासारखें असतें तितकें त्यांनीं भोगलें होतें. मरणसमयीं त्यांचें वय ४२ वर्षांचें होतें. तरी अद्याप त्यांच्या अनेक उमेदी असतील. परंतु त्यांच्या अकालीं मृत्यूमुळें त्यांच्या उमेदी जागच्या जागीं व अज्ञात राहिल्या.

आपल्या गांवीं मंडळी नेऊन वडलांना नाटक दाखवावयाचें ही त्यांची फार दिवसाची इच्छा होती. तीही एक जागच्या जागींच राहिली.

**अण्णासाहेबांची** शरीरकाठी उंच, आकृति भव्य, वर्ण पिंगट व शरीर स्थूल असे. त्यांना पाहतांच त्यांच्याविषयीं आदर उत्पन्न होत असे. त्यांच्या पश्चात् यांचे वृद्ध तीर्थरूप, मातोश्री, त्रिवर्ग धाकटे बंधु, चुलते व त्रिवर्ग चुलतबंधु इत्यादि कुटुंबांतील शोकमग्न होणारा परिवार व आप्तगण फार मोठा होता. याप्रमाणें **अण्णासाहेब** आपली कीर्ति

मागें ठेवून चिदानंदस्वरूपाला जाऊन मिळाले; व **भारती** युद्धांत **कर्णा**चा रणांगणीं पात झाल्यावर शल्य जसा त्याचा रिकामा रथ घेऊन परत आला; त्याप्रमाणें क्रियाकर्मांतर झाल्यानंतर बरोबर गेलेली, **कृष्णापा, बाळू, विसू** व **मोत्या** कुत्रा ही मंडळी शून्यहृदय व शून्यमुख होऊन परत आली !

**" पुत्र व्हावा ऐसा गुंडा, ज्याचा तिहीं लोकीं झेंडा "**

असा पुत्र माझ्या पोटीं निपजला आहे असें **पांडुरंगतात्यांस** वाटत होतें. परंतु हा गर्व ईश्वरास फार दिवस सहन झाला नाहीं.

---

## मृत्युलेख.

**अण्णासाहेबांस** त्यांच्या हयातींत जसा चोहोंकडून मान मिळालेला होता तसा त्यांच्या पश्चात्‌ही त्यांच्या मृत्यूबद्दल मिळालेला आहे. **अण्णासाहेबांच्या** मृत्यूनें सार्वजनिक हानि झाली ती ज्या वर्तमानपत्रें, खाजगी पत्रें, पुस्तकें, काव्यें* इत्यादिकांच्या द्वारांनीं व्यक्त करण्यांत आली होती, त्यांपैकीं कांहींचा समावेश पुढें केला आहे:

ज्ञानप्रकाश ता. १२ नोव्हेंबर १८८५.

" आह्मांस कळविण्यास फार दुःख वाटतें कीं, संगीत नाटकाचे मूळ उत्पादक प्रसिद्ध **रा. रा. बळवंत पांडुरंग** ऊर्फ **अण्णा किर्लोस्कर** यांस ता० २ नोव्हेंबर रोजीं त्यांच्या जन्मग्रामीं देवाज्ञा झाली. रा० **अण्णांचें** वय मरणसमयीं ४०।४५ वर्षांचें असून अशा अकालीं त्यांस मृत्यूनें गांठल्यामुळें त्यांच्या कुटुंबांतील माणसांवर अकल्पित घालाच पडल्यासारखा झाला. संगीत नाटकांपूर्वीं **अण्णा** फारसे प्रसिद्ध नसून तीं नाटकें रचून त्यांचे प्रयोग ते स्वतः इकडल्या प्रांतीं करूं लागल्यापासून अल्पावकाशांत त्यांची कीर्ति चोहोंकडे इतकी पसरली कीं, साऱ्या महाराष्ट्रांत त्यांचें नांव कोणास माहीत नाहीं असें

---

* "गुणातिशय भाण" नांवाचें काव्य अण्णासाहेबांच्या निधनावर १८८६सालीं प्रसिद्ध झालें आहे. " भाण " ह्मणजे एकपात्रीं नाटक. याचे कर्ते रंगनाथ अनंत लोहकरे पाबळकर होते.

नाहीं. यामुळें त्यांची मृत्युवार्ता ऐकून प्रत्येकास हळहळ वाटल्यावांचून राहणार नाहीं! पूर्वीपासून **अण्णां**स नाटकाचा छंद असून पौराणिक नाटकाच्या प्रयोगाकरितां त्यांनीं रचलेलीं कांहीं आख्यानांचीं पदें प्रसिद्ध आहेत. शिवाय त्यांनीं शांकरदिग्विजय नांवाचें एक नाटक रचलें आहे. परंतु ही संगीताची नूतन व मोहक टूम काढल्यापासून त्यांचे उद्योगास विशेष श्रेय आल्यासारखें झालें. प्राणिमात्रांस गायन हें प्रिय असून त्याचा नाटकांत प्रवेश झाल्यानें त्या नाटकाच्या अंगीं कांहींएक रमणीयत्व आलें असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. इंग्लिश लोकांत आपेरा ह्मणून जो एक संगीत नाटकाचा प्रकार आहे त्याच धर्तीवर त्यांनीं हा प्रकार इकडे सुरू केला. आतां नाटकें, गायन, इत्यादि संतोषकारक व संतापहारक गोष्टी ह्मणजे केवळ अनीतिमूलक असें ह्मणणाऱ्या प्यूरिटन मताच्या कांहीं धार्मिक लोकांस **अण्णां**ची कृति जरी मान्य होणार नाहीं, तथापि त्यांनीं, **कै० शास्त्रीबोवांनीं** केसरींत नाटकासंबंधानें जे निबंध लिहिले आहेत ते एकवार पुनः वाचावे अशी आह्मीं त्यांस शिफारस करतों. अस्तु.

**रा. रा. अण्णां**चीं, शाकुंतल, सौभद्र व रामराज्यवियोग अशीं तीन संगीत नाटकें असून पाहिलें भाषांतररूप आहे. मूळावरून पाहतां या भाषांतरांत जरी कांहीं चुका आहेत तरी त्यांची कविता एकंदरींत रसाळ, सोपी, व चटकदार आहे. कवि या दृष्टीनें यांची योग्यता फार मोठी म्हणणें जरी कदाचित् वादग्रस्त होईल, तथापि दुसऱ्या दोन नाटकांत त्यांची कल्पनाशक्ति बरीच दिसून येते. त्यांच्या मनांत आणखी संगीत नाटकें बरींच करावयाचें होतें, व नोव्हेंबर अखेर येथें आपल्या नाटकांचे एक दोन प्रयोग करून ते मंडळीसुद्धां कर्नाटकांत फिरण्यास जाणार होते. परंतु हा अकस्मिक प्रसंग गुदरल्यामुळें त्यांचे सर्व बेत जागचे जागीं राहिले! **रा. अण्णा** हे मोठे दिलदार असून त्यांचा स्वभाव शांत व मनमिळाऊ होता. यांचें घराणें तिकडल्या प्रांतांत पूर्वीं नामांकित श्रीमान् होतें. परंतु कालाच्या स्थित्यंतरानुरूप त्यास हल्लीं बरीच उतरती कळा लागली असल्याचें ऐकिवांत आहे. असो. त्यांच्या मरणानें त्यांच्या वृद्ध पित्यास फार दुःख होणार आहे; परंतु ईश्वरी नियमापुढें मनुष्याचा नाइलाज आहे, हें मनांत आणून

त्यांनीं आपलें समाधान करून घेणें भाग आहे. **अण्णांस** मूलबाळ कांहीं नाहीं."

नेटिव्ह ओपिनियन ता. १९ नोव्हेंबर १८८९.

"येथील प्रसिद्ध गृहस्थ **रा० रा० अण्णा किर्लोस्कर** यांस गेल्याच्या मागच्या सोमवारीं ह्मणजे ता. २ नोव्हेंबर रोजीं देवाज्ञा झाली. हें ऐकून पुष्कळांस वाईट वाटल्याखेरीज राहणार नाहीं. हे गृहस्थ लोकप्रिय होण्यास यांचीं संगितें होत. यांना कविताशक्ति नामी होती. नाटकाची जुनी धरती बदलून संस्कृत धरतीवर पद्यात्मक नाटक यांनींच प्रथम मनोवेधक रीतीनें केलें. यांचे पाठीमागें संगीत शाकुंतल, संगीत सौभद्र व संगीत रामराज्यवियोग हीं नाटकें यांचें नांव चांगलें चालवतील. या नाटकांमध्यें संगीत सौभद्र तर आज फारच लोकप्रिय झालेलें आहे. हे गृहस्थ सदां आनंदी, मनमिळाऊ, उपकारी असे होते. ह्यांचा शरीरबांधा भव्य होता. ह्यांचें वय मरण काळीं ४२ वर्षांचें होतें."

वार्ताहर, ता. १९ नोव्हेंबर १८८९.

"स्वदेशहित व्हावयास म्हटलें ह्मणजे स्वदेशीय राज्यकर्ताच पाहिजे. यांस प्रमाण **जपान** देश आहे. परकीय राजाचे अमलाखालीं खरें हित करण्याचें कोणाही देशाभिमानी पुरुषानें मनांत आणूं नये. अशा अवस्थेंतही जे लोक देशाचें हित व्हावें असें इच्छितात व यथाशक्ति व यथाबुद्धि त्याविषयीं श्रम करितात ते धन्य होत. आपल्या हिंदुस्थानदेशाचें असें कांहीं विलक्षण प्रारब्ध आहे कीं, त्यांत कोणी असा पुरुष निपजला किंवा निपजेल असा सुमार दिसल्यास त्यास मृत्यूनें आलिंगन दिलें असें समजावें! **प्रो. बाळशास्त्री जांभेकर, डाक्टर भाऊ दाजी, रामराय मोहनदास, बंडूनाना रानडे, बाबू केशव चंद्रसेन, विष्णुशास्त्री चिपळूणकर, कृष्णदास पाल, बाबू हरिश्चंद्र, रामभाऊ व महादेव विष्णु गोखले** इत्यादि उदाहरणें अशा प्रकारचीं होत. हल्लीं ज्यांनीं रसिक लोकांस नवीन नाट्यकलेनें वेड लावून टाकिलें होतें ते रा० रा० **बळवंत पांडुरंग** ऊर्फ **अण्णा किर्लोस्कर** गेल्या २ रे तारखेस कैलासवासी झाले. हें दुःखप्रद वर्तमान कळविण्यास आम्हांस वाईट वाटतें. यांनीं केलेलीं तीन संगीत व शांकरदिग्विजय **नाटक** अशीं

प्रसिद्ध आहेत. यांशिवाय त्यांनीं अनेक मनोहर **स्फुट पद्यें** केलेलीं आहेत. यांचे कवितेविषयीं नवीन सांगणें नको. रसिक लोकांच्या हृदयांत ती जागृत आहेच. यांनीं संगीत शाकुंतल नाटकाचा प्रयोग शके१८०२ च्या धनत्रयोदशीच्या दिवशीं रविवारीं **पुण्यास** केला. त्या दिवसापासून ते आपल्या विलक्षण गुणानें लोकांजवळून धनहरण करीत होते. नाटक हें देशोन्नतीस किंवा देशहानीस कारण आहे, याचा विचार करण्याचें हें स्थल नव्हे. **किर्लोस्कर** हे **धारवाड**जवळ **गुर्लहोसुर** गांवीं प्रसिद्ध **पेशवाई** वीर **बापू गोखले** यांचे आश्रयानें गेले. हें घराणें मोठें असून संस्कृत विद्येंत त्यांत पुष्कळ प्रसिद्ध पुरुष होऊन गेले. **अण्णां**चे तीर्थरूपही चांगले विद्वान आहेत. त्यांचे अकालीं मृत्यूनें त्यांचे वृद्ध पित्यास, तरुण स्त्रीस, मित्रमंडळीस व रसिक जनांस फार दुःख झालें आहे ह्यांत संशय नाहीं, **अण्णासाहेब** हे मनमिळाऊ, दिलदार, व उदार होते. ह्मणूनच हें नाटक संबंध तीस ऋतु झाले तरी चाललें. मृत्यु हाच जातीमात्राचा परिणाम आहे तो सर्वांस गांठणारच. त्यांचें वय ४२ वर्षांचें होतें. मरणाचे दिवशीं संन्यास घेण्याविषयीं त्यांचा फार आग्रह होता. परंतु असा शेवट होणार असें कोणासही वाटलें नव्हतें."

केसरी, ता. १७ नोव्हेंबर १८८९.

" संगीत नाटकांचे उत्पादक **बळवंत पांडुरंग** ऊर्फ **अण्णासाहेब किर्लोस्कर** यांस तापाच्या आजारानें देवाज्ञा झाल्याचें वर्तमान आमच्या वाचकांस कळविण्यास आम्हांस फार वाईट वाटतें. **अण्णा किर्लोस्कर** हा गृहस्थ मोठा मार्मिक व रसिक होता. गायनकलेचें यास चांगेलं ज्ञान होतें. याची वृत्ति फार शांत व उदार असे. याची कविता सोपी व गोड असून कित्येक ठिकाणीं तींत चांगली कल्पनाशक्तिही दिसून येई. याचें **संगीत शाकुंतल** व **संगीत सौभद्र** हीं फार लोकप्रिय झालीं आहेत. **रामराज्यवियोग** नाटक अपुरें राहिलें आहे. गेल्या पांच चार वर्षांत याच मंडळीनें महाराष्ट्रीयांची उत्तम प्रकारें करमणूक करून पुष्कळ पैसा मिळविला. पैशाच्यासंबंधानें **अण्णा**चा हात सढळ असल्यामुळें व स्वभाव मिठ्ठा असल्यामुळें पाहिजे तसलीं मनुष्यें वश करून घेऊन त्यांना आपल्या उपयोगास लावून घेण्याची हातोटी

**अण्णा**स फार चांगली साधली होती. अण्णाच्या नाटकांनीं संगीताचे अलाप पोरांसोरांच्या तोंडीं बसून जाऊन लोकांच्या गायनसंबंधीं रुचींत व परीक्षेंत पुष्कळ सुधारणा झाली आहे. **अण्णा** स्वतःच्या प्रकृतीविषयीं होता तितका उदासीन नसता तर बरेच दिवस वांचता व लोकांचें मनरंजन व स्वतःचें हित करूं शकता; पण ईश्वरइच्छेपुढें इलाज नाहीं. सांगणें येवढेंच उरलें आहे कीं, याच्या जिवावर ज्यांनीं हजारों रुपये उधळिले व मिळविले. त्यांनीं त्याच्या पाठीमागें राहिलेल्या त्याच्या दुःखी पत्नीसाठीं कृतज्ञतापूर्वक कांहीं खपपट करून तिला दोन पैशांचें साहाय्य करावें. नाहींतर त्यांच्याकडे कृतघ्नतेचा दुष्ट आरोप येईल."

विविधज्ञानविस्तार.

"संगीत नाटकांवरून प्रसिद्धीस आलेले **बळवंत पांडुरंग** ऊर्फ **अण्णा किर्लोस्कर** यांनीं या लोकचे खेळ आटपून परलोकीं प्रयाण केलें. यांच्या मृत्यूपासून यांच्या तरुण स्त्रीस आणि आप्तवर्गास तर दुःख झालें आहेच; पण पुष्कळ नाटकप्रेक्षणेच्छु जनांस सुद्धां फार हळहळ लागून राहिली आहे.

यांच्याप्रमाणें अजून कोणास नाटकांत यश आलेलें नाहीं. या संगीत नाटकांपासून यांस पाऊणलाख रुपयांवर प्राप्ति झाली, असें यांच्या संगीत चारित्रावरून समजतें. लक्ष्मीचीच यांच्यावर कृपा होती असें नाहीं, तर सरस्वतीच्या प्रियपात्रांसही यांची सेवा करण्यांत एक प्रकारचा मोठेपणा वाटत असे. बी. ए. एम. ए. एल. एल. बी. एल एम. आणि एस. असे असे लोक यांच्या नाटकांशीं संबंध ठेवणें फार प्रतिष्ठेचें कलम समजत. पण **अण्णां**ना या विद्वान् लोकांच्या सहवासापासून जो वास्तविक लाभ होणें रास्त होतें, तो मात्र झाल्याचें दिसत नाहीं. तो जर होता, तर त्यांस मिळालेल्या पैशांतून एकादा चांगला देशहिताचा उद्योग निघून **अण्णा**चें नांव चिरकाल राहिलें असतें. इतकेंच केवळ नव्हे, पण त्यांच्या संगीत नाटक मंडळीला सभ्य रीतीनें चरितार्थ चालविण्यास उत्तम साधन झालें असतें. शिवाय अशानें त्यांच्या साहाय्यास आलेल्या या विद्वान् मंडळीलाही कांहीं यशाचा वांटा मिळाला असता. तसा कांहीं प्रकार झाला नाहीं; इतकेंच नाहीं, पण त्यांच्या मृत्युसंबंधा,

नें केसरीमध्यें आलेला लेख पाहतां असें दिसतें कीं अण्णांनीं आपल्या घरच्या मंडळीचीही नीटशी तजवीज करून ठेविली नाहीं. जर तसा कांहीं प्रकार झाला असता, तर केसरीकारांना त्यांच्या पत्नीच्या वतीनें अवशेष राहिलेल्या संगीत नाटकमंडळीची करुणा भाकणें जरूर पडलें नसतें. तर मग हा एवढा पैसा गेला कोठें? तो कोठेंही जावो, पण निःसंशय त्यांच्या पत्नीची स्थिति अत्यंत करुणास्पद आहे, असें प्रसिद्ध झालेल्या माहितीवरून दिसतें; आणि आह्मांस वाटतें कीं, त्यांचें कांहीं स्मारक असणें जर राहिलेल्या मंडळीस अवश्य वाटत असेल, तर त्या कृत्याप्रीत्यर्थ जमा केलेला पैसा त्यांच्या अनाथ स्त्रीस द्यावा हें त्यांचें उत्तम स्मारक होय. असो.

संगीत नाटकापासून नाटकांचा जो इच्छित हेतु तो कितपत सफळ होतो, याबद्दल ‘ संगीत सौभाग्य रमा ’ नाटकाचें परीक्षण करतांना आह्मीं आपला अभिप्राय दिला आहे. अण्णांनीं तीन संगीत नाटकें लिहिलीं. संगीत शाकुंतल, संगीत सौभद्र आणि संगीत रामराज्यवियोग. यांपैकीं शेवटचें अपूर्ण असून छापलेलें नाहीं. या तिन्ही नाटकांवर थोड्या दिवसांपूर्वीं वऱ्हाड प्रांतांतील वैदर्भ नामक वर्तमानपत्रांत थोडक्यांत परीक्षण आलें आहे, त्यावरून या नाटकांची वास्तविक योग्यता काय आहे याची बरीच अटकळ करितां येते. गायनकलेच्या पुनरुज्जीवनास अण्णांनीं आपल्या संगीत नाटकांनीं उत्तेजन दिलें यांत भ्रांति नाहीं. लोकांना ज्या रसांची विशेष आवड, त्या रसांची ज्यांत रेलचेल आहे अशीं नाटकें रंगभूमीवर आणून, पद्यांचीही योजना त्यांच्या आवडीस अनुसरून त्यांनीं केली होती, हें त्यांच्या मार्मिकतेचें लक्षण होय. तथापि लोकमनांवर त्यांचा इतका पगडा बसला असतां, तात्कालिक फायद्यापलीकडे त्यांची नजर गेली नाहीं याचें आम्हांस वाईट वाटतें........”

---

" कै० अण्णासाहेब किर्लोस्कर यांचा संगीत पवाडा.

बलवंत कवी गुणवंत अंत कसा थोडक्यांत झाला ॥ गेला संगीत कुसुम झेला ॥ ध्रु० ॥ मुळ धाम ग्राम ॥ ठाम त्यांना असे जहागीर ॥ अधिंच कुलवान कीर्ति थोर ॥ पितयाचें नांव पांडुरंग केलें बहुरंग अंग ज्यांना विद्येचें फार ॥ कला कौशिल्यीं बहुत चतुर ॥ निज ध्यास ॥ नाटकाची आस त्यांस असे वाग्देववीर ॥ प्रति कालीदास कवीवर ॥ चाल ॥ अधिं केली नाटकाची स्वारी ॥ अण्णांनीं ॥ त्यांत नांव मिळविलें भारी ॥ अण्णांनीं ॥ हेतु पुरला धरलि नोकरी, ॥ अण्णांनीं ॥चाल॥ रेविन्यूकमिशनरांत ॥ जागा ॥ साहेबांनीं दिली हपिसांत ॥ झालें नांव थोडें दिवसांत ॥ येती ॥ नाटकें बेळगांवांत ॥ सर्वांसि साहाय्य ते करीत ॥ आली पारशांची कंपनी तेथ ॥ उ० ॥ झाली त्यांत तक्रार ह्मणुनिया हेतु मनिं धरिला ॥ गेला० ॥१॥ पारशाचें जाणुनि इंगित केलें संगीत शाकुंतल आधीं रुचलें ॥ मोरोबा दुष्यंताचि ठरले ॥ चवथा अंक केला मग पुरा बाळकोबा हिरा कण्वमुनी खरा मनीं धालें ॥ शंकरा शकुंतला केलें॥ गाण्याचें अंग त्या नसे म्हणून न्यून दिसे परि रूप॥ गुण असे गमले ॥ पुण्यामध्यें तयारिंत आले ॥ चाल ॥ सन अठराशें ऐशी सालीं, पुण्यामधीं ॥ ख्याती ॥ शकुंतलेची झाली ॥ पुण्यामधीं ॥ चाल ॥ पहिला प्रयोग मुंबईत केला ॥ नाहीं कोणास जागा बसण्याला ॥ येति दुरून लोक पाहण्याला ॥ बंद दरवाजा होई आठाला ॥ मनिं खिन्न होऊनि बाजूला ॥ फिरती जणु भ्रमर लुब्धला कमला ॥ उ० ॥ किती मिळविला पैसा जैसा कुबेर साहाय्य झाला ॥ गेला० ॥ २ ॥ बडोद्यांत केला मग यत्न मिळालें रत्न ॥ भाऊराव गाति सुस्वर ॥ केलें सौभद्र रसिक फार ॥ सुभद्रा पार्ट भाउस पार्थ मोरोबास नाटेकर कृष्ण केले चतुर ॥ स्वतः बलराम बनले वीर ॥ शाकुंतल गोडी थोडी सुभद्रेस उडी जना घडोघडी प्रीति थोर ॥ सुचेना अन्य व्यवहार ॥ चाल ॥ काशि गाण्याची चटक लाविली ॥ सर्वांशीं ॥ होती क-

ठिण कला परि सुलभ केली ॥ सर्वांसी प्रेमाची खुण दाविली ॥ सर्वांसी ॥ चाल ॥ नवी केली चाल संगीताची ॥ झाली राळ इतर नाटकांची ॥ गेली किंमत नायकिणींची ॥ गाती, सुस्वर पदें अण्णांचीं ॥ झाली कीर्ति पहा मंडळीची ॥ ऐशी आजवरी नसे कोणाची ॥ चाल ॥ संगीताचा इंद्र किंवा नभीं चंद्र प्रकाशित ज्ञान मार्गाला ॥गेला सं०॥ तिन अंक रामराज्यवियोग दैवाचा योग जडला मेहरोग भोग त्यांला ॥ कीड लागली आम्रतरुला ॥ होणार भविष्य अधि कथन दशरथा निधन कवन त्यांनीं तिसरा अंक केला ॥ घातला दैवानें घाला ॥ तात्याच्या भेटीची आस सोडुनी मोहपाश गेले गांवांस गुरळुसाला ॥ जाय यल्लंमा दर्शनाला ॥चाल॥ अश्विनमास अठराशें सात ॥ एकादशी ॥ सोमवार पूर्वा नक्षत्र ॥एकादशी ॥ रास वृश्चिक अकरावा केत॥एकादशी ॥ चाल ॥ स्थान दुसरें साडेसातीचें ॥ राहू पंचम सहावें बुधाचें ॥ नऊ अवर जाहले रात्रीचे ॥ व्रत होतें सोमवाराचें ॥ उ० ॥ हिरा खरा दिनकरा परि कसा गेला अस्ताला ॥ गेला सं० ॥ ४ ॥ हाहाकार झाला फार गेला भ्रतार पत्नीला दुःख झालें भारी ॥ म्हणे आतां कोण मला तारी ॥ मम सौभाग्याचें जहाज बुडालें गेले शिरताज देवनगरीं ॥ कशी सोडुनि दिली नारी ॥ वृद्धपणीं शोक बहु झाला पुत्र मोहाला स्मरून तात्याला दुःख भारी॥ नेली सौख्याची ठेव सारी ॥ मोरोबा भाऊराव मिळुनी ॥ तात्यांशीं ॥ आले पुण्यामधीं घेवोनी ॥ तात्यांशीं ॥ केली सेवा सन्मानोनी ॥ तात्यांशीं ॥ चाल ॥ गुरुपुजे लागीं केलें ॥ चार खेळाचें द्रव्य जें आलें ॥ तात्यांशीं पुढें बसविलें ॥ बलवंताचें कवन गाईलें इतरां नयनीं असुं आलें ॥ म्हणती काय ईश्वरी तालें ॥ उ० ॥ त्रिंबक होऊनी लीन जोडलें कवन आपुलें भुवन प्रिय सकलां ॥ गेला संगीत कु० ॥ ५ ॥ समाप्त ॥"*

---

* तात्याबा पुणेंकर म्हणून एक जुन्या नाटकांतला मनुष्य मनुष्य असे त्यानीं हा पवाडा केला.

## दुखवट्याचीं पत्रें.

" गुर्लासूर ता. २१।११।८५.

रा० रा० साठे यांस—

पोष्य रंगो नारायण किर्लोस्कर साष्टांग नमस्कार. विनंति. आपलें ता० ११ चें पत्र पावलें. चिरंजीव अण्णास अकालीं मृत्यूनें झडप घातली त्या योगें आप्त इष्ट व इतर जनांस जें दुःख झालें त्याचें निवारण ज्याचा त्यास विवेक होऊनच व्हावें. दुसऱ्यानें समाधान करण्याचा मुळींच मार्ग नाहीं. बाकी मंडळीनें त्यांचें उदाहरण, सहनता इत्यादि गुण स्वीकारून धंदा चालविल्यास अण्णाच्या श्रमाचें सार्थक व त्यांस भूषण होणार आहे. **कृष्णापा, बाळू** आदीकरून कालरोजां येथून निघून तेथें आले आहेत. त्यांचे मुखें सर्व कळेल. पुढें होईल ती हकीकत कळवावी. अप्पासाहेब आहेत तेव्हां सयुक्त होईल अशी आशा आहे. हे विनंति."

" उमरावती. ता. १३।११।८५.

रा० रा० त्रिंबक नारायण साठे मुक्काम पुणें स्वामींचे सेवेसीं पोष्य बळवंतराव खोत मुक्काम उमरावतीहून सा० नमस्कार. विनंति उपरी. ता. १२ माहे नोव्हेंबर सन १८८५ इसवीपावेतों सुखरूप असो विशेष. रा० अण्णा किर्लोस्कर हे कैलासवासी जहाले हें वर्तमान आपलें कार्ड येण्याचे अगोदर तीन दिवस इकडील मंडळीस समजल्यावरून फार दिलगीर जाहली. ज्या ज्या मनुष्यास अण्णा माहीत आहेत व ज्यांनीं अण्णाचे प्रयोग पाहिले आहेत ते त्यांचेबद्दल फार दिलगीर आहेत. पत्रीं लिहून उघड करितां येत नाहीं. आमच्या घरांतील सर्व माणसें फार कष्टी झालीं. प्रसंगीं त्या दिवसापासून आठवण विशेष काढीत आहेत. असा पुरुष भव्य, मनमिळाऊ आणि त्याचा चांगुलपणा याबद्दल गेल्याचे मागें काय लिहूं. असो, जें झालें त्याजबद्दल दिलगीर होऊन उपयोग कांहीं दिसत नाहीं. आतां याबद्दल तुह्मीं मंडळींनीं विवेकच केला पाहिजे. आतां या पुढें कंपनीची काय व्यवस्था करणार ती कळवावी. आह्मां लोकांमध्यें एका जुटीनें राहणें फार कठीण. तथापि तुमच्या कंपनींतील बहुतेक मंडळी सहनशील आहेत. त्यांनीं अण्णांचें नांव घालवूं नये असें माझें त्यांस सांगणें आहे. हें तुह्मीं सर्वांस कळवावें. आतां मंडळी आपआपल्या गांवीं गेली कीं काय ? एकेठिकाणीं असल्यास त्या सर्वांस माझा नमस्कार कळवून माझी विनंति त्यांस कळवावी. रा. अंताजी छापखाने यांनीं मला प्रथम दिवशीं अण्णा नागपुरास येणार असें सांगितलें. म्हणून मला आनंद झाला होता. तों दुसरे दिवशीं हें वर्तमान कळल्यावरून फारच दुःख झालें. ईश्वरइच्छेपुढें कोणाचा उपाय चालत नाहीं. एकंदर हकीकतीचें पत्र ल्याहावें, हे विनंति.

**व्यंकाजी बळवंत खोत.** "

खोत हे अण्णासाहेबांचे बेळगांवचे स्नेही होते.

पुढील पत्र नाशीकचे वकील नारायण परशराम टिळ्ळू यांचें आहे. अण्णासाहेबांचे पूर्वाश्रमांतले हे स्नेही आहेत.

" कोठुरें. तालुके निफाड ता. १३।११।८५.

लिंबकराव साठे यांस मुक्काम पुणें—कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. आपण लिहिलेलें विषतुल्य वर्तमान भाऊबिजेचे दिवशीं उडत उडत या गांवीं माझे कानीं आलें. परंतु मीं त्याजवर भरंवसा ठेवला नाहीं. पुढें पुणेंवैभव पत्र आलें त्यांत ही बातमी पाहिली. तेव्हां मात्र कुटुंबांतील कर्ता बंधु जावा याप्रमाणें मनास दुःख होऊन कर्तव्यकर्म दोन दिवस अगदींच सुचलें नाहीं. दिवाळींत पिलोबा येथें असल्यानें अण्णांच्या कवितामृताचें यथेष्ट पान केलें होतें. इतक्यांत ही दुष्ट बातमी आल्यानें मनाची कशी स्थिति झाली असेल याचा तुह्मी विचार करा. असो, मृत्युलोकीं जो जगमान्य व प्रिय पुरुष होता तो ईश्वरासही प्रिय वाटून त्यानें नेला तेथें कोणाचा उपाय नाहीं. आतां कंपनीची व्यवस्था काय होणार, खेळ सुरू राहणार कीं नाहीं? रा. मोरोपंत, भाऊराव, निपाणकर, रामभाऊ वगैरे सर्व मंडळीस माझे साष्टांग नमस्कार. या सर्वांस व आपणांस इतकीच विनंति कीं, अण्णासाहेब यांचें स्मारक म्हणून निदान एक वर्ष तरी कंपनी चालविण्यास अगदीं हयगय करूं नये. कळावें हे विनंति.

**नारायण परशराम.** "

अकोलें. ता. १८।१२।८५.

मित्रवर्य राजमान्य राजश्री लिंबकराव स्वामीचे सेवेसीं कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति विशेष. आपलें ता. १५ चें पत्र आतांच पावलें. कारण मी गांवगन्ना फिरत असल्यामुळें पत्रें उशीरा पोंचतात. आपणाकडून आलेल्या पत्रांपैकीं दोन पत्रांचीं उत्तरें मजकडून गेलीं नाहींत. याचें कारण आपला मुक्कामच कायम नाहीं. अस्तु. अण्णा वारल्याबद्दल बळवंतराव यांनीं तेच दिवशीं मजला तार पाठविली होती. तें वर्तमान ऐकून किती दुःख जाहलें तें पत्रीं लिहितां येत नाहीं. अण्णासारख्याचा स्नेह होऊन त्याचा उपयोग व्हावा अशी इच्छा होती. परंतु तसें झालें नाहीं. इतकेंच नाहीं तर स्नेह झाल्यावर पुन्हां भेटही घडली नाहीं. अण्णासारखा मनुष्य मिळणें कठीण. जरी माझा थोड्याच दिवसांचा त्यांच्याशीं सहवास होता तरी त्यांचे गुणावद्दलची माहिती बरीच झाली. व त्यामुळें त्या गृहस्थाची व आपली पुन्हां भेट होऊन कांहीं दिवस उभयतांचें वास्तव्य एके ठिकाणीं व्हावें अशी फार इच्छा होती. ती ईश्वरानें घडूनच आणली नाहीं. यामुळें फारच वाईट वाटत आहे. दुःखांत सुख इतकेंच वाटत आहे कीं, त्यांचा अंत होण्यापूर्वींच त्यांची भेट झाली.

इतकेंच नाहीं तर त्यांचे सद्गुणामुळें थोडेच दिवसांत स्नेह होऊन त्यांच्या गुणाचाही लाभ पाहण्यास व ऐकण्यास मिळाला. आपण सर्वांनीं कृतज्ञ होऊन त्यांच्या मागें त्यांच्या कुटुंबास मदत करण्याचें जें मनांत आणलें आहे, हें फार स्तुत्य आहे. तसेंच त्यांचे वडिलांस त्यांचे मनांतून जें दाखविणें होतें त्याचीही पूर्णता आपण करीत आहांत. या दोन्ही गोष्टींवरून अण्णा आपल्यास स्वर्गांतून आशीर्वाद देतील यांत संशय नाहीं. आतां आपणांस सांगणें इतकेंच आहे कीं, आपण आपलें नाटक लयास जाऊं देऊं नये. ईश्वरकृपेनें आपल्यास मनुष्यें पुढें मागें मिळतीलच. कारण आपण जर तो उद्योग सोडला नाहीं, व चांगलीं मनुष्यें मिळवून आहे तें तसेंच चालविण्याचें मनांत आणून निश्चयानें राहिलांत तर ईश्वर कृपा करील. आपले जवळ भाऊराव, बाळकोबा, रामभाऊ व मोरोबा यांच्यासारखे मोहरे असतांना व इतके दिवस अण्णांचे तालमींत असून ते गेले, त्यास पुरे दोन चार महिने झाले नाहींत तोंच त्यांनीं हातपाय गाळणें व आज इतके दिवस बहुत यत्न करून अण्णांनीं जें नाटकास नवीन रूप दिलें तें पूर्णतेस न आणतां मध्येंच सोडणें हें बरोबर नाहीं. आपण सर्वांनीं हिंमत धरल्यास मागें पुढें आपल्या मनाप्रमाणें होऊन अण्णांचें नांव अमर राहील. तात्पर्य धैर्य खचूं न देतां क्रम चालू ठेवावा. सूज्ञांस विशेष ल्याहावें असें नाहीं. आपण पुढें काय कारणार याबद्दलचें ठरल्यावर साद्यंत हकीकतीचें पत्र यावें. वरकड मजकूर सर्व ठीक आहे. ............ कळावें. हे विनंति. रा. रा. भाऊराव, मोरोपंत, रामभाऊ, बाळोबा वगैरे मंडळीस आमचा सा० नमस्कार. सदर्हू लिहिल्यावरून कळेल.

सदाशिव विष्णू." ⁕

"इंदूर. ता. १९।११।८५.

रा. रा. त्रिंबक नारायण साठे मुक्काम पुणें यांसी कृतानेक साष्टांग नमस्कार. वि. वि. आपलें पत्र व कार्ड एकदमच पावलें. त्या पूर्वीच रा. बाळा घोरपडे याजकडून गुर्लसुराहून कार्ड येऊन रा. रा. अण्णा किर्लोस्कर एकाएकीं वारल्याचें अतिशय उद्वेगकारक व शोककारक वर्तमान कळलें होतें. ह्या वेळीं किती वाईट वाटलें हें लिहितां येत नाहीं. इतकेंच लिहिणें बस्स आहे कीं, आजवर माझे आठवणींत मला इतकें वाईट वाटलें नाहीं. हा सर्व रीतीनें त्यांचे घरचे मंडळीचा घात झालाच. पण त्यांचे स्नेही मंडळीला व इतर सर्व महाराष्ट्रीय लोकांना त्यांचे मरणानें

---

⁕ सदाशिव विष्णू भागवत हे वऱ्हाडांत प. व. खात्यांत ओव्हरसीयर होते. हल्लीं पेनशन घेऊन स्वस्थ आहेत. हे नाशकास अगदीं अनोळखी गेले होते. त्यामुळें तेथील गयावळांनीं बरेंच पिसाळून सोडलें. इतक्यांत अण्णा व मंडळीनीं त्यांस गयावळांच्या कचाट्यांतून सोडवून आपल्या घरीं आणलें. तेव्हांपासून यांचा स्नेह झाला होता.

आतां नाट्यकलेचा गुरु, स्नेहाचा व चांगुलपणाचा सागरच नाहींसा झाला यांत संशय नाहीं. याविषयीं ल्याहावें तितकें थोडें. येथील आबालवृद्धांस व वायकामुलांसहीं ही गोष्ट ऐकून वाईट वाटलें असून, जो तो आतां नाटककला बुडाली असें ह्मणत आहे. श्रीमंत बाळासाहेबांस ही गोष्ट खरी वाटेना ! व त्यांनाही फार वाईट वाटलें. अलीकडे ते मजवर नाराज असल्यामुळें मीं त्यांच्याकडे जात नाहीं. यामुळें अण्णांचे पगाराबद्दल निकाल करून घेण्यास मला सवड नाहीं. तरी पुन्हां एकवार त्यांचेकडे जाऊन साधल्यास याचा कांहीं तरी खुलासा काढून कळवितों. रा. कृष्णशास्त्री द्रवीड यांचेकडे तसबिरांची पेटी होती ती आजच मागून आणून खोलून पाहतां तींत संगीत शाकुंतलच्या चार, सौभद्राच्या दोन, व चित्रशाळेंतील संगीत शाकुंतल अंक ४ था, राधाकृष्ण, अक्कलकोटस्वामी व गणपती पंचायतन अशा दहाच तसबिरी असून त्याच्या कांचा फुटल्या आहेत. नीटपणें न राहिल्यानें तसबिरी खराब झाल्या आहेत. तरी त्यांची काय व्यवस्था करावयाची ? यापेक्षां जास्त तसबिरी होत्या कीं काय वगैरेचा खुलासा करावा. तसेंच आमचें कंपनीकडे खातें असलेलें लिहून यावें. येथें आले वेळीं मंडप केला त्याचे खर्चापैकीं पन्नास राहिले असावेत.

आतां पुढें कंपनीचे कसे काय बेत आहेत ते कळवावे. आमचे मतें कंपनीची व्यवस्था होईल तेथवर पुढें लिहिल्याप्रमाणें करावी. कै. रा. अण्णांनीं हातीं धरलेलें काम कांहीं तरी नीटपणें पुढें चालविण्यास आमचे मतें रा. गोविंदराव देवल यांचे खेरीज मिळणार नाहीं. त्यांचे अंगीं हुशारी, ग्रंथ करण्याचें व पदेंही करण्याचें साधन व अभिनय हे गुण इतर सर्व माहितीच्या मंडळीपेक्षां जास्त आहेत. तेव्हां अण्णांचे जागीं त्यांजला घेण्याची व्यवस्था करावी. प्रथम तीन प्रयोग करून पुढें योग्यता वाढेल तसे जास्त खेळ करावेत. सर्व मंडळींनीं सर्वपरी त्यांचे व पंचांचे विचारें रहावें. संगीत नाटककंपनींत त्यांतही अण्णांचे कंपनीस नीटपणें चालल्यास नुकसानी येण्याची किंवा अपयश येण्याची काळजी नको. अशा रीतीनें एकविचारें मंडळी चालविल्यास सर्वांचें कल्याण होणार आहे. आह्मी सर्व चार दिवसांत तिकडे येणार आहोंत. तेवेळीं सर्व मंडळीला भेटून आणखी कांहीं व्यवस्था सुचेल ती कळवूं. इतक्यांतच अण्णांचे मरणामुळें अशी निरवानिरव करण्याचा प्रसंग यावा हें आमचें दुर्भाग्यच होय. सर्वत्र मंडळीनें एकोप्यानें वागून आपलें हित करून घ्यावें. संगीत रामराज्यवियोगाचे जास्त अंक झाले आहेत किंवा कसे व हें नाटक छापविण्यास दिलें आहे किंवा नाहीं, दिलें असल्यास कधीं तयार होईल, दिलें नसल्यास त्याची एक प्रत करून पाठवावी. ती सरकारांतन छापविण्याची व्यवस्था करून तजवीज करूं. वरकड अधिकोत्तर नाहीं. आमची सर्वांची प्रकृति बरी आह. रा० भाऊराव कोल्हटकर यांस सा. नमस्कार. वर लिहिल्यावरून कळेल नाउमेद

होऊं नये. आमचें कार्ड पावलेंच असेल. मोरोबास व इतर मंडळीस सा० न० सांगावा. कळावें. पत्राचें उत्तर यावें. लोभ असावा ही विनंति.

माधवराव लेले."

---

## स्मारकार्थ प्रयोग.

अण्णासाहेबांच्या पश्चात् त्यांचें नांव चालविणें हें **किर्लोस्कर मंडळीच्या** पुढाऱ्याचें एक अवश्य कर्तव्य कर्म होतें, तें मंडळीनें पूर्णपणें बजावलें. **अप्पासाहेब गुळवे, गणपतराव किर्लोस्कर** व **डाक्टर गणपतराव गर्दे** इत्यादिकांच्या सल्ल्यानें पुढील व्यवस्था ठरली. **अण्णासाहेबांच्या** नांवानें अडीच आण्याचा भाग त्यांच्या पत्नीस देण्याचा मंडळीनें ठराव केला. **अण्णासाहेब** ज्या भूमिका करीत असत त्यांवर **रामभाऊ किंजवडेकर** यांची योजना झाली. याप्रमाणें व्यवस्था ठरून **अण्णासाहेबांच्या** तीर्थरूपांस नाटकें दाखविण्याचा जो **अण्णासाहेबांचा** संकल्प होता तो पूर्ण करण्याकरितां **पांडुरंगराव-तात्यांस** मुद्दाम **पुण्यास** आणविलें. पहिला प्रयोग ५ डिसेंबर १८८५ रोजीं **आर्यभूषण** नाटकगृहांत झाला. **अण्णासाहेबांच्या** संबंधाचें प्रास्ताविक भाषण **प्रो. गोपाळ गणेश आगरकर** एम. ए. यांनीं केलें; व प्रयोगारंभीं रा. सा. गणेश **जनार्दन आगाशे** बी. ए. यांनीं केलेल्या पुढील कविता म्हणण्यांत आल्याः

पद. (सुंदरमुख या चालीवर.)

**बलवंता रसिकसंघहृदयतोषणा ॥ सरस–ललित–नाट्य–गीत–काव्यपोषणा ॥धृ०॥ गुर्लहोसुरवासि पांडुरंगनंदना ॥ किर्लोस्कर प्रथित वंश–कीर्तिवर्धना ॥ वित्तविमुख सततगुप्त ॥ विजय शोधना ॥ दयिता ॥ कविता ॥ वनिता ॥ स्तिमितरवा । जागिविधवा । गतविधवा । झाली निर्गुणा ॥ १ ॥ पीनवक्ष मांसलतनु कटकभूषणा ॥ मंदहास्य मंजुवाक्य विकसितेक्षणा ॥ भव्याकृति धीरवृत्ति जनविमोहना ॥ बंधो । साधो । लाधो । कुशलमती । तव सुकृति । विबुधमति ॥ सतत अर्हणा ॥ २ ॥ विदित सरल भरतोदित रसनिबंधना ॥ कालिदास काव्यसुधा मधुरितानना ॥ कृतनव संगीत–नाट्य–बंधयोजना ॥ जगती ।**

सुकृती । प्रसृती । नव रुचिची । भवसृतिची । तव कृतिची । होऊ बहुगुणा ॥ ३ ॥

त्यावेळीं पुण्यांत प्रयोग झाले ते:—

| खेळ. | | उत्पन्न. रुपये. आणे. |
|---|---|---|
| शाकुंतल. | .... .... .... .... | २९१–८ |
| शाकुंतल. | .... .... .... .... | १०८–० |
| सौभद्र. | .... .... .... .... | ५१६–४ |
| शाकुंतल. | .... .... .... .... | ५८९–२ |
| सौभद्र..... | .... .... .... .... | ७०७–१ |

सदरहू प्रयोग मंडळीनें केवळ अण्णासाहेबांच्या संबंधानें आपली कृतज्ञता दाखविण्याच्या उद्देशानें केले होते. त्यांचें उत्पन्न खर्च वजा जाऊन १८०० रुपये झाले ते अण्णासाहेबांच्या तीर्थरूपांस अर्पण केले. अण्णासाहेबांचें नांव त्यांच्या पश्चात् चालावें ही लोकांचीही इच्छा होती, हें वरील उत्पन्नाच्या आंकड्यांवरून समजून येणार आहे. नोकर मंडळीनेंही अण्णासाहेबांच्या स्मारकार्थ खेळ झाले त्या दिवसाचा आपापला पगार अर्पण करून आपली कृतज्ञता दाखविली. ज्यांनीं आपले पगार या सत्कृत्यास दिले त्यांचीं नांवें:—

त्रिंबक नारायण साठे.
भास्कर रघुनाथ बखले.
गोविंद नारायण निपाणकर.
मार्तंड विठ्ठल महाजन.
विश्वनाथ रामचंद्र वत्सराज.
काशिनाथ वासुदेव परचुरे.
गणपतराव लागवणकर.
विठ्ठल अच्युत जांभेकर.
विसू सुराजी न्हावी.

पांडुरंगरावतात्यांनीं गणपतराव किर्लोस्कर यांच्या देण्याकडे सर्व रुपयांचा विनियोग करून अण्णासाहेबांच्या उपकार-ऋणांतून अंशतः मुक्त झाल्याचें श्रेय त्यांच्या मंडळीस या मार्गानें दिलें.

———

## उपसंहार.

**अण्णासाहेबांच्या** पश्चात् एकोणीस वर्षे **किर्लोस्कर मंडळीनें** त्यांचें नांव चालविलें आहे; व **अण्णासाहेबांच्या** कुटुंबास कृतज्ञतापूर्वक मंडळी त्यांचें स्वामित्व त्यांस पोंचवीत आहे. **अण्णासाहेब** वारल्यावर **श्री॰बाळासाहेब होळकर** यांनींही त्यांच्या कुटुंबास **अण्णासाहेबांची** योग्यता आठवून एक हजार रुपये दिले होते. त्यांच्या कुटुंबानें आजपर्यंतचा काल फार चांगल्या रीतीनें काढला आहे; **अण्णासाहेबांच्या** वडलांचें कर्ज त्यांनीं फेडलें आहे; **अण्णासाहेबांच्या** धाकट्या भावांस विद्याभ्यासास मदत केली आहे; जेवढीं तीर्थे आहेत त्या ठिकाणीं त्यांनीं यात्रा केल्या आहेत; व हल्लीं **गुर्लासुर** येथें **बळवंतेश्वर** ह्मणून **अण्णासाहेबांच्या** नांवानें एक देवालय व अन्नछत्र बांधून तापसीवृत्तींत जितक्या आनंदानें राहतां येईल तितक्या आनंदांत त्या कालक्षेप करीत आहेत.

**अण्णासाहेब** हा मोठा अलौकिक पुरुष होऊन गेला. त्यांचे योगानें जीं माणसें इतर रीतीनें कधींही कोणास माहित झालीं नसतीं तीं आज सर्व महाराष्ट्रांत प्रसिद्ध झालीं आहेत.* व आज हजारों माणसें त्यांनीं काढलेल्या कलेवर उदरनिर्वाह करीत आहेत. त्या पुरुषानें केलेला ऊर्जित दशेला आणावयाकरतां जे प्रयत्न करावयास पाहिजे होते ते केले आहेत. ती जर अद्याप ऊर्जितावस्थेंत आली नसेल तर हा दोष सर्वस्वी तीं कला ज्यांच्या हातांत पडली आहे त्यांच्या अज्ञानपणाचा आहे. कित्येक वेळां नाटकापासून देशहित काय आहे ह्मणून प्रश्न करण्यांत येतात; व जे नाटककार किंवा ग्रंथकार तसा प्रयत्न करीत नाहींत त्यांवर आक्षेप ठेवण्यांत येतात; परंतु या दोन्ही गोष्टी केवळ वेडगळ समजुतीच्या आहेत. नाट्यकलेपासून देशहित साधण्याचा प्रयत्न आमच्याकडे ती कला अगदीं भरभराटींत होती तेव्हां.

---

* इंदुरास एका देवळासंबंधानें असाच प्रकार झाला आहे. एका देवळांतील महादेवास कांहीं दिवस नष्टचर्याचे आले होते त्याला कित्येक दिवस पाणीसुद्धां मिळत नव्हतें. शेवटीं एका ब्राह्मणाला दया येऊन त्यानी ही पिंडी उपटून आणून **अण्णासाहेबांच्या** स्वाधीन केली तेव्हांपासून या पिंडीची यथासांग पूजाअर्चा हल्लीं मंडळींत होत आहे.

ही कोणी केला नाहीं; व जिकडे पूर्वी किंवा हल्लीं ती ऊर्जितावस्थेंत होती, किंवा असेल, तिकडेही कोणीं केला नाहीं. **शेक्सपीयरच्या** नाटकाचा अनेक ग्रंथकारांनीं अनेक दृष्टींनीं विचार केला आहे; परंतु त्यानें देशहित केलें नाहीं, ही कल्पना कोणी काढली नाहीं. उलट **शेक्सपीयर** ज्या देशांत निपजला तो देश आपल्यास धन्य समजत आहे. नाटकाचा हेतु सर्वथैव मनोरंजन करणें हा आहे व तद्द्वारा सुविचारानीं व नव्या नव्या कल्पनांनीं मन संस्कृत करणें हा दुसरा आहे. आजपर्यंत आमच्याकडील व परभाषेंतील जीं नाटकें उत्तमांत गणलीं जात आहेत तीं भाषासौंदर्य, विचारसौंदर्य, कल्पना, संविधानक–चातुर्य व प्रकृतिवैचित्र्य इत्यादि गुणांबद्दल आहेत. आमच्याकडे स्वतंत्र कल्पनेचे जे नाटककार निपजले आहेत त्यांत **अण्णासाहेब** एक प्रमुखत्वानें आहेत, व नाटकांत संगीताचा प्रमुखत्वानें समावेश प्रथम ज्यांनीं केला असे, तेच आहेत.* शुद्ध मराठी नाटकाची रचना **अण्णासाहेबांच्या** ना-

* रा. ब. महादेव गोविंद रानडे यांच्या मराठी ग्रंथावरील निबंधांत अण्णासाहेबांच्या संबंधानें पुढील उद्गार आहेत:—

"... There has, however, been distinct improvement effected in three directions during the last thirty years. The addition of high class music of singing was made a speciality by some of the companies. The credit of this movement is solely due to Mr. Anna Kirloskar; and the success which attended his efforts has encouraged a host of imitators...Mr. Kirlosker's three plays however still retain their prominence in the esteem of theatre going public.

...Among the writers of original dramas the first rank is given to the elder कीर्तनें...messers Ranade, Deval, Kirloskar & Kanitkar may be mentioned as also occupying a very high level, of :conrse, judging by English standards, our best performances must occupy a subordinate place; but it is not fair to judge by this high standards the development of a branch of literature which has had many decades to grow here as it has taken centuries to grow in England."

Times of India: June 28th 1904.

टकग्रंथांत जितकी आढळून येते तितकी एक **कीर्तने** यांच्या नाटकाशिवाय त्यांच्या पूर्वीच्या नाटककारांत फार थोड्यांत सांपडते. **अण्णासाहेबांनीं** नाटकाला जें वळण प्रथम दिलें व आपल्या कवित्वाची जी गोडी लावून दिली त्याचा संस्कार त्यांच्या वेळच्या व नंतरच्या लोकांच्या अंतःकरणावर इतका बिंबला आहे कीं, तो काढण्यास त्यांच्या मागूनच्या नाटककारांस अगदीं निराळा मार्ग स्वीकारावा लागला आहे. व तो मार्ग स्वीकारतांना कित्येकांनीं लोकांची अभिरुचि इतकी बिघडून टाकली आहे कीं, आतां चांगल्या व होतकरू नाटककारांसही ती ताळ्यावर आणण्यास फार परिश्रम पडत आहेत.

**अण्णासाहेबांच्या** पश्चात् दोन तीन वर्षांतच त्यांच्या घराण्याची फार वाताहात जाहली. त्यांचे वडील, मातोश्री, चुलते हे क्रमाक्रमानें त्यांचे मागोमागच वारले. त्यांच्या बंधूवर्गांपैकीं **धोंडोपंत** नांवाचे धाकटे बंधू एल. एल. बी. असून हायकोर्टांत वकीली करीत होते, तेही चार वर्षांखालीं अगदीं तरुण वयांतच मृत्युमुखीं पडले. हल्लीं त्यांचे दोन बंधू **गणपतराव** व **श्रीपादराव** हे हयात असून पहिले घरींच असतात, व दुसरे डाक्तरी करीत आहेत. व चुलत भावांपैकीं फक्त **शंभुराव** हे हल्लीं **धारवाडास** एका खाजगी इंग्रजी शाळेचे चालक आहेत.

याप्रमाणें **बळवंत पांडुरंग** ऊर्फ **अण्णासाहेब किर्लोस्कर,** महाराष्ट्रांत संगीत नाट्यकलेचा पाया घालणारे, ज्यामुळें त्यांचें नांव त्यांच्या हयातींतच नव्हें तर त्याच्यानंतर व पुढच्या अनेक पिढींत कायम राहणार आहे, त्यांचें हें चरित्र आहे.





किर्लोस्कर मंडळीनें दैवत मानलेली अण्णासाहेबांची तसबीर.

चित्रशाळा प्रेस, पुणें.

## जन्म कुंडली.




ही कुंडली पाहिल्याबरोबरच एखाद्या भाग्यशाली व पराक्रमी पुरुषाची असावी असें सहज दिसून येतें, कारण पराक्रमेश दशमांत स्वगृहींचा, व केंद्रांत बुधशुक्र असल्यामुळें व पंचमांत व लग्नीं दोन्ही ठिकाणीं शास्त्रीय राशी असल्यामुळें व पंचमेश लग्नीं शुक्राशीं युक्त असल्यामुळें व शुक्र गायनविद्येचा कारक असून लग्नीं आहे ह्मणून, व बुध शुक्राचा संयोग आहे करितां गायनरीतीनें नाट्यकलेस ऊर्जितावस्था प्राप्त होण्यास हेच कारणीभूत आहेत. दशमेश दशमांत व एकादशस्थानांत भाव चलितांत गुरु येतो व शिवाय राहू तेथें असल्यामुळें मोठमोठे संस्थानिक व राजे यांजकडून आश्रय संपादून घेणारा होतो. आतां व्यवहारी विद्ये ( इंग्रजी वगैरे ) संबंधी मात्र विचार केला असतां त्या विद्येचा गुरु शनी हा व्ययांत आहे व पंचम स्थानावर मंगळाची दृष्टि आहे, करितां ती विद्या विशेष नाहीं. आतां पंचमस्थानस्थ या अधिपतीवर मंगळाची दृष्टि व पंचमस्थानावरही मंगळाची दृष्टि व भाव चलितांत शनी लग्नीं येतो ह्या कारणानें ह्यापेक्षांही आपलें जास्त कौशल्य दाखविण्याची संधि मिळाली नाहीं; कारण ज्या वेळेस मिथुन राशीस शनी येतो त्या वेळेस दोन्हीही मारकस्थानावर त्याची दृष्टि पडते; शिवाय मूळ कुंडलींत रवी ह्मणजे आत्मा, यावर शनीची दृष्टि, ह्मणून मध्यमायुर्दायामध्येंच त्यांजला कालानुसार वागणें भाग पडलें त्यास उपाय नाहीं.

